यं वसिष्ठश्च विश्वामित्रो महामुनिः ॥ दुर्वासा नारदादिश्च जीवन्मुक्त
धुरंधराः ॥ एतद्वर्तनजा भेदा एते चात्र निदर्शनम् ॥

## ज्ञान्यज्ञानिभेदः

अनंतरं ज्ञानिनः प्रारब्धभोगांगीकारे ज्ञान्यज्ञानिनोः को भेद इत्युक्ते
व्रात्यश्रोत्रिययोर्वेदाध्ययनपरित्यागापरित्यागाभ्यां भेदेऽप्याहारनिद्रा
दिभिर्भेदविरहवदज्ञानिज्ञानिनोरपि हृदयग्रंथेस्संबंधासंबंधाभ्यां भेदे
वर्तते खलु भोगस्थितिभेदो नास्तीत्येतदेव संमतं भवति ॥

## स्वनाशप्रयत्नोपपत्तिः

अनंतरमत्र तत्त्वज्ञानेन ब्रह्मप्राप्तौ सत्यां व्याघ्रसंदर्शनवज्जीवत्वं वि
लीयते तथा चेत्स्वनाशस्य कथं जीवः प्रवर्तेत इत्युक्ते यथा लोके दे
वत्वाभिवांच्छया भृग्वग्निगंगाप्रवाहादिषु नरत्वपरित्यागमंगीकरोति

---

क । वामदेव प्रल्हादादिक । गौतम वसिष्ठ ॥३८॥ विश्वामित्र दुर्वास दधीची
नारदादिकांची । वर्तणूक तया सकळांची । भिन्नभिन्न असे ॥३९॥

## ज्ञान्यज्ञानिभेद.

ओव्याः--आणिक ज्ञानिया आपण । प्रारब्धभोग अंगीकारून । असे ह्मणोन
तया कारणें ॥११४०॥ अज्ञानियासि । आणि ज्ञानियासि । कवण भेद उभयांसि
असे ह्मणितलें तरी ॥४१॥ व्रात्या श्रोत्रियासि प्रसंग । वेदाध्ययन परित्याग । वे
दाध्ययन संयोग । करूनि तया विभेद ॥४२॥ नाहीं तरी आहार । निद्राव्यापार
विभेद साचार । नाहीं तयासि ॥ ४३ ॥ तैसें अज्ञानी । आणिक ज्ञानी । उभयां
लागूनि । हृदयग्रंथि ॥ ४४ ॥ संबंधासंबंधाचेनि । तया विभेद वाचूनि । भोग
स्थिती विभेद नाहीं ह्मणोनि । समता सत्य ॥४५॥

## स्वनाशप्रयत्नोपपत्ति.

ओव्याः--आणिक येथें तत्वज्ञानें । ब्रह्मप्राप्ति झालियानें । व्याघ्रसंदर्शन न्याया
नें । जीवत्वासि ॥४६॥ नाश होय यथार्थ । ह्मणोनि आपुलिया नाशातें । कैसें जी
वत्व प्रवर्तलें । ह्मणतिलें तरी ॥४७॥ इह लोकांत देवतादिक । अभिवांछेनें अ
नेक भृग्वग्नि गंगाप्रवेशादिक । प्रयाग कुरुक्षेत्र ॥४८॥ महापथि पतन विचित्र
परित्यागावया शरीर । पुरुष अंगीकार करीत असती ॥४९॥ तैसें प्रत्यगात्मा आ
पण । परब्रह्मस्वरूपीं निर्वाण असावया कारण । जीवित्वादिक ॥ ११५०॥ नि

एवं प्रत्यगात्मरूपब्रह्मत्वेन स्थातुं स जीवस्तत्त्वज्ञानेन स्वनाशमंगीकुर्वन् वर्तत इति सुप्रसिद्धं भवति ॥

## जीवन्मुक्तप्रशंसा.

अनंतरं व्यासादिवत् शापानुग्रहसामर्थ्यं यस्य पुरुषस्य वर्तते स एव तत्त्वज्ञानी नान्य इत्युक्ते तत्सामर्थ्यं तपःफलं भवति तत्त्वज्ञानफलं न भवतीति द्रष्टव्यं ॥ अनंतरं तथा जातं चेत्तत्त्वज्ञानस्य तप एव मुख्यमिति श्रुतिसद्भावात् तपोरहितस्य तत्त्वज्ञानं कथमित्युक्ते शापादीनां कारणीभूतसकामतपसोऽन्यनिष्कामतपसा तत्त्वज्ञानं भवतीति परामर्शः कर्तुं शक्यते पुनस्तेषां व्यासादीनां तत्त्वज्ञानसामर्थ्ये द्वे स्तः किल इत्युक्ते तेषामुभयविधतपोऽस्तीति ज्ञानसामर्थ्ये द्वे। अनंतरमेकैकविधतपआचरतस्तस्यैकैकैव सिद्धिर्वर्तत इति विरोधो नास्ति। अनंतरं शापादिसामर्थ्यं विना विधिशून्यं तत्त्वज्ञानिनं क्रियानिष्ठास्सर्वे निन्दन्तो वर्तन्त इत्युक्ते तेषां क्रियानिष्ठानामपि विषयलंपटैः पामरै-

---

ज्ञानें आपण आपुलिया । नाशासि प्रवर्तलिया । अंगीकारले ह्मणोनिया । प्रसिद्ध जाणावें ॥ ५१ ॥

## जीवन्मुक्तप्रशंसा.

ओव्याः—आणिक व्यासादिक ऐसे । शापानुग्रह जया असे । तोचि तत्वज्ञानी एरा नसे । ह्मणितलें तरी ॥५२॥ तें सामर्थ्य तपसाचें । फळ वांचूनि तत्वज्ञानाचें । फळ नव्हे ह्मणोनि साचें । निश्चयें जाणावें ॥ ५३ ॥ आणिक तें तैसें झालें तरी । तत्वज्ञानासि सहकारी । तपस्याचि मूळ साचारी । ह्मणोनि असे ॥ ५४ ॥ तया कारण । तपोहीना लागून । कैचें तत्वज्ञान । ह्मणितलें तरी ॥ ५५ ॥ शापादिक कारण । झालें सकाम तपें करून । निष्काम तपें होय ज्ञान । ह्मणोनि परमार्थ सत्य ॥५६॥ आणिक व्यासादिकांसि परिख्यात । तत्वज्ञान सामर्थ्य । उभय तपसिद्ध्यर्थ । असे ह्मणितलें तरी ॥५७॥ तयासि द्विविध तप असे । ह्मणोनि ज्ञानसामर्थ्य प्रबळ वसे । संभवत असें विशेषें । द्विविध प्रकारें ॥ ५८ ॥ आणि एकचि तपश्चर्या । आचरिला तरी तया ॥ एक सिद्धि होय ह्मणोनिया । विरोध नाहीं ॥५९॥ आणिक शापादिक सामर्थ्य नास्ति । तरी विधिशून्य तत्वज्ञाअति । क्रियानिष्ठ सकळ निंदिती । ह्मणितलें तरी ॥ ११६०॥ तया क्रियानिष्ठासि विषयरत । पामर असती निंदित । यालागीं निंदास्तुति समान सत्य । संशय नाहीं ।

निंद्यत्वमस्तीत्यनेन वैषम्यं नास्ति पुनस्तैर्विषयलंपटैः कृतनिराकरणेन क्रियानिष्ठानां शिष्टानां हानिः केत्युक्ते देह एवात्मेति बुद्धिमत्क्रियानिष्ठकृतदूषणेन तत्त्वज्ञानिनः कापि हानिर्नास्ति इत्येतदेव यथार्थं भवति पुनः स जीवन्मुक्तोऽलौकिक इत्यनेन प्रारब्धवशेन विद्वदविद्वदवस्थायां स्थितोऽपि मारुतेन श्रिताश्रितमेघपटलगगनवत् नित्यनिर्मलो भवति। पुनः तत्राद्दष्टरूपपरिचारकदत्तस्रक्चंदनादिभोगस्वीकारसत्वेऽपि निजभर्तरि सुरतप्राप्तपुंश्चलीवत् पराभिलाषयुक्त एव भवति। पुनर्मूढवत्कलाभिज्ञतायां मौनी सन् वर्तमानोऽपि कल्पितश्रुतिवाक्यवैखरीविषयमध्येऽलसो जातः पुनः प्रस्तुताज्ञवद्बहुभाषणवत्युच्यते तद्गूढाभिप्रायगर्भीभूतसत्याद्वैतनिष्ठनिगमाभिप्रायो भवति पुनराचार्यवच्छिष्यानुपदिशन् संस्थितोऽपि आत्मा नित्यमुक्त इत्यनेन बोध्यबोधकत्वं मायारचनात्मकमिति कृतनिश्चयेन गगनवाणीवद्गुरु

॥६१॥ तया विषयलंपटाचेनि। दूषणें क्रियानिष्ठालागून। कवण एक हानी। नाहीं जैसी ॥ ६२॥ तैसें देह आत्मवादि। बुद्धियुक्त क्रियासंबंधि। नैष्ठिकाचेनि दूषणविधि। ज्ञानियासि ॥६३॥ नाहीं हानि कवण। ज्ञानासि तरी दूषण। लेश नाहीं ह्मणोन। यथार्थ निश्चय ॥ ६४॥ आणिक तो जीवन्मुक्त। लौकिका ऐसा विद्वत्त। अविद्वत्तावस्था अंत। असला तरी ॥६५॥ श्रिताश्रितमरुतवशें। मेघपटलीं गगनाऐसें। नित्यनिर्मळ असे। साह्यार्थ जाणावें ॥ ६६॥ आणिक अदृष्ट ह्मणिजे परिचारिक। युक्त झाला तयासि विशेख। शर्कराचंदनादिक। भोग स्वीकारिला तरी ॥६७॥ निजभर्तृचेनि संगे। सुरतक्रीडा आनंदभोगें। असणें पुंश्चलीसि प्रसंगे। तैसें स्वभावसिद्ध ॥६८॥ आणिक मूढाऐशी स्थिती। कलाभिज्ञता ऐसे रीति। मौन्यापरि अवदति। असला तरी ॥६९॥ मानापमान समता। कल्पितअकल्पित। अखिल वृत्तांत। समानत्व ॥११७०॥ द्वैत अद्वैत परश्रुत। वाक्यें वैखरि विषयांत। समानपणें असे सत्य। अचळत्वें ॥७१॥ आणिक प्रस्तुतें न जाणें। बहुभाषका ऐसे आपण। कवण एक बोलणें। बोलिला तरी ॥७२॥ ते गूढाभिप्राय गर्भीकृत। अक्षरा ऐसें शुद्ध अद्वैत। निष्ठ ज्ञानियाचें वचन सत्य। वेदागम अभिप्राय ॥७३॥ आणिक आचार्या ऐसें विहित। शिष्यासि जरी उपदेशित। असला तरी आत्मा नित्यमुक्त। असे तया कारणें ॥७४॥ बोध्यबोधकत्वादिक। ते माया रचनात्मक। ह्मणोनि पूर्वक। कृतनिश्चय बोधी ॥७५॥ मग गगनीं ऐसें। गुरुत्वपण ग्रासे। अभिमानरहित असे। हा निश्चय पैं ॥७६॥ आ

त्वाभिमानरहितो भवति पुनरुन्मत्तवदनुचितवक्ताऽपि द्वैतभावरहितात्मारामो भवतीत्यनेनोक्तं सुरतांतसमये प्रजल्पितातिकामासक्तमिथुनवाक्यवदनभिधेयविषयकं भवति पुनः पिशाचग्रहाविष्टवत् गळगळगमनेऽपि ! पूर्णैकस्वभावनिष्ठो जात इत्यनेन विरहिगमनवदप्राप्यानुसंधानं तस्य भवति पुनः पुत्रवियोगानुभवशाली ग्राम्यजनकवच्छोकं करोतीति यत्तदेव सर्वेंद्रियाणि ब्रह्मांशरूपाणीत्यालोचनामप्राप्यैव कल्पितसाधकावस्थामध्ये दण्डितसर्वेंद्रियादिधर्मविषयककरुणारसो भवति पुनर्विकृतबहुरूपदर्शनाविनोदेऽट्टहासं कुर्वन् विचित्रपुण्यपापादिव्यवहारः सत्यमिति प्रतिपादयन् मीमांसादिदर्शनविषयकपरिहासो भवति पुनर्विटवत् स्त्रीलोलतया स्थितोऽपि पूर्णैकस्वभावो जात इत्यनेन निजानंदानुभवी भवति पुनः शत्रुवत् कं वा पुमांसं क्रोधेनैव संतापं प्रापयन् क्षेत्रदाहकाग्निवत् विशिष्टफलसंपत्तेस्तमाश्रित्य विश्वासः कर्तव्यः ॥

---

णिक उन्मत्ता ऐसें । अनुदित अनारिसें । वक्तृ विशेषें । झाला तरी ॥७७॥ तरी तयाचा द्वैत । भाव नासोनि अत्यंत । आत्माराम स्वतः । झाला ह्मणोनि ॥७८॥ सुरतांत्यसमयांत । झालिया अतिकामासक्त । मिथुन वाक्य ऐसें सत्य । अनुभवी विषयातें ॥७९॥ आणिक पिशाचग्रहासंविष्ट । तैसा गलगल बोलिला उद्धट । तरी पुनर्नैक्य स्वभावनिष्ठ । होय तयाकारणें ॥११८०॥ विरहि पुरुषाचिये । गति ऐशा न्यायें । अप्राप्य अनुसंधान होय । हा निश्चयार्थ ॥८१॥ आणिक पुत्रवियोगा अनुभवयुक्त । ग्राम्य जे कां ऐसें विहीत । शोकादिक करीत । असला तरी ॥८२॥ सर्व इंद्रिय ब्रह्मांश ह्मणोन । न करितां अवलंबन । कल्पित साधकजन आन । अवस्था आंत ॥८३॥ दंडण समस्त । इंद्रियें धर्मासि करिती त्या निमित्त । विषय उद्भवला सत्य । करुणारस तो ॥८४॥ आणिक विकृत बहुवेष । दर्शनत्वे प्रवेश । विनोद अति हास्य । केलें तरी ॥८५॥ विचित्र पुण्यपापादिक । व्यवहारप्रतिपादी मीमांसक । आदि दर्शन विषयीं मुख्य । प्रहास्यकरी जाणिजे ॥८६॥ आणि विराटपुरुषा ऐसा गुह्यानंद सुख । स्त्रीलंपट होऊनि आशंक । असली तरी ॥८७॥ पूर्णैक स्वभावें असे नटत । ह्मणोनि निजानंद भरित । अनुभव सुखें कृतार्थ । कैवल्य होऊनि असे ॥८८॥ आणिक शत्रुचिया परी । कवणासि तरी । आपुलिया उत्तरीं । शापिलें तरी ॥८९॥ क्षेत्रदाहक अग्नि ऐसें विशेख । विशिष्ट फळ संप्रदायक । ह्मणोनि निश्चयात्मक । विश्वासें जाणावें ॥११९०॥

## विदेहकैवल्यम्

अनंतरं यस्मिन्काले यस्मिन्देशे यत्किंचिच्छरीरमप्राप्य सच्चिदानंदब्रह्मस्वरूपेण वर्तमानतैव विदेहकैवल्यं भवति तत्र विदेहकैवल्यप्राप्तिः कथंमित्युक्ते चूर्णिका। नानाशास्त्रपरिज्ञानसंपत्तिजन्यवेदान्तशास्त्रपरिशीलनचातुरीधुरीणे नित्यनिर्मलमोक्षेच्छायुक्ते यस्मिन्कस्मिश्चित्पुरुषधौरेये निष्ठावलेन परमेश्वरप्रसाददायकनित्यकर्मानुष्ठानेन जनितापूर्वपरंपरायिते तद्धर्मपरंपराजनितपापावलीकोटिविध्वंसनसंपन्ने पापनाशनेन जन्यमानचेतःशुद्धिसंमृद्धिदेदीप्यमाने चित्तशुध्द्याजायमानैहिकामुष्मिकशुभाशुभफलसुभगं भावुकसंसारदोषदर्शनसंभूतविषयवैराग्यसौभाग्यधौरंधर्यप्रवीणे विषयविरक्तिसंजातानंदाव्याप्तिलक्षणमोक्षापेक्षाविर्भूतसर्वसहादिब्रह्मलोकांतप्राप्तिकारककर्मोपरतिसंभाव्यमानमूलोत्थेन जालंधरादिप्रबंधप्रकाश्यमानयोगाभ्याससंविभावितप्रत्यगात्मरतिसंदोहसंकीर्णे प्रत्यगात्मरतिजनितब्रह्मात्मैक्यप्रतिपादकचतुर्वेदवारांनिधिमौक्तिकायमानमहावाक्यविचारसंपादिताद्वैतविज्ञानोत्पादितानेककोटिब्रह्मांडबुद्बुदविविधतत्त्वतरंगमालासंकुलदुःखजंबालनानाविधसुखादिकमठकच्छपादिजन्तुसंतानसंतन्य-

---

### विदेहकैवल्य.

ओव्याः—यानंतर विशेष। कोणे एकेकाळीं कोणे एका देशीं। कोणे एका देहाचा आपणासि। बाध नसतां ॥९१॥ सच्चिदानंदघन। ब्रह्मस्वरूपीं मग्न। होऊनि असे सुलीन। तोचि देह कैवल्य ह्मणवीं ॥९२॥ आणिक ते विदेह परम। कैवल्यपद पावावया वर्म। कैसे पै अनुक्रम। ह्मणतिलें तरी ॥९३॥ कवण एक मुमुक्षूतें। नित्यकर्मांचेनि अनुमतें। अनुष्ठानादिक सामर्थ्यें। धर्मोत्पत्ति होय॥९४॥ ते धर्मोत्पत्तीपासाव। पापनिवृत्ति सर्व। पापनिवृत्ति स्वभाव। चित्तशुद्धि होय ॥९५॥ ते चित्तशुद्धि करून। संसारदोष निदर्शन। संसारदोष निदर्शनाचेन। विषय विरक्ति ॥९६॥ ते विषयविरक्ति प्रभावें। मोक्षापेक्षा उद्भवें। मोक्षापेक्षेनें स्वभावें। बाह्यकर्म परित्याग ॥९७॥ बाह्यकर्म परित्याग आपैसे। योगाभ्यासा प्रवेशें। योगाभ्यासवशें। प्रत्यगात्मा अभिरति ॥९८॥ प्रत्यगात्माभिरति करून। तत्त्वमस्यादि कारण। महावाक्यें विचारण। विचार लोभे ॥९९॥ तत्त्वमसि महावाक्य विचारें। अद्वैतज्ञानलाभे साचारें। अद्वैतज्ञान विशेषाकारें। अविद्या नाशे ॥१२००॥ द्वैत भ्रांतिनष्ट आपैसे। द्वैत भ्रांतिनष्टाचेनि विशेषें। शुभाशुभ बुद्धि

मानापरमायांभोधिविनाशजनितद्वैतभ्रांत्यदर्शनविराजमाने तददर्शनजन्यशुभाशुभबुद्धिपरित्यागोत्पद्यमानरागद्वेषहानिप्राप्यमाणविधिनिषेधनिरसनवशीभूयमानपुण्यपापक्षयायत्तदेहभावविच्छित्तिसंसृज्यमानसर्वपाशविमोचनसंभावनीये तदुत्पन्नसर्वोत्कृष्टचरमस्थानीभूतपुनरावृत्तिरहितसकलशास्त्रकोलाहलपर्यवसन्ननामजातिक्रियावासनाप्राप्तिमनोवागगोचरानित्यानंदात्मकश्रुत्याचार्यप्रसादासिद्धिनिश्चितविदेहकैवल्यममूल्यं विजृंभते ॥ इति श्रीमत्पदवाक्यप्रमाणपारावारीणश्रीहरपुरनञ्जराजगर्भपयःपारावारसुधाकरेण चामांबागर्भशुक्तिमुक्ताफलेन श्रीमदुमारमणचरणसरोरुहभृंगायमाननिजचित्तेन शरणागतभरणायतकरुणायुतनिजवीक्षणेन श्रीलिंगराजेन विरचिते विवेकचिंतामणिविवरणे श्रीलिंगराजीये सकलविद्वज्जनकिरीटायमाने वेदादिसर्वार्थप्रकाशकः प्रथमः परिच्छेदः ॥ समाप्तः ॥

---

परित्याग ॥१॥ शुभाशुभ बुद्धिचेनि । परित्यागें करून । रागद्वेषहानी । समूळ होय ॥२॥ रागद्वेषऱ्हासन । झालिया विधिनिषेध निरसन । विधिनिषेध निरसनें पुण्यें । पापक्षय ॥३॥ पुण्यपापक्षयाचेनि अंतिं । देहभाव विच्छित्ति । देहभाव विच्छितीनें समस्ति । पाशविमोचन ॥४॥ सकळ पाश । विमोचनें अशेष । सर्वोत्कर्ष । निजवस्तु लाभे ॥५॥ पुनरावृत्तिरहित । सकळ शास्त्राचा गुह्यार्थ । अवसान परम सत । आपण होय ॥६॥ नाम जाति क्रिया । वासने शक्य रिघावया । मनोवाचा उभय । अगोचर ॥७॥ नित्यानंदस्वरूप विदेह । कैवल्या जाला ह्मणोनि निश्चय । श्रुत्याचार्यां प्रसादें होय । सिद्ध सत्य ॥८॥ निजगुण देव योगेश्वर । जो साक्षाच्छंभूचा वरपुत्र । तयाचें चरित्र अपार । सांगत असे ॥९॥ तयाचे युक्तिवरी। मी प्राकृत भाषा बोलिलों वैखरी । तो प्रीति पावो सर्वेश्वरिं । श्रीशंभो नीलकंठीं ॥१२१०॥ इति वेदान्त सकल शास्त्रनिर्णय प्रथम परिच्छेद ॥१॥



॥ श्रीशिवाय नमः ॥

# अथ द्वितीयपरिच्छेदः

श्रीगणेशाय नमः ॥ उक्तरूप शिवसिद्धान्तपद्धति ॥ चैतन्यं शाश्वतं शांतं व्योमातीतं निरंजनम् ॥ नादबिंदुकलातीतं तस्मै श्रीगुरवे नमः॥ इति सकळ वेदशास्त्रार्थ ॥ मुख्य निरोपिला प्राकृत ॥ अधिकारियासि क्लृप्त ॥ होय तैसा ॥१॥ आतां परात्परतर अति ॥ उक्तरूप शिवसिद्धान्तपद्धति ॥ मी निरूपितों सकलांप्रति ॥ सावधानचित्तीं ऐकिलें पाहिजे ॥२॥ वर साधकासि संप्राप्त ॥ आनंद सतत ॥ होय उदित ॥ या शास्त्रविचारें ॥३॥ तें कैसें ह्मणितलें तरी ॥ तया सिद्धांतशास्त्राभीतरीं ॥ लोकांसि प्रत्यक्ष फळ परि ॥ असे ह्मणौनि ॥४॥ विश्वास घटावया कारण ॥ तयालागीं विज्ञान ॥ केवळ ह्मणौन ॥ उभय आत्मवर्गांत ॥५॥ तया तया नामधेयानें ॥ उक्त झालें गंभीरपणें ॥ तें कैसें कीं लक्षणें ॥ ह्मणतिलें तरी ॥६॥ गारुड दक्षिण ॥ वाम भूत ह्मणौन ॥ चतुष्क तंत्रविधान ॥ त्याचे ठायीं ॥७॥ तत्पुरुष अघोर ॥ वामदेव सद्योजातकर ॥ ह्मणिजे चतुर्विध प्रकार ॥ ब्रह्ममूर्ति उपासना ॥८॥ सर्प-

---

## ओव्यांचा अर्थ.

अर्थ—(१) याप्रमाणें सर्व वेदांतील तत्वांच्या पद्धतीला अनुसरून सर्व कांहीं सांगितलें. (२) आतां अधिकाऱ्यांच्या प्रेमाला पात्र असा श्रीपरतरशिवसिद्धांत सांगतों. तो शिवसिद्धांत कसा आहे याचें वर्णन विस्तारानें करतों. (३) या शिवसिद्धांतशास्त्राचा विचार केला असतां साधक लोकांना मोठा आनंद होतो. (४) या शास्त्राचा विचार केला असतां आनंद कां होतो असें ह्मणाल तर सांगतात कीं प्रत्यक्ष फळावर लोकांचा विश्वास जास्त बसत असल्यामुळें आनंद होणें साहजिकच आहे तदनुसार या शास्त्रांत प्रत्यक्ष फळच सांगितलें आहे. (५) विज्ञानच केवळ आहे, कारण याच्या योगानें विश्वास लौकर बसतो. असें ह्मणणाऱ्या आत्मवर्गांत (६) त्या त्या नांवानें त्यांनीं त्यांनीं शास्त्रें सांगितलीं आहेत. आतां त्यांचीं लक्षणें काय आहेत असें ह्मणाल तर सांगतात. (७) गारुड, दक्षिण, वाम, भूत, अशीं हीं नांवें होत. आणि हींच चार तंत्रें होत. त्यांमध्यें (८) तत्पुरुष, अघोर, वामदेव, सद्योजात अशा चार मूर्तींची उपासना क्रमानें सांगितली आहे. (९) या मूर्तींच्या उपासनेला अनुसरून सर्पचिकित्सा, शत्रुजय, रसवाद ग्रहोच्चा-

चिकित्सा शत्रुजयत्व ॥ रसवाद ग्रह उच्चाटणत्व ॥ तया लागीं अस्तित्व ॥ अनुक्रम ॥९॥ गारुड मारणवाद ॥ मंत्र औषध ॥ इत्यादि प्रयोग सामर्थ्य सिद्ध ॥ होऊनि असे ॥१०॥

## आगमभेद.

आणिक तो विशेध ॥ सिध्दान्त परिभेद ॥कवण कैसा प्रसिध्द॥ह्मणतिलें तरी ॥ कामिकागम १ योगजागम २ चिंत्यागम ३ कारणागम ४ अजितागम ५ दीप्तागम ६ सूक्ष्मागम ७ सहस्रागम ८ अंशुमानागम ९ सुप्रभेदागम १० विजयागम ११ विश्वासागम १२ स्वयंभुवागम १३ अनलागम १४ वीरागम १५ रौरवागम १६ मकुटागम १७ विमलागम १८ चंद्रज्ञानागम १९ बिंबागम २० प्रोद्गीतागम २१ ललितागम २२ सिध्दागम २३ संतानागम २४ शर्वोक्तागम २५ पारमेश्वरागम २६ किरणागम २७ वातुळागम २८॥११॥इति अष्टाविंशति शिवागम संख्या ॥ पूर्वोक्त कामिकादि करून ॥ सदाशिवाच्या मुखापासून ॥ अनुक्रमें उत्पन्न ॥ झाले आगम ॥१२॥ सद्योजातमुखीं पंचक॥ वामदेवमुखींपंचक ॥ अघोरमुखींपंचक ॥ तत्पुरुषमुखींपंचक ॥ १३॥ ईशान्यमुख ॥ तयापासून अष्टक ॥ जनित झाले मुख्य ॥ त्याचे ठायीं ॥१४॥कामिकादि सुप्रबोधांत॥दश आगम निश्चित ॥शिवभेद ह्मणवीत॥

---

टण, वगैरे विषय अनुक्रमानें (१०) गारुड मारणवाद, मंत्रौषध वगैरे प्रयोग वर दिलेल्या शास्त्रांत सांगितले आहेत.

## आगमभेद.

आणि हा विशेष सिद्धांत कसा प्रसिद्ध झाला आहे असें ह्मणाल तर सांगतात (११) कामिकागम, योगजागम, चिंत्यागम, कारणागम, अजितागम, दीप्तागम, सूक्ष्मागम, सहस्रागम, अंशुमानागम, सुप्रभेदागम, विजयागम, विश्वासागम, स्वायंभुवागम, अनलागम, वीरागम, रौरवागम, मकुटागम, विमलागम, चंद्रज्ञानागम बिंबागम, प्रोद्गीतागम, ललितागम, सिद्धागम, संतानागम, सर्वोक्तागम, पारमेश्वरागम, किरणागम, वातुलागम (१२) असे हे अठ्ठावीस आगम श्रीसदाशिवाच्या मुखापासून उत्पन्न झाले. (१३) त्यांत सद्योजात मुखापासून पांच आगम झाले. वामदेव मुखापासून पांच आगम झाले. अघोरमुखापासून पांच आगम झाले. तत्पुरुषमुखापासून पांच आगम झाले.(१४) ईशान्य मुखापासून आठ आगम झाले. याप्रमाणें मुख्य आगम होत. त्यांत (१५) कामिकापासून सुप्रभेदापर्यंत दहा आ-

असती निरुतें ॥१५॥ उरले समस्त ॥ विजयादि वातुळांत ॥ अष्टादश आगम ह्मणवीत ॥ रुद्रभेद ॥१६॥

## आगमावतरण.

शिवरुद्रापासाव ॥ आगम उद्भव ॥ कैसे झाले सर्व ॥ ह्मणतिलें तरी ॥१७॥ सद्योजातमुखीं कामिकागम ॥ तो प्रणव बुझिला प्रथम ॥ तयापासूनि त्रिकाळासि गम्य ॥ तयामुखें हरासि लाभला ॥१८॥ योगजागम तो प्रथम सुधाख्य ॥ तयापासून वाहुनें मुख्य ॥ तयामुखें विशेख ॥ विभुनें जाणिला ॥१९॥ चिंत्यागम तो प्रथमदीप्त ॥ तयापासूनि योगाव्हयाप्राप्त ॥ तयामुख्य सिध्दांत ॥ अंबिकेनें जाणितला ॥२०॥ कारणागम तो कारणाख्यानें प्रथम ॥ तयापासून सर्वांस कळला धर्म ॥ तयापासून ॥ प्रजापतीसि कळला ॥२१॥ अजितागम तो प्रथम शिव ॥ तयापासूनि सुशिव ॥ वरि तयापासाव ॥ अच्युता प्राप्त झाला ॥ २२ ॥ आणिक वामदेव मुखीं दीप्तागम ॥ तो ईशें आयकिला प्रथम ॥ तयापासून परिक्रम ॥ त्रिमूर्तीं कळलें ॥२३॥ तयाचिया मुखें ॥ हुताशनें विशेखें ॥ जाणितला निकें ॥ आगमधर्म ॥२४॥ सूक्ष्मागम व्याख्यान ॥ तें

---

गम शिवभेद आहेत असें ह्मणतात. (१६) बाकी राहिलेले विजयादि वातुळापर्यंत जे आगम आहेत, त्यांला रुद्रभेद असें ह्मणतात.

## आगमावतरण.

(१७) शिवरुद्रापासून आगम कसे उत्पन्न झाले अशी शंका आली असतां सांगतात कीं,–(१८) सद्योजातमुखापासून कामिकागम झाला असून तो प्रणवस्वरूप झाला आहे. अशा या आगमाची प्राप्ति त्रिकाळाला झाली नंतर श्रीहरानें ऐकिलें (१९) योगजागम हा प्रथम सुधाला प्राप्त झाला नंतर वाहूनें जाणिला नंतर साक्षात् श्रीविभूनें प्रख्यातीस आणिला. (२०) (कानडी प्रतीवरून--चिंत्यागम प्रथम दीप्तानें ऐकिला त्यापासून योगाला मिळाला त्यापासून अंबिकेनें ऐकिला. )(२१) कारणागम प्रथम कारणानें ऐकिला त्याच्यापासून सर्वांला तो आगम धर्म कळला नंतर त्यापासून प्रजापतीला कळला. (२२) अजितागम हा प्रथम शिवाला कळला त्यापासून सुशिवाला प्राप्त झाला. त्यानंतर त्याच्यापासून अच्युताला मिळाला(२३) आणि वामदेवमुखापासून दीप्तागम झाला. नंतर त्याच्यापासून श्रीईशाला प्राप्त झाला त्यानंतर अनुक्रमानें त्याच्यापासून त्रिमूर्तींला कळला. (२४) त्याच्या मुखापासून विशेषेंकरून अग्नीला आगमधर्म कळला. (२५) सूक्ष्मागमाचें

प्रथम सूक्ष्में तयामुखें वैश्रवण ॥ तयापासूनि प्रभंजन ॥ बुझिला धर्म ॥२५॥ अंशुमानागम तो प्रथम ॥ अंबु अंबुपासूनि उग्रासि गम्य ॥ तयामुखें आगमधर्म ॥ औरसा प्राप्त झाला ॥२६॥ सहस्रागम तो प्रथम काळरुद्र ॥ वरि तयापासूनि भीमरुद्र ॥ तयामुखें धर्मविचार ॥ जाणितला ॥२७॥ सुप्रबोधागम तो प्रथम विचारें ॥ दशेशें ऐकिला तयामुखें विघ्नेश्वरें ॥तरि तयापासूनि आदरें ॥ शशीनें जाणिला ॥ २८ ॥ इति दश आगम शिवाख्यभेद म्हणविती ॥ ॥ आणिक अघोरमुखीं प्रथम विजया॥ आगम तो रुद्रें आयिकिला त्यापासुनिया ॥ अनादि अनादि परममुखें करुनिया ॥ नंदीश्वरा कळला ॥ २९ ॥ निश्वास आगम ॥ तो उदायिनु बुझिला प्रथम ॥ तयामुखें तध्दर्म ॥ गिरिजेनें जाणितला ॥३०॥ स्वयंभू आगम ॥ तो निधनेशु बुझिला प्रथम ॥ तयामुखें सप्रेम ॥ स्वयंभू लाभला ॥३१॥ अनिलागम तो प्रथम ॥ बुझिला व्योम ॥ तयापासूनि आगमधर्म ॥ हुताशने जाणितला ॥३२॥ वीरागम तो विशेष ॥ प्रथम बुझिला तेजस ॥ वरि तया मुखें सौरस ॥ प्रजापति लाभला ॥३३॥ आणिक तत्पुरुषमुखीं ॥ रौरवागम तो प्रथम विशेखीं ॥ ब्रह्मण्येश तया·

---

व्याख्यान प्रथम सूक्ष्मानें ऐकिलें–त्याच्या मुखानें कुबेरानें ऐकिलें पुढें त्याच्या मुखानें वायूनें ऐकिलें (२६) अंशुमानागम प्रथम अंबूनें ऐकिला अंबूपासून उग्राला लाभला पुढें त्याच्या मुखानें औरसाला सर्व आगमधर्म कळला (२७) सहस्रागम प्रथम कालरुद्राला मिळाला नंतर त्याच्यापासून भीमरुद्राला लाभला पुढें त्याच्या मुखानें धर्माला कळला (२८) सुप्रभेदागम प्रथम दशेशानें ऐकिला नंतर त्याच्या मुखानें गणपतीनें ऐकिला पुढें त्याच्यापासून परम आदरपूर्वक सर्व आगम धर्म शशीला लाभला (२९) याप्रमाणें दहा आगम शिवागमांतील भिन्न भिन्न प्रकारचे झालेले आहेत. नंतर पुनः प्रथम अघोर मुखानें विजयागम श्रीरुद्रानें ऐकिला नंतर त्याच्यापासून अनादि परमाला कळला त्याच्यापासून नंदीश्वराला कळला (३०) नंतर प्रथम निश्वासागम उदयानें ऐकिला पुढें त्याच्या मुखानें तो आगमधर्म साक्षात् गिरिजेनें जाणिला (३१) स्वयंभुवागम प्रथम निधनेशानें ऐकिला पुढें त्याच्या मुखानें स्वयंभूला लाभला (३२) प्रथम अनिलागम व्योमाला लाभला पुढें त्याच्यापासून सर्व आगमधर्म अग्नीला कळला (३३) वीरागम प्रथम तेजःस्वन्ताला लाभला नंतर त्यापासून सौख्य प्रजापतीला लाभला (३४) नंतर तत्पुरुष मुखानें प्रथम रौरवागम निघाला पुढें त्याच्यापासून ब्रह्मण्येशानें ऐ·

पासूनि शेखीं । नंदिकेश्वरें जाणिला ॥ ३४॥ मकुटागम तो मुख्य ॥ प्रथम बुझिला शशांक ॥ तयापासुनि विशेख ॥ महादेवा लाभला ॥३५॥ विमलागम तो श्रध्दापूर्वक॥प्रथम ऐकिला सर्वात्मकें॥ वरि तयाचिया मुखें ॥ वीरभद्रें जाणितला ॥३६॥ चंद्रज्ञान आगम॥ तो अनंतें ऐकिला प्रथम ॥ तयापासूनि परिक्रम ॥ बृहस्पतिनें जाणितला ॥३७॥ विंबागम तो प्रथम ॥ प्रशांत बुझिला तध्दर्म ॥ वरि तया मुखें परिक्रम ॥ दधीचीनें जाणितला ॥३८॥ आणिक ईशान्य मुखीं प्रोद्गीतागम ॥ तो शूलीनें ऐकिला प्रथम ॥ वरि तया मुखें तध्दर्म ॥ कवचाख्या लाभला ॥ ३९ ॥ ललितागमातें ॥ प्रथम यम बुझिला निरुतें ॥ वरि तयामुखें ललितें ॥ जाणितला ॥४०॥ सिध्दागम तो श्रध्दाभरें ॥ प्रथम ऐकिला इंद्रें ॥ तरि तयापासूनि चंडीश्वरें ॥ जाणितला ॥ ४१ ॥ संतानागम तो संचला ॥ प्रथम वशिष्ठें ऐकिला ॥ वरि तयापासूनि जाणिला ॥ वैशंपायनें ॥ ४२ ॥ सर्वोक्तागम तो प्रथम ॥ बुझिला आपण सोम ॥ वरि तया मुखें तध्दर्म ॥ नारसिंहें जाणितला ॥४३॥ पारमेश्वरागम तो आदरें । प्रथम ऐकिला परमेश्वरें ॥ वरि तयापासूनि विचारें । देवीनें जाणितला ॥४४॥ किरणागम तो यथा ॥ प्रथम बुझिला देवपिता ॥ वरि तयापासूनि स-

---

किला पुढें त्याच्यापासून नंदिकेश्वराला लाभला (३५) मकुटागम प्रथम शशांकाला ( शशांकाख्याला ) मिळाला नंतर त्याच्यापासून महादेवाला लाभला (३६) विमलागम विश्वासपूर्वक सर्वात्मकानें ऐकिला नंतर त्याच्यापासून साक्षात् वीरभद्रानें ऐकिला (३७) चंद्रज्ञानागम अनंतानें प्रथम ऐकिला त्याच्यापासून परिक्रमाला अनंतर बृहस्पतीला लाभला (३८) विंबागम प्रथम प्रशान्तानें ऐकिला नंतर त्याच्या मुखानें दधीचीनें ऐकिला (३९) आणिक ईशान्य मुखानें प्रोद्गीतागम निघाला त्याच्या मुखानें प्रथम शूलीनें ऐकिला त्यानंतर त्याच्यापासून तो आगमधर्म कवचाला लाभला (४०) ललितागम प्रथम यमानें ऐकिला नंतर त्याच्यापासून ललिताला लाभला (४१) सिद्धागम विश्वासपूर्वक इंद्रानें ऐकिला नंतर त्याच्यापासून चंडीश्वराला मिळाला (४२) संतानागम वसिष्ठानें ऐकिला नंतर त्याच्यापासून वैशंपायनाला मिळाला (४३) सर्वोक्तागम प्रथम सोमाला मिळाला नंतर त्याच्या मुखानें तो आगमधर्म नारसिंहाला मिळाला (४४) पारमेश्वरागम मोठ्या आदरानें प्रथम परमेश्वरानें ऐकिला नंतर त्याच्यापासून मोठ्या भक्तीनें मोठ्या विचारानें देवीनें ऐकिला (४५) किरणागम प्रथम देवपित्यानें ऐकिला

र्वथा ॥ संवर्तकें जाणितला ॥ ४५ ॥ वातुलागम तो संचला ॥ प्रथम
शिवरुद्रें ऐकिला ॥ वरि तयापासूनि महाकाळा ॥ प्राप्त झाला ॥४६॥

## आगमसंख्या.

इति अष्टादशागम अष्टादश रुद्रभेद ह्मणविती॥आणिक अष्टाविंशति
आगम मुख्य ॥ सर्व एकत्र ग्रंथसंख्या ॥ द्विशंख पद्म एक ॥ एक अर्बु
द ॥४७॥ कोटि नवदश ॥ लक्ष अडतिस ॥ सहस्रचवेताळीस ॥ ग्रंथ
संख्या होऊनि असे ॥४८॥ (कानडी प्रतीवरून)एकेकागम सात पद्म
पर्यंत।आणिक एक महाखर्व सात खर्वपर्यंत ॥ तेच आठ न्यर्बुद पांच
अर्बुदांत ॥ सातशे पन्नास कोट ॥१॥ आणिक एकोणसत्तर लक्षांवरि
तेवीस हजार संख्या परि ॥ असोनि त्यामध्यें अवांतर भेद जारि॥एक
शे अठ्याणउ ॥२॥ ) ॥४९॥

## आगमविशेषविभाग.

उत्तरभैरवोत्तर ॥ नारसिंव्ह ह्मणिजे त्रिप्रकार ॥ कामिकागमाचा
भेदाकार ॥ भेदत्रय ॥ ५० ॥ वीणाशिखोत्तर तारकतंत्र सांख्यागम॥
आणिक शान्त्यागम ॥ आत्मयोग ह्मणोनि योगजागम ॥ तयाचे पंच
भेद ॥५१॥ सुचिंत्यागम शुभागम ॥ वामतंत्र पापनाशक सारोद्भव

---

नंतर त्याच्यापासून संवर्तकानें ऐकिला (४६) वातुलागम प्रथम शिवरुद्रानें ऐकि
ला. नंतर त्याच्यापासून महाकालानें ऐकिला (४७) (४८) याप्रमाणें शिवागमा
चे अठरा रुद्रभेद आहेत.

### आगमसंख्या.

एकूण अठावीस मुख्यागम असून त्यांची संख्या २०१०००१०१९३८४४००
दोन शंख एक पद्म एक अर्बुद एकोणीस कोटी अडतीस लक्ष चवेचाळीस हजार
आहे. (४९) (कानडी प्रतीवरून– एकएक आगम सात पद्म एक महाखर्व सात
खर्व आठ न्यर्बुद पांच अर्बुद सातशेपन्नास कोट एकोणसत्तर लक्ष तेवीस हजार
संख्येचा आहे त्यामध्यें अवांतर भेद एकूण एकशे अठ्याणव आहेत. )

### आगम विशेष विभाग.

(५०) उत्तर, भैरवोत्तर, नारसिंह असें तीन भेद कामिकागमाचे होत.(५१)
वीणाशिखोत्तर, तारकतंत्र, सांख्यागम, शांत्यागम, आत्मयोग असें पांच भेद
योगजागमाचे होत. (५२) सुचिंत्यागम, शुभागम, वामतंत्र, पापनाशक, सारोद्भव

मृतागम ॥ ह्मणोनि चिंत्यागम ॥ तयाचे षड्भेद ॥ ५२ ॥ कारणतंत्र ॥ पावनतंत्र ॥ दौर्ग्यतंत्र ॥ महेंद्रतंत्र ॥५३॥ भीमतंत्र मारणतंत्र ॥ ईशान्यतंत्र ॥ ह्मणोनि सप्त प्रकार ॥ कारणागमाचे भेद ॥ ५४ ॥ प्रभूतागम वीरोद्भुतागम तथा ॥ पार्वतितंत्र पद्मसंहिता॥ह्मणोनि अजिता ॥ आगमासि चतुर्भेद ॥५५॥ अमेयागम अप्रतिमागम ॥ आप्यागम असंख्यागम ॥ अमितौजसागम ॥ आनंदागम ॥५६॥ माधवोद्भूतागम ॥ अद्भुतागम ॥ अमृतागम ॥ ह्मणोनि ॥ दीप्तागम ॥ तयाचे नव भेद ॥ ५७ ॥ सूक्ष्मसंहिता ह्मणो यथा ॥ सूक्ष्मागमाचा निरुता ॥ एक भेद ॥ ५८ ॥ अतीतागम अमलागम ॥ शुद्धागम अप्रमेयागम ॥ ज्योतिर्भावनव आगम ॥ प्रवुद्धागम ॥ ५९ ॥ विवुधागम हस्तागम ॥ अलंकारागम सुबोधागम ॥ ह्मणोनि सहस्रागम ॥ तयाचे दशभेद ॥६०॥ विद्यापुराण भास्वरागम ॥ नीललोहिततंत्र प्रकरणागम ॥ भूततंत्र आत्मालंकार कश्यपागम ॥ गौतमागम ॥६१॥ महेंद्रागम ब्रह्मागम ॥ ईशान्योत्तर वाशिष्ठागम ॥ ह्मणोनि अंशुमानागम ॥ तयाचे द्वादश भेद ॥६२॥ ( कानडी प्रतीवरून–सुवोधागम । प्रवोधागम ॥ वोधांकुरागम । असें सुप्रभेदाचे त्रिभेद ॥१॥ ) विजयतंत्र उद्भवतंत्र ॥ सौम्यतंत्र अघोरतंत्र ॥

---

अमृतागम असे सहा भेद चिंत्यागमाचे होत. (५३) कारणतंत्र, पावनतंत्र, दौर्ग्यतंत्र (दैर्घ्यतंत्र), महेंद्रतंत्र, (५४) भीमतंत्र, मारणतंत्र, ईशान्यतंत्र असे सात भेद कारणागमाचे होत. (५५) प्रभूतागम, वीरोद्भूतागम, पार्वतीतंत्र, पद्मसंहिता असे चार भेद अजितागमाचे होत. (५६) अमेयागम, अप्रतिमागम, आप्यागम, असंख्यागम, अमितौजसागम, आनंदागम, (५७) माधवोद्भूतागम, अद्भूतागम, अमृतागम असें नऊ भेद दीप्तागमाचे होत. (५८) सूक्ष्मसंहिता हा एक भेद सूक्ष्मागमाचा होय. (५९) अतीतागम, अमलागम, शुद्धागम, अप्रमेयागम, ज्योतिर्भावनागम, प्रवुद्धागम, (६०) विवुध्दागम, हस्तागम, अलंकारागम, सुबोधागम असे दहा भेद सहस्रागमाचे होत. (६१) विद्यापुराण, भास्करागम, नीललोहिततंत्र, प्रकरणागम, भूततंत्र, आत्मालंकार, काश्यपागम, गौतमागम, (६२) महेंद्रागम, ब्रह्मागम, वाशिष्ठागम, ईशानोत्तर असें बारा भेद अंशुमानागमाचे होत. (कानडी प्रतीवरून, सुबोधागम, प्रबोधागम, वोधांकुरागम, असे तीन भेद सुप्रभेदागमाचे होत.) (६३) विजयतंत्र, उद्भवतंत्र, सौम्यतंत्र, अघोरतंत्र, मृत्युनाशकतंत्र,

मृत्युनाशनतंत्र ॥ कुबेरतंत्र ॥६३॥ विमलतंत्र ॥ महाघोरतंत्र ॥ ह्मणो
निअष्टप्रकार ॥ विजयागमाचे भेद ॥ ६४ ॥ आणिक निश्वास ॥ उत्तर
निश्वास ॥ निश्वास मुखोदय निश्वास नयन ॥ ६५ ॥ निश्वासकारक
घोरसंहिता सुसांख्य ॥ गुह्य ह्मणोनि मुख्य ॥ निश्वासागमाचे अष्टभे
द ॥६६॥ स्वयंभूत ॥ प्रजापतिमत ॥ पद्मतंत्र ह्मणोनि युक्त ॥ स्वयंभु
वागमाचे त्रिभेद ॥ ६७ ॥ आग्नेय ह्मणोन ॥ अनलागमालागुन ॥ असे
कारण ॥ एक भेद ॥ ६८ ॥ प्रस्तरतंत्र प्रस्फुरतंत्र ॥ प्रबोधतंत्र बोधतं
त्र ॥ बोधकतंत्र ॥ आमोहतंत्र ॥ ६९ ॥ मोहसमयतंत्र ॥ शकटतंत्र ॥
शोकटीयतंत्र ॥ हलतंत्र ॥७०॥ विलेखनतंत्र भद्रतंत्र ॥ वीरतंत्र ह्मणो
नि तंत्र त्रयोदश प्रकार ॥ वीरागमाचे भेद ॥ ७१ ॥ काळदहन रौरवो
त्तर कौमारागम ॥ काळमहाकाळ इंद्रागम॥ह्मणोनि रौरवागम॥षड्भेद
॥७२॥ मकुटमकुटोत्तर । ह्मणोनि विभेदाकार । उभय प्रकार मकुटा
गमाचे भेद ॥७३॥ अनंत भोगागम ॥ आक्रांतागम ॥ हृद्दाहागम ॥ अ
विकृतागम ॥७४॥ उद्भूतागम ॥ मारण तंत्रवर्म ॥ ह्मणोनि विमलागम
तयाचे षड्भेद ॥७५॥ स्थिरसंहिता स्थाणुसंहिता ॥ महासंहिता नं
दिसंहिता ॥ नंदिकेश्वरसंहिता एकपादपुराण ॥ ७६ ॥ शंकरागम ॥

---

(६४) कुबेरतंत्र, विमलतंत्र,महाघोरतंत्र असे आठ भेद विजयागमाचे होत, (६५) निश्वास, उत्तरनिश्वास, निश्वासमुखोदय, निश्वासनयन, (६६) निश्वासकारक घोरसंहिता, सुसांख्य, गुह्य असे आठ भेद निश्वासागमाचे होत. (६७) स्वयंभू प्रजापतिमत, पद्मतंत्र, असे तीन भेद स्वयंभुवागमाचे होत. (६८) आग्नेय नांवाचा एक भेद अनलागमाचा आहे. (६९) प्रस्तरतंत्र, प्रस्फुरतंत्र, प्रबोधतंत्र बोधकतंत्र, *बोधतंत्र* अमोहतंत्र, (७०) मोहसमयतंत्र, शकटतंत्र, शाकटतंत्र हलतंत्र, (७१) विलेखनतंत्र, भद्रतंत्र, वीरतंत्र, असे हे तेरा भेद वीरागमाचे होत. (७२) कालदहन, रौरवोत्तर, कौमारागम, काल, महाकाल, इंद्रागम असे रौरवागमाचे सहा भेद होत. (७३) मकुट, मकुटोत्तर, असे दोन भेद मकुटा गमाचे होत. (७४) अनंतभोगागम, आक्रांतागम, हृद्दाहागम, अविकृतागम (७५) उद्भूतागम, मारणतंत्र, असे सहा भेद विमलागमाचे होत. (७६) स्थिर संहिता, स्थाणुसंहिता, महत्संहिता, नंदिसंहिता, नन्दिकेश्वरसंहिता, एकपादपुराण (७७) शंकरागम, नीलभद्रतंत्र, शिवभद्रागम, कालभेदागम, श्रीमुखागम, शिव

नीलभद्रतंत्र शिवभद्रागम ॥काळभेदागम श्रीमुखागम ॥ शिवशासनागम ॥७७॥ शिवशेखरागम ॥ देवीमतागम ॥ ह्मणोनि चंद्रज्ञानागम ॥ तयाचे चतुर्दश भेद ॥७८॥ चतुर्मुखतंत्र ॥ मलयतंत्र ॥ महायोगसार ॥ संस्तोभागम ॥७९॥ प्रतिबिंबागम ॥ अर्थालंकार ॥ वायुतंत्र कोटकतंत्र ॥ तृटिनीलकर ॥ तुळावृत ॥८०॥ तुळायोग कुट्टिमतंत्र ॥ सर्वशेखर महाविद्या महासार ॥ ह्मणोनि पंचदश प्रकार ॥ बिंबागमाचे भेद ॥८१॥ कवचागम वराहतंत्र ॥ पिंगलमत पशुबंधसंहिता ॥ दंडधरतंत्र-कुशतंत्र ॥ धनुर्धारण ॥८२॥ शिवज्ञान ॥ विज्ञान ॥ त्रिकालज्ञान ॥ आयुर्वेद ॥८३॥ धनुर्वेद सर्पदंष्ट्रविभेद ॥ संगीत भरत आतोद्य ॥ ह्मणोनि षोडश भेद ॥ प्रोद्गीतागमाचे ॥८४॥ ललित ललितोत्तर ॥ कौमारितंत्र विघ्नेश्वर ॥ आगम ह्मणोनि चतुर्थप्रकार ॥ ललितागमासि भेद ॥८५॥ सारोत्तर देवेशोत्तर शाळभेद ॥ शशिमंडळ ह्मणोनि विशेष ॥ चतुर्विधभेद सिद्धागमासि ॥८६॥ लिंगाध्यक्ष ॥ सुराध्यक्ष ॥ शंकरतंत्र ॥ माहेश्वरागम ॥ असंख्यतंत्र ॥ अनिलागम ॥ द्वंद्वागम ह्मणोनि सप्तप्रकार ॥ संतानागमासि भेद ॥८७॥ ( कानडी प्रतीवरून—उत्तरागम ॥ तत्त्वोत्तरागम ॥ विषयोत्तरागम ॥ असे सर्वोत्तरागमत्रिभेद ॥ १ ॥ ) मातंगतंत्र यक्षिणीशास्त्र ॥ पद्मागम सुप्रयोग पौष्कर ॥ हंसागम ॥

---

शासनागम, (७८) शिवशेखरागम, देवीमतागम असे चंद्रज्ञानागमाचे चौदा भेद आहेत. (७९) चतुर्मुखतंत्र, मलययंत्र, महायोग, संस्तोभागम, (८०) प्रतिबिंबागम, अर्थालंकार, वायव्यतंत्र, कौटतंत्र, तृटिनीलकर, तुलावृत, (८१) तुलायोग, कुट्टिमतंत्र, सर्वशेखर, महाविद्या, महासार असे बिंबागमाचे पंधरा भेद आहेत. (८२) कवचागम, वराहतंत्र, पिंगळमत, पशुबंधसंहिता दण्डधरतंत्र, कुशतंत्र, धनुर्धारण; (८३) शिवज्ञान, विज्ञान, त्रिकालज्ञान, आयुर्वेद, (८४) धनुर्वेद, सर्पदंष्ट्रविभेद, संगीत, भरत, आतोद्य, असे प्रोद्गीतागमाचे सोळा भेद आहेत. (८५) ललित, ललितोत्तर, कौमारतंत्र, विघ्नेश्वरागम, असे ललितागमाचे चार भेद आहेत. (८६) सारोत्तर, देवेशोत्तर, शालभेद, शशिमंडल, असे सिद्धागमाचे चार भेद आहेत. (८७) लिंगाध्यक्ष, सुराध्यक्ष, शंकरतंत्र, महेश्वरागम, असंख्यतंत्र, अनिलागम, द्वंद्वागम, असे संतानागमाचे सात भेद आहेत. ( कानडी प्रतीवरून—उत्तरागम, तत्त्वोत्तरागम, विषयोत्तरागम, असे सर्वोत्तरागमाचे तीन भेद होत. ) (८८) मातंगतंत्र, यक्षणीशास्त्र, पद्मागम, पौष्कर, सुप्रयोग, हंसागम, सामान्यागम असे पारमेश्वरागमाचे सात भेद

सामान्यागम ह्मणोनि पारमेश्वर ॥ आगमाचे सप्त भेद ॥८८॥ गारुडा-
गम नैऋत्यागम ॥ नीलतंत्र रूक्षागम भानागम ॥ वैक्रमागम ॥ ८९॥
काळतंत्र ॥ बुद्धागम ॥ प्रबुद्धागम ॥ ह्मणोनि किरणागम ॥ तयाचे नव
भेद ॥९०॥ वातुळ ॥ उत्तरवातुळ ॥ काळज्ञान पराजित ॥९१॥ सर्वा-
गम सर्वेष्टागम ॥ श्रेष्ठागम ॥ नित्यागम ॥ शुद्धागम ॥९२॥ महानगागम
विश्वासागम ॥ विश्वात्मकागम ॥ ह्मणोनि वातुळागम ॥ तयाचे द्वा-
दश भेद ॥९३॥

## आगमसार.

(कानडी प्रतीवरून—ऐसे एकशे अठ्याणव भेदाचे ॥ शिवरुद्रागम
जाणा त्याचे ॥ जन्म साक्षात्सदाशिवाचे ॥ पंचमुखची होय ॥ १॥
ईशान श्रुतीला अनुसरून ॥ अठरा महाविद्या जाण ॥ अठरा उपनि-
षद्विद्या जाण ॥ आणिक चौसष्ट विद्याकला ॥२॥ चौसष्ट तंत्रे चौसष्ट
उपतंत्रे ॥ उत्पन्न होऊन इहपर सुखातें ॥ झाले कारणीभूत ॥ आणिक
सकल ॥३॥ मत कुल कर्म धर्म ॥ शिल्प व्यापार वर्म ॥ हे सर्व ग्रंथ शि-
वागमापासून झाले ॥४॥ सर्व प्रपंच शिवागमापासून ॥ समजावयास
योग्य जाण ॥ ह्मणोनि सर्व प्राण ॥ शैव जाणा ॥५॥ )

---

आहेत. (८९) गारुडागम, नैऋतागम, नीलतंत्र, रूक्षागम, भानागम, वैक्रमागम
बुद्धागम, (९०) प्रबुध्दागम, कालतंत्र, असे किरणागमाचे नऊ भेद आहेत. (९१)
वातुल, उत्तरवातुल, कालज्ञान पराजित, सर्वागम, (९२) सर्वेष्टागम, श्रेष्ठागम
नित्यागम, शुद्धागम, (९३) महदागम, विश्वासागम, विश्वात्मकागम, असे वा-
तुलागमाचे बारा भेद आहेत.

## आगमसार

(कानडी प्रतीवरून—याप्रमाणें एकशे अठ्याणव भेदाचे असलेले शिवरुद्रागम
साक्षात सदाशिवाचीं पंचमुखेंच उदित झालीं आहेत "ईशानः सर्व विद्यानाम्" श्रु-
श्रुत्यर्थाला अनुसरून, १८ महाविद्या, १८ उपनिषद्विद्या, ६४ विद्याकला, चौसष्ट तंत्रें,
चौसष्ट उपतंत्रें उत्पन्न होऊन इहपरसुखाला कारणीभूत झाले आहेत आणि स-
कल, मत, कुल, कर्म, धर्म, शिल्प, व्यापार, रहस्य, हे सर्व ग्रन्थ शिवागमापा-
सूनच उत्पन्न झालेले असल्यामुळें, सर्व प्रपंच शिवागमापासूनच समजावयास योग्य
झालेला आहे अर्थात सर्व जीव शैव झाले आहेत. )

## आगमप्रतिपाद्य.

आणिक सर्वांगमांत क्रियापाद ॥ चर्यापाद योगपाद ॥ आणिक ज्ञानपाद ॥ ह्मणोनि चतुष्पाद ॥९४॥ पति कुंडलिनी माया ॥ पशुपाश-कांक्षा ह्मणोनियां ॥ षट्पदार्थनिर्णय गुरूचिया ॥ मुखें होय तें ज्ञान ह्मणवी ॥९५॥ पत्यादिपदार्थरूप ह्मणवी ज्ञेय ॥ लिंगार्चन ह्मणवी अनुष्ठान ॥ भस्मधारणात्मक आपण ॥ अधिकृत ह्मणवी ॥९६॥ शिवमंत्ररूप तें ह्मणवी साधन ॥ शिवसमानत्व पूर्ण ॥ मुक्तरूप सह लक्षण ॥ तें साध्य ह्मणवी ॥९७॥ इति षट्पदार्थ प्रतिपाद्य ह्मणवी ॥

## पादादिविषय.

त्याचेठायीं ॥ प्रथम क्रियापादांत विशेषत्व ॥ आत्म्याचें पशुत्व क्षयत्व शिवत्व ॥ अभिव्यक्ति ॥९८॥ नित्यादिक कारण ॥ कर्म अधिकारत्व निपुण ॥ तें अधिकारसंपादन ॥ लक्षण ह्मणवी ॥९९॥ शिवक्रिया शक्तिरूप ते ॥ दीक्षा ह्मणवी निरुतें ॥ ते दीक्षाविशेषयुक्त ॥ झाले शैव ॥ ते कवण ह्मणतिले तरी ॥१००॥ अनादिशैव ॥ आदिशैव महाशैव-अनुशैव ॥ अवांतरशैव ॥१०१॥ प्रवरशैव ॥ अंतरशैव ह्मणिजे सप्तशैव ॥ त्याचे ठायीं ॥१०२॥ शिव तो अनादिशैव ॥ शिवाच्या पंचमुखा-

---

## आगमप्रतिपाद्य.

(९४) त्यानंतर सर्व आगमांमध्यें क्रियापाद, चर्यापाद, योगपाद, ज्ञानपाद, असे चार पाद आहेत. (९५) पति, कुण्डलिनी, माया, पशु, पाश, कांक्षा यां षट् पदार्थांचा निर्णय गुरुमुखानें जो होतो त्याला ज्ञान असें ह्मणतात. (९६) पत्यादि पदार्थरूप ज्ञेय, लिंगार्चनलक्षणरूप अनुष्ठेय, भस्मधारणात्मकलक्षणरूप अधिकार, (९७) शिवमंत्ररूप साधन, शिवसमानतामुक्तिरूप साध्य. हे सहा पदार्थ प्रतिपाद्य होत.

## पादादिविषय.

(९८) त्यांमध्यें प्रथम क्रियापादांत विशेषेंकरून आत्म्याचे ठिकाणीं असलेल्या पशुत्वाचा क्षय, शिवसाक्षात्कार, (९९) नित्य कर्माधिकारित्व वगैरेचीं लक्षणें सांगितलीं आहेत. (१००) दीक्षा ह्मणजे शिवाच्या क्रियाशक्तिस्वरूप आहे अशा दीक्षेनेंयुक्त कांहीं शैव आहेत त्यांचा प्रकार सांगतात. (१०१) अनादिशैव आदिशैव, महाशैव, अनुशैव, अवांतरशैव, (१०२) प्रवरशैव, अंतरशैव असे सात तऱ्हेचे शैव आहेत त्यांमध्यें (१०३) शिव अनादिशैव आहे. नंतर श्रीशि-

पासाव दीक्षित झाले कौशिकादि ऋषि सर्व ॥ ते आदिशैव ह्मणवी ॥१०३॥ ते ऋषिवंशज दीक्षित झाले परिख्यात ॥ द्विजकुल समस्त ॥ ते महाशैव ॥१०४॥ शिवसंस्कारी मानव ॥ क्षत्रिय ते अनुशैव ॥ शैवदीक्षासंपन्नशूद्र सर्व ॥ ते अवांतर शैव ॥ १०५ ॥ शिवदीक्षायुक्त॥ झाले कृतनिश्चयव्रत ॥ अंबष्ठकुलालादि समस्त ॥ ते प्रवर शैव॥१०६॥ शिवदीक्षान्वित ॥ झाले विशेषजातिसमस्त ॥ ते ह्मणविती यथार्थ अंतरशैव ॥ १०७ ॥

## शैवभेद.

आणिक तया शैवांत ॥ वाम दक्षिण मिश्र सिध्दांत ॥ ह्मणोनि चार प्रकार ॥ होऊनि असे ॥१०८॥ त्याचे ठायीं ॥ शक्तितत्पर ते ॥ वाम ह्मणविती निरुते ॥ भैरवतत्पर ते ॥ दक्षिण ह्मणविती ॥ १०९॥ सप्तमातृकातत्पर ते मिश्र ह्मणविती साचार ॥ परशिवतत्पर ॥ ते सिद्धांत ह्मणविती ॥११०॥ आणिक या समस्त ॥ शैवाचे ठायीं युक्त॥ मुख्य झाले कुत्यें ॥ निश्चयें शैव ॥१११॥ सामान्यशैव मिश्रशैव ॥ शुद्धशैव वीरशैव ॥ ह्मणोनि चतुर्विध शैव ॥ त्याचे ठायीं ॥११२॥

---

वाच्या पंचमुखापासून कौशिकादि सर्व ऋषि दीक्षित झाले. ते सर्व आदिशैव होत. (१०४) त्या ऋषिवंशापासून जो विस्तार वाढला ते सर्व ब्राह्मण महाशैव होत. (१०५) शिवसंस्कार झालेले ते क्षत्रियच अनुशैव होत. शिवदीक्षासंपन्न वैश्य हेच अवांतरशैव होत. शिवदीक्षायुक्त शूद्र (१०६) अंबष्ठ, कुलाल वगैरे लोक प्रवरशैव होत. (१०७) शिवदीक्षायुक्त विशेष जातींतील इतर सर्व लोक अंतरशैव होत.

## शैवभेद.

(१०८) आणि त्या शैवांमध्यें वाम, दक्षिण, मिश्र, सिद्धांत असे चार प्रकार झाले आहेत. (१०९) त्यामध्यें शक्तितत्पर जे आहेत, त्यांला वामशैव असें ह्मणतात. आणि भैरवतत्पर ( भैरवानुष्ठान करणारे ) जे आहेत त्यांला दक्षिणशैव असें ह्मणतात. (११०) सप्तमातृकातत्पर जे आहेत त्यांला मिश्रशैव असें ह्मणतात. आणि परशैवतत्पर जे आहेत, त्यांला सिद्धांतशैव असें ह्मणतात. (१११) नंतर या सर्व शैवांमध्यें मुख्य शैव झाले ते असें कीं, (११२) सामान्यशैव, मिश्रशैव, शुद्धशैव, वीरशैव असे चार भेद झाले आहेत. त्यांमध्यें—

## सामान्यशैवलक्षण.

कोणी एक श्रीमद्विभूतिधारण ॥ मात्रें शुद्धात्मा होऊन ॥ स्वयंभुलिंग नातरि अन ॥ देवदानव ॥११३॥ ऋषिमानवादिक ॥ प्रतिष्ठालिंग प्रत्यक्ष ॥ देवतानमस्कारपूर्वक ॥ प्रदक्षणेसि ॥ ११४॥ पूजाविधान करी यथाशक्ति ॥ शिवभक्ति जनासि अति प्रीति ॥ शिवावधानरति॥ शिवार्चन ॥११५॥ शिवार्थव्यापार ॥ शिवकथाश्रवण इच्छा आदर ॥ शिवध्यानतत्पर ॥ शिवानुकूल होऊनि ॥११६॥ परम सात्विकें संतत ॥ अष्टविधभक्तियुक्त ॥ होऊनि असे रत ॥ तो सामान्यशैव ह्मणवी॥११७॥

## मिश्रशैवलक्षण.

आणिक पीठार्चनीं शिवलिंगपूजक ॥ विष्णु उमा षण्मुख ॥ विघ्नेश्वर सूर्य इत्यादि मुख्य ॥ पंचायतनपूजा ॥११८॥ ब्रह्मेंद्रादिदेवताराधन ॥ ते ते मंत्र जपध्यान ॥ शिवसर्वात्मक ह्मणोन ॥ समताबुद्धि॥११९॥ सकळ देवता विष्णुआदि करून ॥ दृग्भाव शिवभक्त ह्मणोन ॥ असे समानभक्तियुक्त होऊन ॥ तो मिश्रशैव ह्मणवी ॥१२०॥

## शुद्धशैवलक्षण.

आणिक जो अनादिशैव ॥ आपण सदाशिव ॥ त्याच्या पंचमुखां-

---

### सामान्यशैवलक्षण.

(११३) कोणी एक मानव विभूति धारणानें शुद्ध होऊन स्वयंभुलिंगाची किंवा देव, दानव, (११४) ऋषि, मानव यांनीं स्थापना केलेल्या लिंगाचें दर्शन झाल्याबरोबर पूजा, नमस्कार, प्रदक्षिणा (११५) वगैरे यथाशक्ति करून शिवभक्तांवर प्रीति, शिवध्यानांत रति शिवार्चना (११६) श्रीशिवांकरतांच व्यापार, शिवकथाश्रवण, शिवध्यानतत्पर, शिवानुकूल वगैरे (११७) परमसात्विक अष्टविध भक्तीनें युक्त जो असतो तोच सामान्यशैव होय.

### मिश्रशैवलक्षण.

(११८) आणिक पीठावर शिवलिंग पूजा करतांना विष्णु, उमा, षण्मुख, विघ्नेश्वर, सूर्य अशा पंचायतनाची पूजा करणारे व (११९) त्याप्रमाणें ब्रह्मेंद्रादि देवतांची आराधना करणारे, व त्या त्या मंत्राचा जप करणारे, आणि ध्यान करणारे व शिवच सर्वात्मक आहे असें समजणारे (१२०) समताबुद्धीनें वागणारे, व विष्णु वगैरे देव शिवभक्त आहेत असें समजणारे असे ते लोक मिश्रशैव होत.

### शुद्धशैवलक्षण.

(१२१) अनादिशैव अशा सदाशिवाच्या पंचमुखापासून दीक्षा घेतलेले

पासाव ॥ दीक्षित झाले ॥ १२१ ॥ कौशिक काश्यप भरद्वाज मुनी ॥ अत्रिगौतमादिकरूनि ॥ शैवगोत्रसंभव होऊनि ॥ महाशैव ह्मणविती ॥ १२२ ॥

## शुद्धशैवविषय.

तेचि शुद्धशैव वेदागम पुराण ॥ इतिहाससूत्रभाष्यादिकरूनि ॥ सकळशास्त्रसंपन्न ॥ युक्त होऊन ॥ १२३ ॥ स्थूलसूक्ष्मकारण ॥ ह्मणिजे शिवलक्षण ॥ शुद्ध मिश्र संकीर्ण ॥ ह्मणिजे शिवस्वरूप ॥ १२४॥ शिवाकर्षणादि मुख्य॥ सकळदेवता आकर्षणादिक ॥ लिंगप्रतिष्ठादि सकळिक ॥ देवताप्रतिष्ठा ॥१२५॥ लिंगस्थापनादि सर्व॥ देवतास्थापन नित्योत्सव॥ मासोत्सव रथोत्सव ॥ इत्यादि सत्क्रियायुक्त ॥१२६॥ पुष्प गंध मधु इक्षु मेळवून ॥ नारिकेळ क्षीर रजनीचूर्ण ॥ सर्पि तैल जल वन आदिकरून ॥१२७॥ शिवाचे एकादशक ॥ विधि उत्सव सकळ सांगिक ॥ विचारें शिवार्चनक ॥ तत्पर सर्वदा ॥ १२८॥ आणिक येथें सूर्यार्चनें आरोग्य ॥ इंद्रार्चनें सौभाग्य ॥ अग्न्यर्चनें ऐश्वर्यभोग ॥ यमार्चनें पितृयान ॥१२९॥ वाचार्चनें बल होय ॥ दुर्गार्चनें विजय ॥ सरस्वत्यर्चनें निश्चयें ॥ वाचासिद्धि ॥ १३० ॥ लक्ष्म्यर्चनें संपदावृद्धि॥

---

( १२२ ) कौशिक, कश्यप, भरद्वाज, अत्रि, गौतम वगैरे शैवऋषींच्या वंशांत उत्पन्न झालेले जे महाशैव आहेत तेच शुद्धशैव होत.

## शुद्धशैवविषय.

(१२३) शुद्धशैव हे वेद, आगम पुराण, इतिहास, सूत्र, भाष्य वगैरे सर्व शास्त्रांत निष्णात असून (१२४) स्थूल, सूक्ष्म, कारण रूप शिवलक्षणें, शुद्ध, मिश्र, संकीर्णरूप शिवस्वरूपें, (१२५) शिवाकर्षण, सकलदेवताकर्षण व लिंगप्रतिष्ठा वगैरे सर्व देवताप्रतिष्ठा, ( १२६) लिंगस्थापनादि सर्व देवतास्थापनें, नित्योत्सव, मासोत्सव, रथोत्सव, वगैरे क्रिया, (१२७) यांनीं युक्त असून पुष्प, गंध, मधु, इक्षु ( ऊंस ), नारळ, दूध, हळद, तूप, तेल, जल, वन (१२८) असे शिवाचे एकादशोत्सव चांगल्या तऱ्हेनें जाणणारे असतात व शिवपूजातत्पर असतात. (१२९) नंतर सूर्यपूजेनें आरोग्य, इंद्रपूजेनें सौभाग्य, अग्निपूजेनें ऐश्वर्यभोग, यमपूजेनें पितृयान, (१३०) वायुपूजेनें बळ, दुर्गापूजेनें विजय, सरस्वतीपूजेनें वाचासिद्धि, (१३१) लक्ष्मीपूजेनें संपत्तीची वृद्धि, षण्मुखपूजेनें इष्टसिद्धि, चंद्रपूजेनें चित्तशुद्धि

षण्मुखार्चनें इष्टसिद्धि ॥ चंद्रार्चनें चित्तशुद्धि ॥ कीर्ति प्रबळ ॥१३१॥ ब्रह्मार्चनें ब्राह्मण्य ॥ शांति आदि सद्गुण ॥ विष्णवर्चनें देवयान ॥ मुमुक्षुत्व ॥१३२॥ विघ्नेश्वरार्चनें कार्यसिध्दि ॥ गुरुभक्तीविषयीं वृध्दि ॥ श्रीगुरुअर्चनें श्रवणादि ॥ ज्ञानसाधन ॥१३३॥ श्रीपार्वत्यर्चनें संपत्सुविवेक ॥ श्रीशिवार्चनें अनेक ॥ भोगमोक्षादि ज्ञानयोग मुख्य ॥ सकळसिद्धि ॥१३४॥ सकाम निष्काम क्रिया ॥ भेदें करूनिया ॥ सिद्धि होय ह्मणोनिया ॥ निश्चयें जाणावें ॥१३५॥ आणिक ते समस्त शैव क्रियेसि कारण ॥ श्रीमद्विभूतिधारण मुख्य असे त्यालागीं तद्विधान ॥ येथें शुद्धशैवें जाणावें ॥१३६॥

## विभूतिभेद.

(कानडी प्रतीवरून—विभूतिविधान ॥ शैवास मुख्य साधन ॥ तयाचें ज्ञान ॥ शैवें संपादावें ॥ १ ॥) सद्योआदि ब्रह्मपंचक ॥ पृथ्व्यादि भूतपंचक ॥ निवृत्त्यादि कळापंचक ॥ अनुक्रमें ॥१३७॥ नंदा ते कपिलवर्ण ॥ भद्रि ते कृष्ण सुरभि ते रक्तवर्ण ॥ सुशीला ते श्वेतवर्ण ॥ विचित्रवर्ण ते सुमना ॥ ह्मणोनि परिक्षून ॥१३८॥ कृशांगादि दोषरहित ॥ सकळ लक्षणयुक्त ॥ पंचगोपासावजनित ॥ जालें तें ॥ १३९ ॥ निर्मळ गोमय दुर्गंधादिक ॥ दोषरहितपूर्वक ॥ तें गोमय मुख्य आणूनिया ॥१४०॥

---

व प्रबळ कीर्ति (१३२) ब्रह्मपूजेनें ब्राह्मण्य व शांत्यादि सद्गुण, विष्णुपूजेनें देवयान व मुमुक्षुत्व, (१३३) गणपति पूजेनें कार्यसिद्धि व गुरुभक्तीची वृद्धि, श्रीगुरुपूजेनें श्रवणादि ज्ञानसाधन, (१३४) श्रीपार्वतीच्या पूजेनें, संपत्ति व विवेक, श्रीशिवपूजेनें मोक्षादिज्ञान सिद्धि, व ज्ञानयोग वगैरे सकलसिद्धि, (१३५) व सकाम निष्कामभेदानें सर्व सिद्धि प्राप्त होतात, असें निश्चयानें जाणून (१३६) या सर्व शैवक्रियेला विभूतिधारणच मुख्य आहे असें शुद्ध शैवानें जाणावें.

## विभूतिभेद.

विभूतिविधानज्ञान शैवांस मुख्य असल्यामुळें तें त्यांनीं संपादावें (१३७) सद्योजातादि पंचब्रह्म, पृथिव्यादि पंच महाभूतें, निवृत्त्यादि पंच कळा व अनुक्रमानें (१३८) कपिलवर्णाची नंदा, काळ्यावर्णाची भद्रा, तांबड्या रंगाची सुरभि, पांढऱ्या वर्णाची सुशीला, चित्रवर्णाची सुमना, अशा तऱ्हेनें गायींची परीक्षा करून (१३९) व या गायी कृशांगादि दोषांनीं रहित असाव्यात व लक्षणयुक्त असाव्यात. अशा गायींचें (१४०) निर्मळ (दुर्गंध वगैरे दोष रहित) गोमय

प्रणवपूर्वक ॥ सद्योजातादि पंचक ॥ ब्रह्ममंत्रें विशेष ॥ अनुक्रम ॥१४१॥ ग्रहण कवळण ॥ शोषण दहन ॥ शोधन ह्मणोन ॥ पंचक्रियेनें ॥ १४२ ॥ विभूति भसित भस्म पुढती ॥ क्षार रक्षा ह्मणोनि ख्याति ॥ पंचविध विभूति ॥ क्रमें उदित झाली ॥ १४३ ॥ तें कारण सर्व ऐश्वर्यातें ॥ सर्वावभासकत्वातें ॥ सर्वअघातें ॥ भर्त्सन कारि तें ॥ १४४ ॥ आपदुरक्षणत्वासि ॥ भूतप्रेतविवशी ॥ भीत रक्षणत्वाशी ॥ तें तें नाम प्रगटलें ॥ १४५ ॥ सकळ परिजगत ॥ तयासि हितार्थ ॥ होऊनि असे सर्व भसित ॥ तरी येथें (कानडी प्रतीवरून—नंदादि पंचगोवर्ण क्रमप्राप्त ॥ विभूत्यादि नामयुक्त ॥ नित्यनैमित्तिक काम्य प्रायश्चित्त ॥ मुक्तिरूप पंच क्रियांसी ॥१॥ क्रमानें योग्य प्राप्त ॥ ऐसें भूत्यादि समस्त ॥ दूर करिती पापजात ॥ त्याचे ठायीं ॥२॥ ) ॥ १४६ ॥ कल्प अनुकल्प ॥ उपकल्प अकल्प ॥ ह्मणोनि चतुर्विध प्रतिरूप ॥ असे त्याचे ठायीं ॥ ( कानडी प्रतीवरून— पूर्वोक्त कबलनादिविधिकृत तें ॥ कल्प गोमय तें वनस्थ ॥ चूर्ण करोनी दग्धीकृत ॥ तें अनुकल्प जाणा॥१॥

---

( शेण ) (१४१) प्रणवपूर्वक सद्योजातादि पंचब्रह्ममंत्रांनीं अनुक्रमानें ( १४२) ग्रहण, कवळन, शोषण, दाहन, शोधन अशा पांच क्रियांनीं संस्कृत करून तयार केल्यानंतर (१४३) विभूति, भसित, भस्म, क्षार, रक्षा अशीं पांच नांवें प्राप्त होतात. (१४४) सर्व ऐश्वर्य प्राप्ति होते ह्मणून विभूति हें नांव आलें. सर्व ठिकाणीं प्रकाश होतो ह्मणून भसित हें नांव आलें. सर्व पापांचा संहार करिते ह्मणून तिला भस्म हें नांव आलें. (१४५) आपत्कालीं रक्षण करते ह्मणून तिला क्षार असें नांव आलें. भूतप्रेतांपासून भीति येत नाहीं ह्मणून तिला रक्षा असें ह्मणतात. याप्रमाणें अशीं नांवें आलीं आहेत; (१४६) आणि या सर्व विभूति जगाच्या हिताकरितां या लोकांत उत्पन्न झाल्या आहेत ( कानडी प्रतीवरून—यानंतर नन्दा वगैरे पांच गोपींनीं अनुक्रमानें विभूति वगैरे जीं भस्में उदित झालीं तीं नित्य, नैमित्तिक, काम्य, प्रायश्चित्त, मुक्ति अशा पांच क्रियांला क्रमानें योग्य झालीं आहेत. ) (१४७) त्यांमध्यें कल्प, अनुकल्प, उपकल्प, अकल्प असे चार प्रकार झाले आहेत. ( कानडी प्रतीवरून—पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ग्रहण, कबलन वगैरे विधींनीं तयार केलेल्या विभूतिला कल्प असें ह्मणतात. रानांत असलेलें गोमय ( रानशेणी ) त्याचें चूर्ण करून तयार केलेल्या विभूतीला अनुकल्प असें ह्मणतात. प्रथम एकदां द-

गोमय तें प्रथम दग्ध ॥ तयाचा करोनी वस्त्रशोध ॥ गोमूत्रमिश्र करोनी विविध॥ गोलक ते करावे ॥२॥नन्तर पूर्वोक्त विधीनें ॥ चांगुलें पक्व करोन ॥ तयासी ह्मणती सुजन ॥ उपकल्प यापरि ॥३॥ प्रथम दग्ध गोमूत्रगोलक ॥ अन्यकृत तें भस्मक ॥ तया ह्मणती सकळक ॥ अकल्प देखें ॥४॥ ) ॥१४७॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य इति ॥ त्रय वर्गांते संमत युक्ति ॥ अग्निहोत्रज विभूति ॥ योग्य होऊनि असे॥१४८॥ग्रहस्थाश्रमीयांतें ॥ विरजानलाग्निजोपासनाग्निनें निरुतें ॥ उदित झालें भस्म तें ॥ योग्य असे ॥१४९॥ ब्रह्मचर्यासि विहित ॥ समिधाग्नीनें उदित ॥ झालें तें भसित ॥ योग्य असे॥१५०॥शूद्रासि श्रोत्रियाचें ॥ अगारपचनाग्नीचें ॥ उदित झालें भस्म तें साचें ॥ योग्य असे ॥१५१॥ उरलिये समस्त ॥ जातीसि दावाग्नीचें उदित ॥ झालें तें भसित ॥ योग्य असे॥१५२॥यतीसि सकळ ठायींचें ॥ भस्म योग्य असे साचें ॥ अत्याश्रमियासि श्मशानिचें ॥ भस्म योग्य असे॥१५३॥लोकमात्र समस्त ॥ तयांसि विहित ॥ शिवालयाचें भसित ॥ योग्य असे ॥१५४॥

## विभूतिधारण.

आणिक ते विभूति लागून ॥ स्नानधूलनधारण ॥ त्रिविध आचरण

---

हन करून पुनः तेंच वस्त्रानें शोधून गोमूत्रानें कालवून गोळा करून पूर्वोक्तविधीनें तयार केलेल्या विभूतीला उपकल्प असें ह्मणतात. आणि प्रथम दहन केलेलें तेंच दुसऱ्याकडून पूर्वोक्त विधीनें तयार करवलेल्या विभूतीला अकल्प असें ह्मणतात. ) (१४८) त्यांमध्यें अग्निहोत्रजविभूति ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या त्रिवर्गाला योग्य झाली आहे. (१४९) गृहस्थ आश्रम्याला विरजाग्नीपासून व औपासनाग्नीपासून तयार झालेलें भस्म योग्य आहे असें जाणावें. (१५०) ब्रह्मचाऱ्याला समिधाग्नीनें तयार झालेलें भसित योग्य आहे असें जाणावें. (१५१) शूद्राला श्रोत्रियाच्या घरीं पचनाग्नीनें तयार झालेली विभूति योग्य आहे असें जाणावें. (१५२) उरलेल्या सर्व जातींला दावाग्नीनें उत्पन्न झालेलें भस्म योग्य आहे असें जाणावें. (१५३) सन्यास्याला सर्व तऱ्हेची विभूति योग्य आहे असें जाणावें आणि अत्याश्रम्याला श्मशानांतलें भस्म योग्य आहे असें जाणावें. (१५४) सर्व लोकांला शिवालयांतील भस्म योग्य आहे असें जाणावें.

### विभूतिधारण.

(१) आणि त्या विभूतिधारणामध्यें स्नान, उध्दूलन, धारण असे तीन प्र

आचरावें ॥ १ ॥ प्रथम हस्तपादमुख ॥ करून प्रक्षालनादिक ॥ सुस्थळीं स्वस्ति—कासनापूर्वक ॥ बैसोनिया ॥ २ ॥ प्राणायामत्रय करून ॥ वरि भस्मस्नान ॥ करितों ह्मणोन ॥ संकल्पावें ॥ ३ ॥ वरि दृढरूप बिल्व चूत ॥ अशोकशिलावस्त्रादिरचित ॥ आधारिंआतसुस्थित होऊनि असे ॥ ४ ॥ ती श्रीमद्विभूति ॥ कुरंगमुद्रायुक्ति ॥ सद्यो आदि पंक्ति ॥ पञ्चब्रह्ममूर्तिमन्त्रपूर्वक काढावी ॥ ५ ॥ परि वामहस्त घेऊन ॥ नमस्कारमंत्र उच्चारून ॥ मग वरि आच्छादून दक्षिणकर ॥ ६ ॥ दक्षिण मांडीवरी ठेवून॥मूळ मन्त्रें सहा वेळा मन्त्रून॥ नातरि अग्निरिति ह्मणोन ॥ या मन्त्रेंवरि मन्त्रिजे ॥ ७ ॥ मग मानस्तोकेति मन्त्रों उचलूनिया ॥ शिरमुख हृदय गुह्य ॥ पाद सर्वांग ह्मणिजे या ॥ षट्स्थानीं ॥ ८ ॥ तें तें मंत्रानुसंधान ॥ करित उच्चारण॥ अनुक्रमें ईशानादि कारण ॥ पंचब्रह्मप्रणव मंत्रें ॥ ९ ॥ सृष्टिस्थिति संहार परि ॥ क्रमें जाणोनि मात्रांतरीं ॥ संप्रोक्षण करूनि द्यावें करीं ॥ तें स्नान ह्मणवी ॥ १० ॥ आणिक शिरसादि करून ॥ षट्स्थानीं॥ ते ते मंत्र उच्चारूनि ॥ अनुक्रमें ॥ ११ ॥ पंच वेळां चार वेळां ॥ अष्ट वेळां त्रयोदश वेळां ॥ पुनः अष्ट वेळां ॥ एक वेळां ॥१२॥ अनुलेपन॥ करणें इहि लक्षण ॥ तें उत्धूलन ॥ ह्मणवी निरुतें ॥ १३ ॥ आणिक

---

कारचे आचार आहेत. (२) प्रथम हस्त, पाद, मुख प्रक्षालन करून उत्तम जागेंत स्वस्तिकासन घालून बसावें. (३) नंतर प्राणायामत्रय करून मी भस्मस्नान करितों असा संकल्प करावा. (४) नंतर दृढ (मजबूत) बिल्व, आंबा, अशोक, शिला, वस्त्र इत्यादिकांनीं रचलेल्या आधारपात्रांत सुरक्षितपणें असलेलें (५) भस्म कुरंगमुद्रेनें सद्योजातादि पंचब्रह्ममंत्रपूर्वक डाव्या हातांत घेऊन (६) नमस्कार मंत्राचा उच्चार करून डाव्या हातावर उजवा हात (७) ठेवून ते उजव्या मांडीवर ठेवून मूलमंत्रानें किंवा अग्निरिति वगैरे मंत्रानें सहा वेळां अभिमंत्रण करून (८) मग "मानस्तोके" या मंत्रानें उचलून शीर, हृदय, मुख, गुह्य, पाद, सर्वांग अशा सहा स्थानांवर (९) त्या त्या मंत्राचा उच्चार करीत व अनुक्रमानें ईशानादि पंचब्रह्मप्रणवमंत्रांनीं (१०) सृष्टिस्थिति संहाराचा क्रम जाणून भस्माचें संप्रोक्षण करून घेणें याला भस्मस्नान असें ह्मणतात. (११) आणि मस्तक वगैरे सहा स्थानांवर त्या त्या मंत्राचा उच्चार करून (१२) पांच वेळां, चार वेळां, आठ वेळां, तेरा वेळां, एक वेळां (१३) अनुलेपन करून घेणें याला उध्दूलन असें ह्मणतात. (१४) नंतर ब्राह्मण चतुरा-

येथें ॥ ब्राह्मणातें ॥ चतुराश्रमीयातें ॥ सर्वांग उत्धूळण योग्य ॥ १४ ॥ क्षत्रिया लागून ॥ मुख मात्र सोडून ॥ उत्धूळण ॥ योग्य ॥ १५ ॥ वैश्यासि ललाट मात्र ॥ उध्दूळन योग्य ॥ शूद्रासि धारण मात्र ॥ करावया योग्य ॥ १६ ॥ आणिक सुशीतळ मंत्रोदक ॥ मिश्रित केलिया विभूति मुख्य ॥ मूळ मंत्र त्रियायुष ॥ मंत्र त्रियंबक मंत्र उच्चारुनि ॥ १७ ॥ शिवमूर्ति ध्यानयुक्त होऊन ॥ धरावें त्रिपुंड्र धारण ॥ तीं स्थानें कवण कवण ॥ ह्मणितलें तरी ॥ १८ ॥ मूर्ध्नि ललाट कर्णद्वय ॥ नेत्रद्वय घ्राण मुख बाहुद्वय ॥ भुजद्वय मणिबंधद्वय ॥ स्तनद्वय ॥ १९ ॥ वक्ष उदर पार्श्वद्वय ॥ नाभी मेंढ्र पायु पृष्ठ ऊरुद्वय ॥ जानुद्वय जंघाद्वय पादद्वय ॥ इति बत्तीस स्थानें ॥ २० ॥ आणिक शिर भाळ कर्णयुग्म ॥ ओष्ठयुग्म ॥ कंठ बाहुयुग्म ॥ भुजद्वय ॥ २१ ॥ मणिबंधद्वय हृदय ॥ पृष्ठ नाभि इति हिये ॥ ह्मणविती निश्चये ॥ षोडश स्थानें ॥ २२ ॥ मस्तक ललाट ग्रीवा स्थळ ॥ बाहुद्वय हृदय नाभिकमळ ॥ पृष्ठ ह्मणिजे अष्टकुळ ॥ स्थानें ह्मणवी ॥ २३ ॥ त्याचे ठायीं ॥ शिर ललाट श्रोत्रद्वय कंठ ॥ भुजद्वय वक्ष पृष्ठ ॥ नाभिस्कंध इति एकादश श्रेष्ठ ॥ स्थान मुख्य होऊनि असे ॥ २४ ॥ त्याचे ठायीं सितपद्मासन शुद्ध ॥ स्फटिक

---

श्रमी यांना सर्वांगावर उध्दूलन करण्याचा अधिकार आहे. (१५) क्षत्रियांस मुख मात्र सोडून सर्वांगावर उध्दूलन करावयाचा अधिकार आहे. (१६) वैश्यांस केवळ ललाटावर उध्दूलन करून घेण्याचा अधिकार आहे, शूद्रास केवल धारण करण्याचा अधिकार आहे. (१७) नंतर उत्तम शीतल मंत्रोदकानें मिश्रित विभूति घेऊन मूलमंत्र त्रियंबकमंत्र त्रियायुषमंत्र यांचा उच्चार करून (१८) शिवमूर्ति ध्यानयुक्त होऊन त्रिपुंड्र धारण करावें. तीं स्थानें अशीं कीं, (१९) मस्तक, ललाट, कर्णद्वय, नेत्रद्वय, नाक, मुख, बाहुद्वय, भुजद्वय मणिबन्धद्वय, स्तनद्वय (२०) वक्ष, उदर, पार्श्वद्वय, नाभि, मेंढ्र, पायु, पृष्ठ, ऊरुद्वय, जानुद्वय, जंघाद्वय, पादद्वय अशीं बत्तीस स्थानें होत. (२१) नंतर मस्तक, भाल, कर्णयुग्म, ओष्ठयुग्म, कंठ, भुजद्वय, बाहुद्वय, (२२) मणिबंधद्वय, हृदय, नाभि, पृष्ठ अशीं षोडश स्थानें होत. (२३) नंतर मस्तक, ललाट, कंठ, बाहुद्वय, हृदय, नाभि अशीं आठ स्थानें होत. (२४) नंतर शिर, ललाट, श्रोत्रद्वय, कंठ, भुजद्वय, वक्ष, पृष्ठ, नाभि, स्कन्ध अशीं अकरा स्थानें श्रेष्ठ होत. (२५) नंतर सितपद्मासनस्थ शुद्ध स्फटिकाप्रमाणें भासणारे कपर्द (जटायुक्त) चंद्रकला प्रसन्नवदन, नीलग्रीव,

संनिभ कपर्द ॥ चंद्रकळा प्रसन्न वदन मोद ॥ नीलग्रीव ॥ २५ ॥ चर्मांबर सर्पाभरण ॥ मृगटंकवराभयपाणि होऊन ॥ सकळ लक्षण ॥ संपूर्ण ॥ यथा युक्त ॥ २६ ॥ परमात्मा शिवमहेश्वर ॥ रुद्र श्रीकंठ शंभु ईश्वर ॥ महादेव पशुपति शंकर ॥ वृषभध्वज ह्मणिजे एकादश रुद्रांते ॥ २७ ॥ शिरसादि एकादशस्थानीं ॥ तेथें अनुक्रमें स्मरोन ॥ धरावें त्रिपुंड्रधारण ॥ तें विभूतिधारण ह्मणवी ॥२८॥

## विभूतिधारणक्रम

आणिक तया ललाटादि कारण ॥ त्रिपुंड्रधारण ॥ धरावया लक्षण ॥ विहित तें कैसें ॥ १ ॥ दक्षिणमध्यमा अनामिक ॥ अंगुष्ठ ह्मणिजे मुख्य ॥ अंगुळीत्रयानें पूर्वक ॥ लोम विलोम धरावें ॥ २ ॥ नातरि अनामिका ते अकार ॥मध्यमा ते उकार ॥ तर्जनी ते मकार ॥ ह्मणोनिया ॥ ३ ॥ या भावें निःसंदेह ॥ मध्यें अंगुलित्रय ॥ संयोग कृतनिश्चय॥ अवश्य धरावें ॥ ४ ॥ अग्नित्रय अक्षरत्रय ॥ गुणत्रय लोकत्रय ॥ आत्मत्रय वेदत्रय ॥ काळत्रय ॥ ५ ॥ रुद्र ईश्वर सदाशिव ॥ ह्मणिजे देव ॥ त्रयात्मक सर्व ॥ ह्मणोनिया ॥ ६ ॥ अनुसंधान ॥ पूर्वक होऊन॥ त्रिरेखा षडंगुळप्रमाण ॥ समस्त रूप ॥ ७ ॥ नेत्रयुग्मप्रमाण ॥ किं

---

(२६) चर्मांबर वगैरे सर्व आभरणांनीं युक्त आणि मृग टंक वरद-अभय-हस्तयुक्त सर्व लक्षणसंपन्न (२७) असा परमात्मा शिवरुद्र, महेश्वर, श्रीकण्ठ, ईश्वर, महादेव, पशुपति, शंकर, सदाशिव, वृषभध्वज यां (२८) एकादश मूर्तींचें स्मरण करून शीर्षादि एकादश स्थानांवर त्रिपुंड्र धारण करणें याला विभूतिधारण असें ह्मणतात.

### विभूतिधारणक्रम.

(१) नंतर ललाटादि स्थानांवर त्रिपुंड्र धारण करावयाचें लक्षण सांगतात (२) उजव्या हाताच्या मध्यमा, अनामिका, अंगुष्ठ या अंगुलित्रयानें अनुलोम विलोमपूर्वक त्रिपुंड्र धारण करावें (३) किंवा अनामिका अकारस्वरूप आहे, मध्यमा उकार स्वरूप आहे, तर्जनी मकारस्वरूप आहे अशा (४) निस्संशय भावनेनें अंगुलित्रयानें त्रिपुंड्र धारण करावें (५) अक्षरत्रय, अग्नित्रय, गुणत्रय, लोकत्रय, आत्मत्रय, वेदत्रय, कालत्रय, (६) देहत्रय, जीवत्रय, लिंगत्रय, मूर्तित्रय, सत्तात्रय, अंशत्रय, रुद्र, ईश्वर, सदाशिव या देवतात्रयांचें (७) अनुसंधान करून भस्माच्या त्रिरेखा षडंगुलप्रमाण ( सहा बोटें लांब ) कराव्या (८) किंवा नेत्रयु

भ्रूमध्यें विस्तीर्ण ॥ धरावें धारण ॥ ललाटांत ॥८॥ तरि तें कठिण मलिन वक्र ॥ छिन्न दूर विजातिमिश्र ॥ अशुद्ध ह्मणिजे षड्लक्षण युक्त॥ धरावें येथें ॥ ९ ॥ ब्राह्मणासि षडंगुलप्रमाण ॥ क्षत्रियासि चतुरंगुलप्रमाण ॥ वैश्यासि द्व्यंगुलप्रमाण ॥ शूद्रासि एकांगुलप्रमाण॥ १० ॥ या विचारें ये रीति ॥ धारण क्रमस्थिति ॥ ती निरुतें विभूति ॥ धारणा ह्मणावी ॥ ११ ॥ आणिक एक येथें ॥ गृहस्थासि स्त्रियांतें ॥ त्रिसंध्याकाळीं जलेंसि मिश्रित ॥ विभूति धारु ये ॥ १२ ॥ यतीसी सर्वकाळ ॥ मिश्रित रहित जळ ॥ विभूतिधारण केवळ ॥ करावया योग्य ॥ १३ ॥ वानप्रस्थ कुमारि दीक्षारहित ॥ तयासि मध्यान्हपर्यंत ॥ उदक मिश्रित ॥ करूनि धरूं ये ॥ १४ ॥ अस्तमानपर्यंत उपरांति ॥ प्रयोजनी प्रीति ॥ महानसिची विभूति ॥ धरावया योग्य ॥ १५ ॥ आणिक इतुकें स्नान ॥ उधळनधारण ॥ अनुक्रमें करून ॥ विध्युक्त मार्ग ॥१६॥ श्रीमद्विभूतिधारण ॥ तें शिवव्रत ह्मणोन ॥ पाशुपतव्रत ह्मणोन ॥ नाम पढोनि असे ॥ १७ ॥ दोष रोगादिक ॥ सर्व भीतिसी निवृत्तिकारक॥

---

ग्मापासून व भ्रूमध्यापासून कपाळाच्या शेवटापर्यंत तीन रेषा कराव्या (९) परंतु त्या रेषा कठिण, मलिन, वक्र छिन्न दूर, विजातीय या सहा दोषांनीं रहित असाव्या नय, शुभ्र, सरळ, सांद्र, समीप, भिन्न, अशा सहा लक्षणांनीं युक्त असाव्यात (१०) ब्राह्मणांस षडंगुलप्रमाण विभूति धारण करावयाचा अधिकार आहे. क्षत्रियांस चार अंगुलप्रमाण धारण करण्याचा अधिकार आहे. वैश्यांस दोन अंगुलप्रमाण धारण करावयाचा अधिकार आहे. शूद्रास एक अंगुल प्रमाण धारण करावयाचा अधिकार आहे. (११) याप्रमाणें विभूतिधारणक्रमाची स्थिति आहे असें जाणावें. (१२) गृहस्थाश्रमी स्त्रिया यांनीं तिन्ही वेळ जलमिश्रित विभूतीचेंच धारण करावें. (१३) यतींनीं सार्वकाळ जलमिश्र न करतां विभूति धारण करावें. (१४) वानप्रस्थांनीं, कुमारिकांनीं व दीक्षाहीनांनीं मध्यान्हपर्यंत जलमिश्रित धारण करावें. (१५) नंतर केवल विभूति धारण करावें. (१६) एकूण स्नान, उध्दूलन, धारण या क्रमांनीं विधिपूर्वक (१७) श्रीमद्विभूति धारण करणें हेंच शिवव्रत आहे व पाशुपत व्रत आहे असा निश्चय करून (१८) आणि दोषरोगादि सर्व भीतींची निवृत्ति करिते व शेवटीं भोग-

अंतीं भोग मोक्षप्रदायक ॥ होऊनि असे ॥ १८ ॥ ह्मणोनि वेदागमपुराणीं ॥ असे प्रसिद्ध होऊनि ॥ तया कारणें जनीं ॥ सकळ लोक ॥ १९ ॥ मनु मुनि देवता सकळ ॥ विभूति विशिष्ट केवळ ॥ ह्मणोनि सर्व जन सर्वकाळ ॥ केलें धारण ॥ २० ॥ सकळ रक्षणार्थ ॥ मंगळ शुभार्थ ॥ पवित्रार्थ शिवार्थ ॥ कारणत्वें ॥ २१ ॥ ब्राह्मणादि वर्ण सकळ ॥ ब्रह्मचर्यादि आश्रम अखिल ॥ सांख्यादि मताभिमानी केवल ॥ सर्वथा सर्व ॥ २२ ॥ श्रद्धापूर्वक प्रीति ॥ श्रीमद्विभूति ॥ धारणा करिती ॥ हा विश्वास सत्य ॥ २३ ॥

## रुद्राक्षधारणक्रम.

रुद्राक्षोत्पत्ति रुद्राक्षधारण ॥ आणिक इति भासित ॥ धारणानन्तर विहित रुद्राक्षधारणातें सत्य ॥ कर्तव्य होऊनि असे ॥ १ ॥ तया कारण ॥ शुद्धशैव आपण ॥ निपुणतद्विधान ॥ जाणावें येथें ॥ २ ॥ त्रिपुरदहनलीलासमयीं ॥ ईश्वराचे चंद्रार्काग्नि नेत्रत्रयी ॥ जलबिंदुचे ठायीं ॥ अनुक्रमें प्रगटले ॥ ३ ॥ शुभ्रवर्ण झाला षोडशविध ॥ रक्तवर्ण झाला द्वादशविध ॥ कृष्णवर्ण झाला दशविध ॥ इति रुद्राक्षक्रम ॥ ४ ॥ तयाचें नामोच्चारण ॥ दर्शन स्पर्शन धारण ॥ मात्रें उत्तरोत्तर अधिक पुण्य ॥ फळदायक ह्मणवी ॥ ५ ॥ सकळ लोकांसि हित

---

मोक्ष देते. (१९) ह्मणून वेद, आगम, पुराण यामध्यें प्रसिद्ध असून (२०) व सर्व मनु, मुनि, देवता हे सर्व विभूतिधारण श्रेष्ठ आहे असें समजून नेहमें धारण करतात. (२१) रक्षणार्थ, मंगलार्थ, पवित्रार्थ, शिवार्थ (२२) ब्राह्मणादि सर्व वर्णांनीं ब्रह्मचर्यादि सर्व आश्रमस्थांनीं सांख्यादि मताभिमान्यांनीं (२३) श्रद्धापूर्वक, प्रीतिपूर्वक श्रीमद्विभूति धारण सर्वदां करावें.

## रुद्राक्षधारणक्रम.

(१) भस्मधारणा नंतर रुद्राक्षधारण करणें कर्तव्य असल्यामुळें (२) त्याचें विधान शुद्धशैवांनीं अवश्यमेव जाणावें (३) तें असें कीं, त्रिपुरदहनाच्या वेळेस ईश्वराच्या चंद्र, सूर्य, अग्नि या नेत्रत्रयापासून अनुक्रमानें जलबिंदु पडले (४) त्यांमध्यें शुभ्रवर्णाचे बिंदु सोळा पडले रक्तवर्णाचे बिंदु बारा पडले कृष्णवर्णाचे बिंदु दहा पडले हे सर्व बिंदूच रुद्राक्ष होत. (५) या रुद्राक्षाच्या नामस्मरणानें, दर्शनानें, स्पर्शनानें, धारणानें उत्तरोत्तर अधिक फल देणारे होतात. (६) हे सर्व रुद्राक्ष सर्व लोकांना हित करावयाकरितां व उपकार क

उपकारा निमित्त ॥ रुद्राक्ष झाले जनित ॥ त्याचें ठायीं ॥ ६ ॥ माळ करावया मणिपरीक्षा ॥ उन्नतस्थान ते पृष्ठि नवस्थाने ते सुख ॥ येथें मुखगणना जाणावी रेख ॥ तेचि मुख मणिसी ॥ ७ ॥ मूळ ब्रह्म विष्णु नाळ ॥ मुख रुद्र केसर सकळ ॥ देवतास मेळ ॥ ह्मणोनि निरीक्षुनी ॥ ८ ॥ लक्षण परीक्षूनि वरि प्रक्षालन ॥ विधीनें माळा करून ॥ मग करूनिया स्नान ॥ शुचि आसनीं वैसोनिया ॥ ९ ॥ सकळ पापक्षयार्थ ॥ शिवप्रसाद ज्ञानसिध्यर्थ ॥ धरितों ह्मणोनि सत्यार्थ ॥ संकल्पावें ॥ १० ॥ मग शिखास्थानीं एकमुख ॥ मणि धरावा शिरसीं द्विमुख ॥ मणि तथा ॥ ११ ॥ त्रिमुख दशमुख ॥ तीन धारण करावें एकादशमुख ॥ मणि छत्तीस मुख्य ॥ मूर्धास्थानीं धारण करावे॥१२॥ कर्णासी पंचमुख ॥ सप्तमुख दशमुख एक एक ॥ धारण करावें अथवा षट्क षट्क ॥ कुण्डल धरावे ॥ १३ ॥ कण्ठीं अष्टमुख मणि बत्तिस ॥ उरीं चतुर्मुख मणि पन्नास ॥ बाहुद्वयासी षोडश त्रयोदश ॥ मुख मणीं षोडश षोडश ॥ १४ ॥ मणिबंधद्वयासि नवमुख ॥ मणि द्वादश द्वाद-

---

रण्याकरतां उत्पन्न झाले आहेत. (७) त्यांत माळ करण्याकरितां रुद्राक्षांची परीक्षा करावी ती अशी कीं, रुद्राक्षांचा उंचवटाच पृष्ठभाग होय रुद्राक्षांच्या रेखाच मुख होत (८) रुद्राक्षांचें मूळच ब्रह्म असून विष्णु नाळ आहे मुख रुद्र असून सर्व केसरच देवता आहेत अशा तऱ्हेनें पाहून (९) उत्तम लक्षणाचे परीक्षा करून त्या रुद्राक्षाला प्रक्षालनादि विधीनें शुद्ध करून त्यांची माळ करावी नंतर स्नान करून शुद्ध होऊन आसनावर बसून (१०) सर्व पापक्षयाकरितां व शिवज्ञानसिद्धीकरितां रुद्राक्ष धारण करितों असा संकल्प करावा. (११) नंतर शिखास्थानीं एकमुख रुद्राक्ष धारण करावें मस्तकावर द्विमुख व दोन रुद्राक्षांचें धारण करावें. (१२) आणि त्रिमुख, दशमुख, एकादशमुख अशा बत्तीस रुद्राक्षांची माळ मस्तकावर धारण करावी. (१३) कानांत पंचमुखी, सप्तमुखी व दशमुखी एकेक रुद्राक्ष धारण करावें किंवा सहा रुद्राक्षांचें कुंडल धारण करावें (१४) गळ्यांत अष्टमुखी बत्तीस रुद्राक्षांची माळ धारण करावी, उरावर चतुर्दशमुखी पन्नास रुद्राक्षांची माळ धारण करावी. बाहुद्वयांवर त्रयोदशमुखी सोळा सोळा रुद्राक्षांची माळ धारण करावी. (१५) मनगटावर

शक ॥ यज्ञोपवीतासि चतुर्दशमुख ॥ मणि अष्टोत्तरशत ॥१५॥ उदरबन्धासि हरएक ॥ मुखमणि पन्नास वरि चतुष्क ॥ याक्रमें तत्तन्मन्त्रपूर्वक ॥ तीनशेचोवीस धारण करावे ॥१६॥ जरि न साधति मणि क्रमें करून ॥ तरी हरएक मुख मणि ॥ तये तये स्थानिं ॥ आवश्य धरावें ॥१७॥

## रुद्राक्षदेवताफल.

आणिक येथें एकमुख ॥ मणि तो परशिव प्रत्यक्ष ॥ नासुनि ब्रह्महत्यादि पातक ॥ सर्वसिद्धिदायक ॥१॥ द्विमुखमणि आपण ॥ तो ईश्वर ईशान्य ॥ गोहत्या महादारुण ॥ पातक निवारी ॥२॥ त्रिमुखमणि तो साक्षात अग्नि ॥ स्त्रीहत्या लागून ॥ परिहर करी ॥३॥ चतुर्मुख ॥ मणि तो चतुर्मुख ॥ पुरुष हत्यादिक ॥ पातक निवारी ॥४॥ पंचमुख मणि तो सर्वथैव ॥ आपण सदाशिव ॥ अभक्षभक्षणादिक सर्व ॥ दोष निवारी ॥५॥ षण्मुख मणि तो षण्मुख ॥ भ्रूणहत्यादिक ॥ अखिल पातक ॥ निवारी निरुते ॥६॥ सप्तमुख मणि तो अ-

---

नवमुखी बारा बारा रुद्राक्षांची माळ धारण करावी, यज्ञोपवीताकरितां चतुर्दशमुखी अष्टोत्तरशत रुद्राक्षांची माळ धारण करावी. (१६) उदरबन्धावर एकमुखी चौपन्न रुद्राक्षांची माळ धारण करावी. (१७) एकूण तीनशेचोवीस रुद्राक्ष त्या त्या मंत्रांनीं धारण करावेंत. याक्रमानें मणि सांपडत नसतील तर सांपडलेल्या रुद्राक्षांची माळ किंवा परशिव पंचमुखस्वरूप पंचमुखी रुद्राक्ष त्या त्या स्थानांवर धारण करावेंत. असें शिवानुशासन आहे.

## रुद्राक्षदेवताफल.

(१) एकमुखी रुद्राक्षाला परशिव देवता असून हा मणि ब्रह्महत्यादि पातकांचा नाश करून सर्वसिद्धि देतो. (२) द्विमुख मणीला ईश्वर व ईशान देवता आहेत हा मणि गोवधादि पातकांचा नाश करितो. (३) त्रिमुखमणीला अग्निदेवता आहे हा मणि स्त्रीहत्या पातकांचा नाश करितो. (४) चतुर्मुखी मणीला ब्रह्मदेव देवता आहे हा मणि पुरुषहत्या पातकाचा नाश करितो. पंचमुखी मणीला सदाशिव देवता आहे हा मणि अभक्ष्यभक्षण पातकाचा नाश करितो. (५) षण्मुखी मणीला कुमार देवता आहे हा मणि भ्रूणहत्यादि पातकाचा संहार करितो. (६) सप्तमुखी मणीला अनंत देवता आहे हा मणि

मस्त ॥ गोहत्यादि समस्त ॥ व्याधि क्लेश दुःख होत ॥ क्षयकरी ॥७॥ अष्टमुख मणि तो विघ्नेश्वर ॥ भस्म करूनि पापडोंगर ॥ निवारुनी विघ्नभार ॥ परमपददायक ॥ ८ ॥ नवमुखमणि तो भैरव ॥ सकल क ल्मषभव ॥ निवारुनि सुखानुभव ॥ भुक्तिमुक्तिदायक ॥९॥ दशमुख-मणि तो माधव आपण ॥ भूतवेताळमारिगण ॥ ब्रह्मराक्षसपन्नगादि-करून ॥ भीति निवारी ॥१०॥ एकादशमुख ॥ मणि तो एकादश रुद्र-मुख्य ॥ अश्वमेधादिक ॥ पुण्यफलदायक ॥११॥ द्वादशमुख ॥ मणि तो द्वादश आदित्य प्रत्यक्ष ॥ अग्नि चोर व्याघ्र खड्गादिक ॥ दिग्बंध नि-वारी ॥ १२ ॥ व्यवहारिकसिद्धि ॥ नाना रत्नें सुवर्णादि ॥ सकळसमृ-द्धि ॥ साध्य करी ॥ १३ ॥ त्रयोदशमुख ॥ मणि तो महेश्वरक ॥ मातृ-पितृहत्यादिक ॥ दुष्कृत निवारी ॥१४॥ रसरसायणवाद ॥ वश्याकर्ष-णादि साध्य ॥ सकळप्राप्ति इच्छित ॥ फलदायक तो ॥१५॥ चतुर्दश-मुख मणि तो मनुमुख ॥ सर्व देवता पूज्यप्रदायक ॥ सकलसन्मानदा-यक ॥ ह्मणोनि जाणावें ॥१६॥

---

गोवध, स्वर्णस्तेय, व्याधि, क्लेश वगैरेंचा नाश करितो. (८) अष्टमुखी मणीला गणपति देवता आहे हा मणि डोंगरासारख्या पातकांचा नाश करून श्रेष्ठपद देतो (९) नवमुखी मणीला भैरव देवता आहे हा मणि सकल कल्मषांचा नाश क-रून भुक्तिमुक्ति देतो. (१०) दशमुखी मणीला माधव देवता आहे हा मणि भूत, वेताळ, मारींगण, ब्रह्मराक्षस, पन्नग यांची भीति दूर करितो. (११) ए-कादशमुखी रुद्राक्षाला एकादशरुद्र देवता होत हा मणि अश्वमेधादि यज्ञ केल्यां-चें फळ देतो. (१२) द्वादशमुखी रुद्राक्षाला द्वादशादित्य देवता होत हा मणि अग्नि, चोर, व्याघ्र, खड्ग, दिग्बंध यांची भीति दूर करितो. (१३) व व्यव-हारसिद्धि आणि नानाविध रत्नसुवर्णादिकांची समृद्धि देतो. (१४) त्रयोदशमु-खी मणीला महेश्वर देवता आहे हा मणि मातापितृहत्येच्या पातकांचा नाश करि-तो. (१५) व रसरसायनसिद्धि, वश्याकर्षणादिसिद्धि, सकलप्राप्ति, मनोरथसिद्धि करून देतो. (१६) चतुर्दशमुखी रुद्राक्षाला चौदा मनु देवता होत हा मणि स-कलसन्मान व सर्व देवतापूजेचें फळ देतो.

## रुद्राक्षधारणबीजमंत्र

एकमुखमणि आदिकरून ॥ चतुर्दशमुखपर्यंत मणि ॥ तथा सकळां लागुनी ॥ मंत्र अनुक्रमें ॥ १ ॥ मंत्र ॥ ॐ ऱ्हां लां ॥ वं ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हां श्रीं ऱ्हीं मं वं क्षौं क्षां ऊं ॐ ऱ्हें ऱ्हं ऱ्हौं ॥ श्रीं ॥ ऱ्हें मं वं क्षौं क्षं लं ॥ ह्मणोनियामुख्य ॥ याअनुक्रमंपूर्वक ॥ तत्तन्मंत्रसंयोगें रुद्राक्ष ॥ धरावे स्थानस्थानीं ॥ २ ॥ ब्राह्मणादिकसकळांसि संध्यावंदन ॥ आणिक काम्यक्रियेचे ठायीं रुद्राक्षधारण ॥ सर्वदा असावें ह्मणोन ॥ निश्चय सिद्धि ॥ ३ ॥

## मंत्रविषय

इति भसित रुद्राक्षधारण ॥ नैष्ठिक जालिया शुद्धशैवें कारण ॥ पंचाक्षर्यादि सप्तकोटि महामंत्रसिद्धिकारण ॥ तत्तन्मंत्रजपविधानीं॥१॥ तत्तन्मंत्रदेवता जपकर्त्यासि ॥ ऋणऋणीभाव जाणोनि त्यासि ॥ धनादिक होईल तैसे न पविधानासि ॥ करावेंसूज्ञें ॥२॥ ऋणाधिक झालियावरी ॥ सप्तोपायादिके परोपरि ॥ सिद्धिमुखवैखरि ॥ सिद्धारिचक्र जाणावें ॥ ३ ॥ प्रथमसिद्ध ॥ साध्य सुसिद्ध ॥ अरि ह्मणोनि प्रसिद्ध॥ मंत्रसिद्धीसि सूचना ह्मणवी ॥४॥

---

## रुद्राक्षधारणबीजमंत्र.

(१) एकमुखी रुद्राक्षापासून चतुर्दशमुखी रुद्राक्षापर्यंन चौदा मणि आहेत. त्यां प्रत्येकी रुद्राक्षाचा बीजमंत्र अनुक्रमानें असा (२) सांगतात कीं ॐ, ऱ्हां, लां, ॐ, ऱ्हें, ऱ्हूं, ऱ्हौं, श्रीं, ऱ्हें, मं, वं, क्षौं, क्षं, लं, * ( ॐ, ऱ्हां, लां, बं, ऱ्हीं, ऱ्हूं, ऱ्हां, श्रीं, ऱ्हीं, मं, वं, क्षौं, क्षां, उं, ) कानडी पुस्तकाचे आधारानें कंसांत बीजमंत्र दिले आहेत याप्रमाणें अनुक्रमानें मुख्य बीजमंत्र जाणून मंत्रोच्चारपूर्वक त्या त्या स्थानीं रुद्राक्ष धारण करावेत. (३) ब्राह्मणादि सकल वर्णांनीं आन्हिक जपादि कर्मांचे वेळेस रुद्राक्ष धारण केलेच पाहिजे असा निश्चय आहे आणि काम्यलौकिककर्मांचे वेळेसही शुचिर्भूत होऊन रुद्राक्ष धारण करावे.

## मन्त्रविषय.

(१) याप्रमाणें रुद्राक्षनिष्ठ असलेल्या शुद्धशैवांनीं पंचाक्षरी वगैरे सप्तकोटि महामंत्रांची सिद्धि करून घ्यावी (२) ( त्या त्या मंत्राच्या जपामध्यें त्या त्या मंत्रदेवतांचे जप करण्यामध्यें ऋणिऋणीभावसंबंध आहे असें समजून जप करावा. धनप्राप्ति इच्छा करणाऱ्यांनीं (३)(४) व कर्जदार मनुष्यांनीं सप्तोपायादिकांनीं मंत्रसिद्धि करावयाची झाल्यास सिद्धारिचक्र पुढें सांगतात. )

## सिद्धारिचक्रविषय

दंडपंक्ति चतुर्भवनचतुरस्रयुक्त ॥ आणिक षोडशकोष्ठयुक्तचक्र ॥ त्यामध्यें सिद्धसाध्यसुसिद्धचक्र ॥ मंत्रसिद्धी करितां ॥१॥ ईशान्यादि समचतुरस्र ॥ जाणा हे कोण चार ॥ त्यामध्यें चक्र ॥ विधिपूर्वक लिहावें ॥ २ ॥ अकारादि षोडशस्वर ॥ ककारादि बत्तीस व्यंजनें थोर॥ क्रमानें चक्राकार ॥ लिहावींत सूज्ञें ॥३॥ यांसि सिद्धपर्याप्ति ॥ साध्यपर्याप्ति ॥ सुसिद्धपर्याप्ति अरिपर्याप्ति ॥ हीं नांवें जाणा ॥ ४ ॥ हीं चक्रें वर्तुलाकार॥ लिहावींत कादि नऊ अक्षरें टादि नऊ अक्षरें॥ पादि पांच अक्षरें ॥ यादि आठ अक्षरें ॥ अनुक्रमें लिहावींत ॥ ५ ॥ "स्वरा यथा संख्यं" प्रमाणाला अनुसरून ॥ ते ते स्वर लिहून॥ तीं तीं व्यंजनें लिहून ॥ जपकर्त्याचें नांव लिहावें ॥६॥ आणिक कर्त्याचीं जन्मनक्षत्राक्षरें मिळवून मंत्रादिकाक्षर ॥ संस्थेनें गुणून चतुर॥वर्गीकरण करावें ॥७॥ मंत्रवर्ण संख्येसि ॥ विलोम माळेच्या मूलानें तैसि ॥ भागाकार करून त्यासि ॥ त्यांत शेषवर्गमूल मिळवावें ॥ ८॥ याला ह्मणती धन असें सज्जन ॥ आणिक तन्मंत्रादि वर्णसंख्या समष्टि करून ॥ तेणें कर्त्याचे नामनक्षत्र संख्या समष्टीस गुणून ॥ त्याच क्रमें गुणाकार भागाकार क-

---

### सिद्धारिचक्रविषय.

(१–२) दंडपंक्तिचतुर्भवनचतुरस्रानें षोडशकोष्ठयुक्त ( सोळा कोणानेंयुक्त ) सिद्ध, साध्य, सुसिद्ध, या नांवाचीं चक्रें मंत्रसिद्धीकरितां ईशान्यादि समचतुरस्र चार कोणांमध्यें लिहावींत (हीं अन्तश्चक्रें जाणावींत) (३) (अकारादि षोडशस्वर ककारादि बत्तीस व्यंजनें क्रमानें त्या चार चक्रांमध्यें लिहावींत (४) यांस सिद्धपर्याप्ति, साध्यपर्याप्ति, सुसिद्धपर्याप्ति, अरिपर्याप्ति, अशीं नांवें आहेत (५) आणि यास आवर्तनचक्रें ह्मणतात. नंतर कादि नऊ अक्षरें, टादि नऊ अक्षरें, पादि पांच अक्षरें, यादि आठ अक्षरें अनुक्रमानें लिहावींत. (६) व अनुक्रमानें स्वर लिहावेत "स्वरा यथा संख्यं अवशिष्टास्सबिंदुकवर्गसंख्योपेताः" या प्रमाणाला अनुसरून ते ते स्वर व तीं तीं व्यंजनें लिहून जपकर्त्याचीं नामाक्षरें (७) व जपकर्त्याच्या जन्मनक्षत्रांतील अक्षरें मिळवून मंत्रादिकांतील अक्षरांच्या संख्येनें गुणून वर्गीकरण करून (८) नंतर मंत्रवर्णसंख्येंतील विलोममाळेच्या मूलानें भागाकार करून त्यांत शेष वर्गमूल मिळविलें असतां (९) त्याला धन असें ह्मणतात आणि त्याच मंत्रादिवर्णसंख्या समष्टीनें जपकर्त्याच्या नामनक्षत्रसंख्यासमष्टीला गुणून त्याचक्रमानें गुणाकार भा-

रावा ॥९॥ यास ह्मणती ऋण असें सज्जन ॥ ही धनऋणसंख्या जा-
णून ॥ त्यांत धनसंख्या अधिक झाली तर जाण ॥ जपकर्त्या मंत्रसिद्धि
॥ १० ॥ ऋणसंख्या अधिक झाल्यास ॥ ऋणविमोचनादि संस्कारांनीं
त्यास ॥ मंत्रसिद्धी करून सरस ॥ न्यास ध्यान अनुसंधान ॥११॥ मु-
द्राक्षरव्रत यांहीं करून ॥ मंत्र वीर्यवान् करून ॥ नंतर सात उपाय
याजून ॥ अभिमुखीकरण करावें ॥१२॥ मंत्रसिध्द सिध्द झाला तरी॥
अर्ध जपानें सिध्दि वैखरी ॥ सिध्दसाध्य झाला जरी॥ पादजपानें
सिध्दी जाणावी ॥१३॥ सिध्दसुसिध्द झाला तरी ॥ ऋणपरिहार होतो
परोपरी ॥ सिध्दारि झाला असतां तरी ॥ मंत्र निष्फल जाणा ॥१४॥
मंत्रसाध्य सिध्द झाला तरी ॥ द्विगुण जप करावा पुरा ॥ साध्यसा-
ध्य झाला तरी ॥ पूर्ण जप करावा ॥१५॥ साध्यसुसिध्द झाला तरी॥
मंत्र सफल होऊन ही खरी ॥ भंगदोषकारी ॥ जाणावा सूज्ञें ॥१६॥ सा-
ध्यारि होऊन ॥ मंत्र सफल झाला तरी जाण ॥ विरोध दोष ह्मणती
सज्जन ॥ आणिक सुसिद्ध सिध्द झाला तरी॥१७॥ तीव्रसिध्दी ह्मणती
॥ सुसिध्द साध्य झाला असता ॥ प्रयत्नसाध्य त्यांत ॥ जाणावें सूज्ञें
॥१८॥ सुसिध्दारि जाणून॥ कष्टसाध्य ह्मणती सज्जन ॥ आणि मंत्र अ-

---

गाकार केला असतां (१०) त्यास ऋण असें ह्मणतात. या ऋणधन संख्येमध्यें धनसंख्या अधिक झाली तर जपकर्त्याला मंत्रसिद्धि तीव्र होते असें जाणावें (११) ऋणसंख्या अधिक झाल्यास ऋणविमोचनादि संस्कारांनीं मंत्रसिद्धी करून न्यास, ध्यान, अनुसंधान, (१२) मुद्राक्षर, व्रत, यांनीं मंत्र वीर्यवान करून नंतर सात उपायांनीं अभिमुखीकरण करावें. नंतर (१३) मंत्र सिद्धसिद्ध झाला असतां अर्ध-जपानें सिद्धि जाणावी. सिद्धसाध्य झाला असतां पादजपानें सिद्धि जाणावी.(१४) सिद्धसुसिद्ध, झाला असतां ऋणपरिहार होतो. सिद्धारी झाला असतां मंत्र सफल होऊनहि प्रयोजन नाहीं (१५) मंत्रसाध्य सिद्धि झाला असतां दुप्पट जप करावा साध्यसाध्य झाला असतां पूर्ण जप करावा. (१६) साध्यसुसिद्ध झाला असतां मंत्र सफल होऊनहि भंगदोष जाणावा. (१७) साध्यारी होऊन मंत्र सफल झाला तरी विरोधदोष जाणावा. सुसिद्धसिद्ध झाला असतां (१८) तीव्रसिद्धि जाणावी. सुसिद्धसाध्य झाला असतां प्रयत्नसाध्य जाणावें. (१९) सुसिद्धारि झाला असतां कष्टसाध्य जाणावें आणि मंत्रअरिसिद्ध झाला असतां असमर्पक फल जाणावें

रि सिद्ध झाला असतां कवण ॥ असमर्पक फल सांगती ॥१९॥ अरि साध्य झाला असतां ॥ इंद्रियें जिंकून तत्वता ॥ साध्य करून घ्यावें स्वता ॥ प्रयत्नपूर्वक ॥२०॥ अरि सुसिद्ध झाला तरी ॥ प्रथम विरोध येऊन नंतरी ॥ सिद्धी होते खरोखरी ॥ जाणावें सूज्ञें ॥२१॥ याप्रमाणें तत्तन्नामाक्षरें ॥ आणिक नक्षत्राक्षरें ॥ यांहीं मंत्रादि अक्षरें ॥ क्रमानें षोडशविध ॥ २२ ॥ अनुलोमविलोमयुक्त ॥ सिद्धारि चक्रानें त्यांत ॥ सपिंडाक्षर मंत्रांत ॥ आणिक प्रणवादि मंत्रांत ॥२३॥ स्वयोनि मंत्रांत ॥ सिद्धारीनें त्यांत ॥ पहावयाचें तत्वता ॥ कारण नाहीं जाणा ॥२४॥

## मंत्रादि साधनें.

मातृका चक्रधारण ॥ सर्वतोभद्रधारण ॥ कूर्मचक्र धारण ॥ ह्म- णौनिया ॥१॥ सर्व मंत्रात्मक लिंगोद्धारण ॥ मंत्रसिद्धि सूचक मंत्र ज- नन स्थान ॥ महाचक्र धारण ॥ मंत्रार्चनाधिकारण ॥ यंत्रोद्धारण ॥२॥ मंत्र अनुसंधान ॥ आश्रयें झालें घटोद्धारण ॥ इति यथा लक्षण ॥ प- रीक्षूनि ॥३॥ आणिक शुद्धप्रसाद मूळप्रसाद ॥ तत्वप्रसाद आदिप्रसाद

---

अरिसाध्य झाला (२०) असतां इंद्रियें जिंकून साध्य करून घ्यावें. (२१) अरि- सुसिद्ध झाला असतां प्रथम विरोध येऊन नंतर सिद्धि होते. (२२) याप्रमाणें त्या त्या नामनक्षत्रांतील वर्णांच्या समाक्षरानें मंत्रादि अक्षर क्रमानें षोडशविध (२३) अनुलोमविलोमयुक्त केलेल्या सिद्धारिचक्रानें सपिंडाक्षरमंत्रांस, प्रणवादि मंत्रांस, सयोनिमंत्रांस सिद्धारीनें पहावयाचें कारण नाहीं परिशोधन करून जाणावें.

## मंत्रादि साधनें.

(१) नंतर मंत्रसिद्धीसूचक मातृकाचक्रधारण सर्वतोभद्रचक्रधारण, कूर्मचक्र- धारण दिग्बन्धन रक्षायंत्र यांचा क्रम चांगल्या रीतीनें जाणावा. (२) आणि स- कलमंत्रात्मक असें लिंगोद्धारचक्र, मंत्रजननस्थान असें महाचक्रोद्धारचक्र मंत्रार्च- नाधिकरण असें यंत्रोद्धारचक्र (३) मंत्रानुसंधानाश्रय असें घटचक्र यांची परीक्षा लक्षणपूर्वक करावी. (४) ( नंतर षडम्नायमूल, गुरुपरंपरा, संप्रदायरहस्य, ऋषि, देवता, छंदस्, हृदयादि न्यास, बीज, शक्ति, कीलक, अक्षर, देवता, अधिदे- वता, रूप, आकृति, ध्यान, स्वभाव, मैत्री, समय, गर्भ, प्रसव, विघ्न, ऋतु, जन्म, स्थिति, अवस्था, स्वर, प्रकृति, विकृति, प्रिय, मंत्रपल्लव, मंत्रप्रयोग, मंत्रोपसंहार, मंत्रसंस्कार, मंत्रदीक्षा, मंत्ररक्षा, कवच, पंचपाद पंचकृत्य, पंजर, मालिका, मू- लिका, तंत्र, बलि, आत्मैक्य अशा पंचेचाळीस मंत्रसाधनांमध्यें बुद्धि ठेवावी. )

॥ आत्मप्रसाद ह्मणोनि पंचविध ॥ सृष्टिरूप शिवमंत्र ॥ ४ ॥ मोक्ष अ-
भिवृद्धि काम्यादिक ॥ शांतिक पौष्टिक ॥ ह्मणौनि सदाशिवरूप पंचक
॥ स्थिति मंत्र ॥५॥ सृष्टिस्थिति संहार ॥ ह्मणौनि महेश्वर ॥ रूप त्रि-
विध प्रकार ॥ संहार मंत्र ॥६॥ साकल्यप्रणव ॥ शांभवप्रणव ॥ सां-
ख्यप्रणव ॥ सावश्यप्रणव ॥ सायुज्यप्रणव ॥ ह्मणौनि पंचप्रणव ॥७॥
मूळ पंचाक्षरी ॥ स्थूळ पंचाक्षरी ॥ सूक्ष्म पंचाक्षरी ॥ माया पंचाक्षरी
॥ प्रसाद पंचाक्षरी ॥ ह्मणौनि पंचाक्षरी ॥८॥ शिवास्त्र ॥ छुरिकास्त्र ॥
पाशुपतास्त्र ॥ व्योमास्त्र ॥ अघोरास्त्र ॥ ह्मणौनि पंचास्त्र मंत्र ॥९॥ स-
द्योजातकर ॥ वामदेव अघोर ॥ तत्पुरुष ईशान्य ह्मणौनि पंचप्रकार॥
ब्रह्ममंत्र ॥१०॥ गायित्री मृत्युंजय ॥ दक्षिणामूर्ति शुद्धमय ॥ नीलकंठ
विग्रह ॥ शारभ वीरभद्र ॥११॥ विघ्नेश्वर विशाख विद्येश्वर ॥ ब्रह्मा-

---

नंतर शुद्धप्रसाद, मूलप्रसाद, तत्त्वप्रसाद, आदिप्रसाद, आत्मप्रसाद असें पंचविध सृष्टिरूप शिवमंत्र जाणावेत. (५) मोक्ष, अभिवृद्धि, काम्य, शांति, पौष्टिक, असे पंचविध सदाशिवस्वरूपमंत्र जाणावें. (६) सृष्टि, स्थिति, लय असे त्रिविधमंत्र महेश्वरस्वरूप असून संहाररूप आहेत. (७) साकल्यप्रणव, शांभवप्रणव, सांख्यप्रणव, सावश्यप्रणव, सायुज्यप्रणव, असे पंचप्रणवमंत्र जाणावेत. (८) मूलपंचाक्षरी, सूक्ष्मपंचाक्षरी, स्थूलपंचाक्षरी, मायापंचाक्षरी, प्रसादपंचाक्षरी असे पंचविध पंचाक्षरीमंत्र जाणावेत. (९) शिवास्त्र, छुरिकास्त्र, पाशुपतास्त्र, व्योमास्त्र, अघोरास्त्र, असे पंचविध अस्त्र महामंत्र जाणावेत. ( ब्रह्मास्त्र, नागास्त्र, गारुडास्त्र, अनलास्त्र, वारुणास्त्र, असें पंचविध उपास्त्रमंत्र जाणावेत. विद्यासंजीवन, आत्मसंजीवन, मृतसंजीवन असे त्रिविध संजीवनमंत्र जाणावेत. जृंभक, प्रस्वान, अप्रतिहत, निःशेषीकरण, जीवग्राह असे पंचविध शक्तिमंत्र जाणावेत. कामरूप, घोरदर्शन, सम्मोहन, विश्वरूप, तुल्यसृष्टि असे पंचविध मायामंत्र जाणावेत. रुद्रशूल रुद्रशक्ति, रुद्रचक्र, रुद्रवज्र, रुद्रपाश, रुद्रदंड, रुद्रपिनाक, नारायणबाण, रुद्रगदा, रुद्रखड्ग, रुद्रात्मक असे एकादशविध रौद्रास्त्रमंत्र जाणावेत. ) (१०) सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष, ईशान असे पंचब्रह्ममंत्र जाणावेत. (११) गायत्री, मृत्युंजय, दक्षिणामूर्ति, नीलकंठ, शरभ, वीरभद्र, (१२) विघ्नेश्वर, विशाख, विद्येश्वर, ब्रह्मा, विष्णु, दिनकर, भैरव, * वाक्पति, कामधेनु, कल्पवृक्ष,माया, सावित्री, सरस्वती,

विष्णुदिनकर ॥ भैरवादि महामंत्रस्तोम ॥ १२ ॥ दुर्गा शारदा लक्ष्मी गौरी ॥ अन्नपूर्णा भुवनेश्वरी ॥ अश्वारूढी त्रिपुरांबिकापुरी ॥ महाशक्तिमंत्र ॥ १३ ॥ सिद्धशावरा शक्तिशावर ॥ मेरुतंत्र शाकिनी तंत्र ॥ डाकिनी तन्त्र कूचमार तन्त्र ॥ शल्यतन्त्रादि सिद्धतन्त्रसमूह ॥१४॥ द्राविडवैकृत लौकिक ॥ देशभाषा मंत्रादिक ॥ भिन्नभिन्न पृथक ॥ विवेकुनी पाहिजे ॥१५॥

## मंत्रपल्लवन्यासादि.

आणिक त्या मंत्राचें हृदयशिर ॥ शिखाकवच नेत्रअस्त्र ॥ ह्मणिजे षडंग विचार ॥ अनुक्रमें ॥१॥ नमः स्वाहावषट्‌ ॥ हुं वौषट्‌ ॥ फट्‌ ह्मणौनि षट्‌ ॥ पल्लवप्रयोग ॥२॥ शुभ्र पीत रक्तवर्ण ॥ स्फटिक श्याम कृष्ण ॥ ह्मणौनि अनुक्रमें अंगवर्ण ॥ हृदयादि ॥३॥ पंचांगमंत्रासि भावें ॥ नेत्रपल्लव तेजावें ॥ अंगहीन मंत्रासि ध्यावें ॥ अंग कल्पूनि हा नि-

---

अमृतेश्वरी, सप्त मातृका (१३) दुर्गा, काली, बगळा, बाला, ललिता, शूलिनी, वगैरे हे सर्वमंत्र महामंत्र जाणावेत. तसेंच प्रत्यंगिरादि कृत्यामंत्र जाणावेत. शिव, अग्नि, लक्ष्मी, इंद्र, वगैरे मंत्र धनमंत्र जाणावेत. श्री, वाक्‌, अन्नपूर्णा, वगैरे सिद्धिमंत्र जाणावेत. भुवनेश्वरी, अश्वारूढा, त्रिपुरांबिका, महाशक्ति असे शक्तिमंत्र जाणावेत. (१४) योगिनी, यक्षिणी वगैरे उपशक्तिमंत्र होत. शावरतंत्र, शाकिनीतंत्र, डाकिनीतंत्र, कूचीमारतंत्र, शांतितंत्र, शल्यतंत्र, मूलिकातंत्र, बभ्रिकातंत्र, दहनतंत्र, दर्शनतंत्र, खननतंत्र, वचनतंत्र, वगैरे तांत्रिकसिद्धमंत्र जाणावेत. (१५) द्राविड, वैकृत, प्राकृत, शपथ वगैरे देशभाषाक्षुद्रमंत्र जाणावेत. हे सर्वमंत्र निरनिराळ्या उपदेशानें व अनुष्ठानानें परीक्षेनें विचार करून समजून घ्यावेत.

## मंत्रपल्लवन्यासादि.

(१) आणिक या मंत्राचें हृदय, मस्तक, शिखा, कवच, नेत्र, अस्त्र, अशा रीतीनें असलेल्या षडंगांचा विचार अनुक्रमानें करावा. (२) नंतर नमः स्वाहा, वषट्‌ हुं, वौषट्‌, फट्‌ अशा षट्पल्लवांचा प्रयोग जाणावा. ( स्तंभन, तुष्टि, वश्य, विद्वेष, आकर्षण, उच्चाटन अशाही तऱ्हेनें असलेल्या षट्पल्लव प्रयोगाचें ज्ञान करून घ्यावें. ) (३) शुभ्र, रक्त, पीत, स्फटिक, श्याम, कृष्ण, अशा हृदयादि अंगवर्णांचें ज्ञान करून घ्यावें. (४) पंचांगमंत्रांस नेत्रपल्लवाचा त्याग करून अशा अंगहीनमंत्राचें अंग कल्पावें. ( अंगाची कल्पना करावी ) असा निश्चय करून

श्रय ॥४॥ आणिक त्या मंत्रषट्पल्लवाभीतरीं ॥ कार्यार्थ परि ॥ कोपशांतिपूजेसि साचारी ॥ हृदयपल्लव ॥५॥ मोह वैश्यादिकातें ॥ शिरपल्लव निरुतें ॥ लाभालाभाते ॥ शिखापल्लव ॥६॥ छेदनमारण ॥ प्रीति विध्वंसन ॥ तयासि कारण ॥ कवचपल्लव ॥७॥ मोहन दीपन ॥ पुष्टवी जया लागून ॥ तयासि कारण ॥ नेत्रपल्लव ॥८॥ विघ्नग्रह उच्चाटनादिक ॥ तयासि अस्त्र पल्लवकारक ॥ मंत्राअंतीं प्रयोगावे मुख्ये ॥ हे विधीनें निश्चयें ॥ ९ ॥

## मंत्रसंस्कार.

आणिक वातुल शारदातिलक ॥ मंत्रदेवता प्रकाशक ॥ प्रपंचसारादिक ॥ मंत्र शास्त्रोक्त ॥१॥ महाचक्रगत कारण ॥ मातृका घेऊन ॥ मंत्रोद्धारणाचेंनि जनन ॥ सांगिजेल ॥२॥ आणिक ते मंत्रवर्णा मेळवून॥ भिन्नभिन्न वर्ण ॥ चंदनोदकें वायुव्यान ॥ पोडेव ताडन ह्मणौन ॥ ३॥ आणिक तया मंत्राक्षरा ॥ गणना ठेऊनि रक्तकण्हेरा–चेनि पुष्पें वायुमुखें ठेऊनि उच्चार ॥ बोधन ह्मणिजे ॥ ४ ॥ त्या मंत्राक्षरांची संख्या ठेऊन ॥ अश्वत्थपल्लव मंत्राक्षरा लागून ॥ मंत्रोदकें करून ॥ अभिषेक कीजे ॥५॥ ते मंत्र मनांत स्मरोनि ॥ तारा व्योम अग्नि ॥ मानयुक्तं

---

त्या मंत्रांचें ध्यान करावें. (५) आणि त्या मंत्रषट्पल्लवांमध्यें कोपोपशांतिपूजादिकांस हृदयपल्लव, (६) होमवश्यादिकांस शिरःपल्लव, लाभालाभादिकांस शिखापल्लव, (७) छेदन, मारण, विरोधादिकांस कवचपल्लव, (८) मोहनोद्दीपनसमाधिविजयश्रेयःसंवादनाकांस नेत्रपल्लव, (९) विघ्न, ग्रहोच्चाटन, इत्यादिकांस अस्त्रपल्लव, याचा प्रयोग मंत्रांच्या शेवटीं करावा. ( कवच, पंजर, शस्त्र, माला, शापमोचन, वगैरे विधिपूर्वक करावेत. )

## मंत्रसंस्कार.

(१) आणि वातुल. शारदातिलक, मंत्रदेवताप्रकाशिका, मंत्रकल्पार्णव, प्रपंचसार, मंत्रकौस्तुभ, मंत्रारण्य, मंत्रचंद्रिका, मंत्ररत्नमहोदधि वगैरे मंत्र शास्त्रोक्त, (२) महाचक्रगतमातृका ( अक्षरें ) काढून मंत्रोद्धारणाचें जनन सांगावें. (३) नंतर जननरूप मंत्रवर्ण लिहून निरनिराळे वर्णांस चंदनोदकानें व वायूनें पोडेव ताडनरूप (४) मंत्राक्षराची गणना करून करवीरदळानें व वायूनें त्याग केलेल्या बोधनरूप (५) त्या मंत्राक्षराची संख्या ठेऊन अश्वत्थपल्लवांनीं मंत्राक्षरास मंत्रोदकाभिषेक करावा. (६) नंतर त्या मंत्राचें स्मरण मनांत करून तारा, व्योम,

डिज्योतिर्मनु ह्मणौनि ॥ ग्रन्थार्थ ॥ ६ ॥ ज्योतिर्मय मंत्रेंकरून ॥ शिव-मंत्र सोडून ॥ शेषमंत्राचें करणें मळत्रयदहन ॥ तें विमळीकरण ह्मण-वी ॥७॥ तया ज्योतिर्मयमंत्रानें ॥ मंत्रित झालिया कुशोदकानें ॥ मंत्रा-क्षर प्रत्येक संप्रोक्षणें ॥ तें आप्यायन ह्मणवी ॥८॥ आणिक तारया मं-त्रातें ॥ तंत्रोदकें निरुतें ॥ तर्पण देणें तें ॥ तर्पण ह्मणवी ॥९॥ आणिक तारमायारमायोगो मनोदीपनमुच्यते ॥ ह्मणौनि हा ग्रन्थार्थ ते ॥ दी-पन ह्मणवी ॥१०॥ वरि जपावया योग्य इष्ट ॥ मंत्र तो न करावा प्रगट गोप्यानें मंत्राचे स्पष्ट ॥ दशसंस्कार विचारावें ॥११॥

## प्रणवविचार.

आणिक विशेष समस्त ॥ समोह मंत्रा अंतु ॥ मुख्य झाला विख्यातु ॥ प्रणव जो ॥ १ ॥ तो पर प्रणव ह्मणोनि ॥ अपर प्रणव ह्मणोनि ॥ द्विविध प्रकार होऊनि ॥ असे त्याचे ठायीं ॥ २ ॥ पर प्रणव तो असाधारण ॥ अवाच्यसत्यज्ञानादिलक्षण ॥ संयुक्त आपण ॥ परब्रह्म ह्मणवी ॥३॥ आणिक अपर प्रणव ॥ तो वाचक शब्दरूप होऊनि सर्व ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र ईश्वर सदाशिव ॥ आधिदेवता ॥४॥ रक्त शुक्ल कृष्ण॥ ज्योतिः स्फटिक ह्मणोनि ॥ पंच प्रकारें वर्ण ॥ अनुक्रमें ॥ ५ ॥ अकार

---

अग्नि, मानयुक्, दंडी, ज्योति, मनु, या ग्रंथांचा अर्थ, (७) ज्योतिर्मयमंत्रानें करून शिवमंत्र सोडून बाकी राहिलेल्या मंत्रांच्या मलत्रयरूप हिंसा, मलिनीकरण वगैरे काढून टाकावा. याला विमलीकरण असें ह्मणतात. (८) नंतर त्या ज्योतिमंत्रानें अभिमंत्रित झालेल्या कुशोदकानें प्रत्येक मंत्राक्षरावर संप्रोक्षण करावें. याला आप्यायन असें ह्मणतात. (९) नंतर मंत्रोदकानें मंत्रास तर्पण द्यावें. (१०) आणि "तारमायारमायोगो मनोदीपनमुच्यते" या ग्रंथाला अनुसरून करणें त्याला दीपन ह्मणतात. (११) यानंतर जपावयास योग्य अशा इष्टमंत्राचें प्रकटन करूं नये. याला गोपन असें ह्मणतात. याप्रमाणें मंत्राच्या दशसंस्कारांचा विचार करावा.

## प्रणवविचार.

(१) आणि त्या सकल मंत्रांमध्यें मुख्य प्रणव मंत्र आहे (२) या प्रणवांत परप्रणव अपरप्रणव असे दोन प्रकार आहेत त्यांमध्यें (३) परप्रणवच वाच्य अशा सत्यज्ञानादि लक्षणयुक्त परब्रह्म असें ह्मणवून घेतो (४) अपरप्रणव हा वाचक शब्दरूप होऊन ब्रह्मा, विष्णु रुद्र ईश्वर सदाशिव या अधिदेवतायुक्त (५) आणि शुक्ल कृष्ण रक्त ज्योति स्फटिक या पंच वर्णानें युक्त (६) व अकार, उ-

उकार ॥ तथा मकार ॥ बिंदुनाद ह्मणिजे पंचाक्षर ॥ आत्मकत्वें ॥६॥ तारक दंडक कुंडलाकार ॥ अर्धचंद्राकार दर्पणाकार ॥ ज्योतिराकार ह्मणिजे षड्रूपें ॥७॥ ॐकार ह्मणोनि ॥ ब्रह्म ह्मणोनि ॥ ज्ञान ह्मणोनि ॥ सर्वात्मक ह्मणोनि ॥ ८ ॥ सर्व विद्याबीज ह्मणोनि ॥ तेजोबीज ह्मणोनि ॥ मूर्ति बीज ह्मणोनि ॥ निष्कळ ह्मणोनि ॥ ९ ॥ नाद ह्मणोनि नादादि ह्मणोनि ॥ तेजोबीज ह्मणोनि ॥ हा नाद ह्मणोनि ॥ वेदादि ह्मणोनि ॥ वेदभूमिका ह्मणोनि ॥ मंत्रप्राण ह्मणोनि ॥ १० ॥ ब्रह्ममूर्तिं ह्मणोनि ॥आत्ममंत्र ह्मणोनि ॥इत्यादि परि नामेकरूनि॥शोभन असे ॥११॥

## मंत्रानुष्ठान.

तया मंत्रसिद्धार्थी कारण ॥ जप प्रारंभाचे ठायीं स्नान ॥ आधीं विध्युक्त होऊनि ब्रह्मारण्य ॥ नदीतटाक ॥१॥ ब्रह्मवृक्षा आश्रुनि ॥प्राङ्मुखोदय होऊनि ॥ बैसोनियां स्वस्थासनीं ॥ प्राणायामत्रय करावा ॥२॥ वरि तया मंत्रासि ॥ ब्रह्मा ऋषि ॥ दैवी गायित्री छंद विशेषीं। परशिव देवता ॥३॥ अं बीजं उं शक्ति ॥ मं कीलकं मोक्षार्थे विनियोग इति ॥ प्रथम स्मरोनि उपरांति ॥ मंत्रें करन्यास करावा ॥४॥

---

कार, मकार, बिंदु नाद या पंचाक्षरानें युक्त (७) तारक, दंडक, कुंडल, अर्धचंद्राकार, दर्पणाकार, ज्योतिर्मयाकार असे षड्रूपयुक्त आहे (८) आणि ॐकार, ब्रह्म,ज्ञान शिवात्मक (९) सर्व विद्याबीज, तेजोबीज, मूर्तिबीज, निष्कल,(१०)नाद, नादादि, हृन्नाद, वेदादि, वेदभूमि, मंत्रप्राण (११) ब्रह्ममूर्ति, अक्षर मुख्य स्वर, वेदाद्यंत, नादमंत्र, आत्ममंत्र वगैरे पर्यायनामांनीं युक्त हा अपरप्रणव आहे.

## मंत्रानुष्ठान.

(१) नंतर त्या मंत्रांच्या सिद्धीकरितां जप प्रारंभाचे वेळेस स्नानादि विधियुक्त होऊन ब्रह्मारण्य, नदीतटाक (२) वगैरे उत्तम स्थलांमध्यें ब्रह्मवृक्षाचा आश्रय करून पूर्वेकडे तोंड करून बसावें. नंतर प्राणायाम त्रय करावा (३) नंतर त्या मंत्राचा ब्रह्मा हा ऋषि आहे. व दैवी गायत्री छंदस् आहे परशिव अधिदेवता आहे (४) अं बीजशक्ति आहे उं शक्ति आहे मं कीलक आहे या सर्वांचा विनियोग मोक्षार्थ जपामध्यें करावा.

## मंत्रन्यास.

अकार ॥ उकार ॥ मकार ॥ न्यास करूनि ॥ १ ॥ करद्वयाचे अंगुष्ठादि कनिष्ठांत ॥ अंगुलिचे आदि मध्य अंत ॥ पर्वांचे ठायीं समस्त ॥ प्रत्येक बिंदुयुक्त ॥२॥ आणिक बिंदुयुक्त॥ प्रणव नाम समस्त ॥ अंगुलीठायीं विहित ॥ न्यास करावा ॥ ३ ॥ वरि प्रणवेंचि करूनि ॥ करतलकरपृष्ठाभ्यां नमः ह्मणोनि॥ करशुद्धि करूनि ॥याप्रकारें करन्यास झाला ॥४॥ वरि आपुलिये ॥ ठायीं नाभिहृदय ॥ मूर्धे ॥ अनुक्रमें ॥ ५ ॥ बिंदुसंयुक्ते साचार ॥ अकार उकार ॥ तथा मकार ॥ न्यास करावा ॥ ६ ॥ वरमूर्ध्नि आदिपादान्त धरूनि ॥ बिंदुयुक्त प्रणवन्यास करून ॥ ऐसा देहन्यास झाल्यानंतर ॥७॥ वरि ॐभूः प्रज्ञानात्मने हृदयाय नमः ह्मणोनि ॥ दक्षिण कराचे चतुरंगुलिनें हृदय स्पर्शोनि ॥ हृदयास्थितमंत्रदेवता ते स्थानीं॥ ते नमस्कारिजे ॥८॥ ॐ भुवो ॐवाय्वात्मने शिरसे स्वाहा ह्मणोनि ॥ दक्षिणकराचे चतुरांगुलिनें शिरसि मंत्रदेवता स्पर्शोनि ॥ परमचंद्रामृते निजमूलाग्नि ॥ प्रकाशिजे ॥ ९॥ ॐ सुवः सूर्यात्मने शिखायै वषट् ह्मणोन ॥ शिखामध्यें वसे ऊर्ध्व ज्वलनस्वभाव परम शिवचैतन्य ॥ ऊर्ध्वं अंगुष्ठमुष्टि करून ॥ स्पर्शन कीजे ॥१०॥ ॐ

---

## मंत्रन्यास.

(१) नंतर त्या मंत्रानें करन्यास करावयाचे वेळेस (२)करद्वयाच्या अंगुष्ठापासून कनिष्ठिकेपर्यंत अंगुलीच्या आदि मध्य अंत पर्वांमध्यें बिंदुयुक्त अकार उकार मकारांचा न्यास करावा (३) नंतर बिंदुयुक्त प्रणवाचा न्यास सर्व अंगुलींवर करावा(४) नंतर त्यास प्रणवानें करतलकरपृष्ठांस सम्मार्जन करावें याप्रमाणें करन्यास संपला (५) नंतर नाभि हृदय, मूर्धा, यांवर अनुक्रमानें (६) बिंदुयुक्त अकार उकार मकार यांचा न्यास करावा (७) नंतर मस्तकापासून पायापर्यंत प्रणवाचा न्यास करावा (८) याप्रमाणें देहन्यास संपल्यानंतर " ॐ भूः, प्रज्ञानात्मने हृदयाय नमः" असें ह्मणून दाक्षिणकराच्या चार अंगुलींनीं हृदयस्पर्श करावा. नंतर हृदयस्थित मंत्रदेवतेला नमस्कार करावा (९) नंतर "ॐभुवो वाय्वात्मने शिरसे स्वाहा", असें ह्मणून दक्षिणकराच्या चार अंगुलीनीं शिरःस्थित मंत्रदेवतेचा स्पर्श करून परमचंद्रामृतानें मूलाग्नीस आरती करावी (१०) ॐ सुवः सूर्यात्मने शिखायै वौषट्' असें ह्मणून शिखास्थित ऊर्ध्वज्वलन स्वभावाच्या परशिवाला ऊर्ध्व अंगुष्टमुष्टीनें खालीं आणावे (११) " ॐमहः ब्रह्मात्मने कवचाय हुं " असें

महाब्रह्मात्मने कवचाय हुं ह्मणोनिया ॥ अधोमुख जीवन चैतन्य आपुलिया ॥ शिरप्रतिरोमकूपाचिया ॥ ठायीं विजृंभे तैसे ॥११॥ उभय पाणी ॥ तर्जनीचेनि ॥ वज्रकवचें करूनि ॥ निरोधिजे ॥ १२ ॥ ॐ जनः ज्ञानात्मने नेत्रत्रयायवौषट्र ह्मणोनि ॥ दक्षिणकरमध्यस्थान ॥ अंगुलीत्रयें करून ॥ नेत्रस्पर्शने ॥१३॥ परमशिवचैतन्य ॥ तो सर्वत्र स्फुरे आपण ॥ तैसे निपुण अभिव्यक्ति करूनि ॥ १४ ॥ ॐ तपः सत्यं सत्यात्मने ॥ अस्त्राय फट्र ह्मणोनि बाहुमुळीं अंगुष्ठ तर्जनीनें ॥ ध्वनि होय तैसे संख्येनें ॥ अस्त्र कीजे ॥१५॥ पूर्वादिदशदिशा समस्त ॥ ते ठायीं अभिव्यक्त ॥ रक्षणार्थ निमित्त ॥ १६ ॥ परमशिवचैतन्यरूप अस्त्र ॥ इंद्रादि करून लोकपाळ हस्तीं ॥ स्थापन करावें ॥१७॥ ॐ भूर्भुवः सुवः अस्त्रायफट्र ह्मणोनि ॥ तया दिक्पाळकासि अन्योन्यं ॥ संबंध करणें हें कारण ॥ षडंगपल्लवार्थ ॥१८॥ परि क्रमें समस्त ॥ मंत्रासि होय संमत ॥ हें ब्रह्मकवच विख्यात ॥ ह्मणवी निरुतें ॥१९॥ हें ब्रह्मकवच धरी अखंड ॥ तयासि ब्रह्मास्त्र ब्रह्मदण्ड ॥ काळादिक दंड ॥ वज्रायुधादिकांसि ॥२०॥ अभेद्य सर्वथैव ॥ ह्मणोनिया सर्व ॥ सुरनरगणगंधर्व ॥ तथासि पूज्यमान होय ॥२१॥ आणिक या क्रमें विशेष ॥ करन्यास देहन्यास ॥ आणि अंगन्यास ॥ केलिया नंतरें ॥२२॥ जगन्मात्र सकळवि-

ह्मणून अधोमुख चैतन्याला आपल्या मस्तकाच्या प्रतिरोमकूपामध्यें आणावें (१२) नंतर दोन्ही हाताच्या तर्जनीनें वज्रकवच करून त्यास निर्बंधांत ठेवावें (१३) नंतर " ॐ जनः ज्ञानात्मने नेत्रत्रयाय वौषट् " असें ह्मणून दक्षिणकराच्या मध्यांगुलित्रयानें नेत्रस्पर्श करावा (१४) नंतर त्या योगानें परशिवचैतन्य स्पष्टपणें सर्वत्र स्फुरण पावेल असें करावें (१५) नंतर " ॐ तपः सत्यं सत्यात्मने अस्त्राय फट्" असें ह्मणून बाहुमूलावर अंगुष्ठतर्जनीं अंगुलींनी ध्वनि होईल त्याप्रमाणें अस्त्र करावें (१६) नंतर दाहीदिशांमध्यें रक्षणार्थ परशिव चैतन्यस्वरूप अस्त्र (१७) इंद्रादिलोकपालांच्या हातांत द्यावें (१८) नंतर "ॐ भूर्भुवः सुवः अस्त्रायफट्" असें ह्मणून त्या दिक्पालांचा परस्पर संबन्ध करावा (१९) हा षडंग पल्लवार्थ मंत्रासमान आहे याला ब्रह्मकवच असें ह्मणतात (२०) हें ब्रह्मकवच निरंतर धारण करणाऱ्यास ब्रह्मास्त्र, कालदंड, वज्रायुध (२१) वगैरें अस्त्रें कांहीं करूं शकत नाहींत, ह्मणून सुरनर गंधर्व यांस पूज्य होत आहेत. (२२) याप्रमाणें करन्यास देहन्यास अंगन्यास केल्या नंतर (२३) सर्व जग तापलेल्या अयःपिंडा ( लोखंडाच्या

शेष ॥ तत्राथःपिंड ऐसे ॥ प्रणवज्योति व्यापक असे॥ ह्मणोनि अनुसंधान धरी ॥२३॥ नातरी आपुले मूळाधार ॥ आदि सकळ चक्र ॥ असे भेदिलें साचार ॥ ह्मणोनिया ॥२४॥ सुषुम्नानाडी मध्यगत ॥ विद्युल्लेखात्मक विजृंभित ॥ बिंदुचिंतनयुक्त ॥ होऊनि तरी ॥२५॥ नातरी हृत्कमळ॥ कर्णिकागत सोमसूर्याग्निमंडळ ॥ तयांत महेश्वर ॥ ध्यानानुकूल ॥ युक्त होऊनि तरी ॥ २६ ॥ दशलक्ष जप आदरें ॥ पुरश्चरण केलिया नंतरें ॥ वरि तो प्रणवमंत्र साचारें ॥ सिद्धि झालिया ॥ २७॥ मग सकळ पापक्षय ॥ षट्कर्मसिद्धि अष्टमहदैश्वर्य ॥ सर्व विद्यासंपन्न ॥ यथेष्ट फलप्राप्ती होय ॥ ह्मणोनि सत्य जाणावें ॥२८॥

## अजपामंत्रयोग.

यानंतरें त्या मंत्रांत प्रसिद्ध ॥ आत्मप्रसाद ॥ ह्मणिजे प्रसिद्ध ॥ सर्वात्मकाचे ठायीं ॥ १ ॥ रेचकपूरक ॥ ह्मणिजे प्राणापानरूपक ॥ रविशशिसंयुक्त मुख्य ॥ संचरत असति॥२॥ हंसःसोहं ह्मणिजे द्विभेद होऊन ॥ जीवमंत्र ह्मणोनि ॥ हंसमंत्र ह्मणोनि ॥ नाम पढोनि असे ॥ ३ ॥ अजपागायित्री ॥ हंसजीवमंत्र ॥ असें नाम पावोनि ॥ त्यांसह पुढती ॥४॥ त्यालागीं प्राणायामत्रय परी॥ मंत्रपूर्वक करूनि वरि॥ मंत्रासि हं-

---

गोल्या ) प्रमाणें प्रणवज्योतिव्यापक आहे असें अनुसंधान करून (२४) किंवा मूलाधाराद्यखिलचक्र भेदिनी (२५) अशा सुषुम्नानाडीच्या मध्यें असलेल्या विद्युल्लेखात्मक बिंदूचें चिंतन करावें (२६) किंवा हृदयकमलकर्णिकेमध्यें सोमसूर्याग्नि मंडलत्रयांत महेश्वरध्यान करावें (२७) नंतर दहा लाख जप करून पुरश्चरण केल्यानंतर प्रणव मंत्र सिद्धीस येतो (२८) नंतर सकल पापक्षय होऊन षट्कर्मसिद्धि अष्ट महदैश्वर्य, सर्व विद्याप्राप्ति वगैरे फळें निश्चयानें प्राप्त होतात असें सत्यपणें जाणावें.

## अजपामंत्रयोग

(१) नंतर त्या मंत्रामध्यें प्रसिद्ध असा आत्मप्रसाद सर्वात्म्यांच्या (२) हृदया मध्यें रेचकपूरक व प्राणापानरूप रविशशियुक्त संचार करीत असतात. (३) त्यांत "हं, सः" "सोहं" असे दोन भेद होऊन त्यांत जीवमंत्र एक आणि हंसमंत्र एक असें त्या मंत्राला नांव आलें. (४) शिवाय याला अजपा गायत्री मंत्र असें नांव आहे. या मंत्राचा जप करावयाचा प्रकार सांगतात कीं प्रथम (५) प्राणायामत्रय करून या मंत्राचा ऋषि हंस असून अव्यक्त गायत्री छंदस् आहे व

स ऋषि अव्यक्तगायित्री ॥ छंद परमहंस देवता ॥५॥ हं बीजं स्वाहा शक्ति ॥ सोहं कीलकमिति ॥ परमहंसप्रसादार्थं जपे विनियोग इति॥ स्मरोनिया ॥६॥ आणिक हंसां सूर्यात्मने अंगुष्ठाभ्यां नमः ॥ हंसीं सोमात्मने तर्जनीभ्यां नमः ॥ हंसूं निरंजनात्मने मध्यमाभ्यां नमः ॥ हंसैं निराभासात्मने अनामिकाभ्यां नमः ॥७॥ हंसौं अव्यक्तात्मने कनिष्ठिकाभ्यां नमः ॥ हंसः अतिसूक्ष्मात्मकाय करतलपृष्ठाभ्यां नमः ॥ ह्मणोनि करन्यास करूनि ॥८॥ वरि अनुक्रमें हृदयादिकरांत ॥ षडंगन्यास तेथें ॥ तेते पल्लवयुक्त ॥ अंगन्यास कीजे ॥९॥ मग हृत्कमळकर्णिकामध्यें ॥ श्वेतवर्णानें शुद्ध ॥ परशुमृगवरद ॥ अभययुक्त ॥१०॥ करचतुष्टय शोभित ॥ सर्वलक्षणसंपूर्ण सहित ॥ उमापतिध्यानरत ॥ होऊनिया ॥११॥ श्रीगुरुचिया ॥ उपदेशें करूनिया ॥ अरुणोदया ॥ समयीं जप करावा ॥१२॥ तया मंत्रजपासि मिति ॥ सूर्योदयादि सूर्यास्तअंतु ॥ एकविंशति ॥ सहस्र षट्शत जप ॥१३॥ तयामध्यें मूळ ॥ आधारादि ब्रह्मरंध्रांत सकळ ॥ सप्तचक्रकमळ ॥ अनुक्रमें असे ॥१४॥ तयांत श्रीगणपतीसि षट्शत ॥६००॥ षट्सहस्र ब्रह्मयातें ॥ ६००० ॥ षट्सहस्र विष्णूतें ॥६०००॥ उमामहेश्वरातें ॥ षट्सहस्र ॥६०००॥ एक सहस्र जी-

---

परमहंस देवता असून (६) हं बीज आहे. स्वाहा शक्ति असून सोंहं कीलक आहे असें बीजाक्षर वगैरेचें स्मरण करून "परमहंसप्रसादसिध्यर्थं जपे विनियोगः" असें स्मरण करावें. (७) नंतर "हंसां सूर्यात्मने अंगुष्ठाभ्यां नमः" हंसीं सोमात्मने तर्जनीभ्यां नमः हंसूं निरंजनात्मने मध्यमाभ्यां नमः हं सैं निराभासाय परमात्मने अनामिकाभ्यां नमः (८) हं सौं अव्यक्तात्मने कनिष्ठिकाभ्यां नमः' हंसः अतिसूक्ष्मात्मने करतलकरपृष्ठाभ्यां नमः' याप्रमाणें करन्यास करावा. (९) नंतर अनुक्रमानें हृदयापासून करापर्यंत षट्पल्लवयुक्त षडंगन्यास करावा (१०) हृदयकमलकर्णिकेंत असलेला, श्वेतवर्णयुक्त, परशु मृग वरदअभयहस्तयुक्त, (११) चार हातांनीं शोभत असलेला, सर्व लक्षणांनींयुक्त अशा उमापतीचें ध्यान करावें (१२) नंतर गुरूपदेशाच्या प्रकारानें अरुणोदयाचे वेळेस जप करावयास सुरवात करावी. (१३) सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत २१६०० एकवीस हजार सहाशें जप करावेत. (१४) त्यांमध्यें आधारादि ब्रह्मरंध्रांत सप्तचक्र कमलांमध्यें (१५) अनुक्रमानें श्रीगणपतीस ६०० सहाशे, ब्रह्मदेवास ६००० सहा हजार, विष्णूस ६००० सहा हजार, महेश्वरास ६००० सहा हजार, जीवात्म्यास १००० हजार, परमात्म्यास १०००

त्मयासि ॥१०००॥ एकं सहस्र परमात्म्यासि॥१०००॥ एक सहस्र श्री गुरूसि ॥१०००॥ अजपा गायित्री ॥ १५॥ मंत्रजपमहं निवेदयामि ह्मणोनि ॥ ऐसें परि संकल्पूनि ॥ मग जपकरी तयाची नासोनि ॥ जाति सर्व पातकें ॥ १६ ॥ वरि आयुरारोग्यादिक ॥ भोगमोक्षादिक मुख्य ॥ सर्वसिद्धिप्रदायक ॥ ह्मणोनि जाणावें ॥ १७ ॥

## शिवपंचाक्षरी.

आणिक तया सकळिक ॥ मंत्राभीतरीं एक ॥ मूळ मंत्राक्षरी ह्मणी मुख्य ॥ होऊनि असे ॥ १ ॥ विद्या ह्मणोनि ॥ शिव ह्मणोनि ॥ शैव ह्मणोनि ॥ शिवहृदय ह्मणोनि ॥२॥ सूत्र ह्मणोनि ॥ पर्यायनाम पावोनि॥ वेदागमपुराणीं ॥ प्रसिद्ध असे ॥ ३ ॥ सूक्ष्ममंत्र जाला तरी ॥ महाअर्थ तयाभीतरीं ॥ असे वटबीजापरी ॥ तया कारणें ॥४॥ समस्त शिवभक्त ॥ जनासि विहित ॥ जपावया कृत्य ॥ योग्य ह्मणवी ॥५॥ प्रणवपूर्वक ॥ भूतादि सकळिक ॥ पंचवर्णादिक ॥ नकारादि ॥ ६ ॥ यकारांत विशेषें ॥ षडक्षर निष्प्रयासें ॥ कारण होऊनि असे भुक्तिमुक्तिप्रदायक ॥७॥ ते पंचाक्षरीमंत्र ॥ प्रथम गुरुमुखें विवर ॥ अर्थसहित विचार ॥ जाणोनिया ॥८॥ यथाशक्ति गुरुदक्षणा देऊनि ॥ मग तया श्रीगुरुचे आज्ञेकरून ॥ मंत्रसिद्धार्थी होऊनि ॥ प्रारंभावें ॥९॥ येथें पुढें सां-

---

हजार, श्रीगुरूस १००० हजार, ' अजपा गायत्री (१६) मंत्रजपमहं निवेदयामि ' असें ह्मणून संकल्प करावा. अशा रीतीनें जप करणाऱ्यांचीं पातकें सर्व जळून जातात.(१७)आणि आयु,आरोग्य भोग मोक्ष वगैरे सर्व सिद्धि प्राप्त होतात.

## शिवपंचाक्षरी.

(१) आणि त्या सर्व मंत्रांमध्यें मूलपंचाक्षरी मंत्रच मुख्य विद्या आहे. (२) या मंत्राचीं विद्या, शिव, शैव, शिवहृदय (३) सूत्र, अशीं पर्याय नांवें आहेत. आणि हा मंत्र वेद आगम पुराण यांमध्यें प्रसिद्ध आहे. (४) हा मंत्र सूक्ष्म जरी आहे तथापि वटबीजाप्रमाणें पुष्कळ अर्थाचा आहे (५) शिवभक्त महाजनांस जप करावयास परमयोग्य आहे. (६) आतां जपाचा प्रकार सांगतात कीं प्रणवपूर्वक भूतादि पंचवर्गयुक्त पंचवर्ण अशा नकारादि (७) यकारांत अक्षरांनीं युक्त भुक्तिमुक्तिप्रदायक (८) असा पंचाक्षरीमंत्र प्रथम गुरुमुखानें अर्थसहित समजावून घ्यावा. (९) नंतर गुरूस दक्षिणा देऊन नंतर गुरूची आज्ञा घेऊन मंत्रसिद्ध करावयाकरतां जपास आरंभ करावा. (१०) जप करावयाच्या पूर्वीं शुभ मासादि-

गो शुभ मासादि विवेकुनि ॥ आणिक जलस्नान भस्मस्नानादि करू-
नि ॥ आपुली शरीरशक्ति जाणूनि ॥ शाकामूळ शाक फळ क्षीर से-
वुनि ॥ मिताहारत्वें ॥१०॥ आणिक अक्षरासि एकएक ॥ लक्षपरिमि-
ति जप॥ दिन एकासि द्वादशक ॥ सहस्र जप करावा ॥११॥ क्षीर घृत
नातरि पालाशकुसुम ॥ तयानें एक सहस्र होम ॥ लक्ष तर्पणक्रम ॥
करावें पुराणोक्त ॥१२॥ नातरि कल्पोक्त ॥ प्रमाण चतुर्विंशति ॥ लक्ष
जप मिति ॥ पूर्वोक्त यथासंख्या क्रमें ॥१३॥ होमतर्पण ॥ विशेषें करा-
वें निपुण ॥ ऐसें पुरश्चरण ॥ झालियावरी ॥१४॥ दिन एकासि अष्टो-
त्तरशत ॥ द्विशतार्धक त्रिशत ॥ अथवा पंचशत ॥ नातरी सहस्र॥१५॥
अथवा द्वादशक ॥ सहस्रसंख्यानें विशेख ॥ नित्य जप करणें पूर्वक॥
हे विधी ह्मणवी ॥१६॥ संख्याहीन जपफळ ॥ ते राक्षसकुळ ॥ परिह-
रति सकळ ॥ ह्मणोनि जाणावें ॥१७॥

## तर्पणादिसंख्या.

आणिक कवण मंत्रजप केला तरी॥ प्रतिदिवशीं उत्तरन्यास करी॥
तेणेंकरून दिग्विमोचन करी ॥ जपसंख्या ॥१॥ पुंदेवता मंत्रांस ॥ १॥
२।४।८।१६।३२।६४।१२८।२५६।५१२।१०२४।२०४८।४०९६।८१९२।१६३८४

---

कांचा विचार करून जलस्नान भस्मस्नान वगैरे स्नानें करून आपली शरीराची शक्ति जाणून शाक मूल फल क्षीर वगैरे पदार्थांचा आहार मितपणें करावा. (११) नंतर प्रति अक्षरास लक्ष जप करावा. त्यांत प्रतिदिवशीं बाराहजार जप करून (१२) दूध तुपानें किंवा पळसांच्या फुलांनीं एक सहस्र होम करावा. नंतर एक लक्ष तर्पण पुराणोक्त करावें. (१३) किंवा कल्पोक्त चौवीस लक्ष जप करून पूर्वोक्त संख्याक्रमानें (१४) होमतर्पण वगैरे करावें. याप्रमाणें पुरश्चरण झाल्यानंतर (१५) प्रतिदिवशीं एकशेआठ, दोनशे पन्नास, तीनशे, दोनशे, (१६)बाराहजार, अशा क्रमानें साधेल तसा जप करावा याला विधि ह्मणतात. (१७) संख्याहीन जप केला असतां जपाचें फळ राक्षस घेतात. असा नेम आहे.

## तर्पणादिसंख्या.

(१)नंतर मंत्रजप पूर्ण झाला असतांही प्रतिदिवशीं नियमित जप केल्यानंतर उत्तरन्यासानें दिग्विमोचन केल्यानंतर जपसंख्या,(२)पुंदेवता,मंत्र यास२-४-८-१६-३२-६४-१२८-२५६-५१२-१०२४-२०४८-४०९६-८१९२-१६३-

या परिमितीनें राहावें ॥ स्त्रीमंत्रांस ।१।३।९।२७।८१।२४३।७२९।२१८७ ६५६१।१९६८३ या परिमितीनें राहावें ॥ नपुंसकमंत्रांस ।२।६।१२।३६ ।७२।२१६।४३२ या परिमितीनें राहावें ॥ प्रणवहंस पंचाक्षर्यादि निष्कामजपास ॥ या संख्येचा नियम नसला तरी त्यास ॥ इच्छानुसार जपास ॥ संख्यागणना करावी ॥२॥ तें सर्व ईश्वरार्पण करोनियां ॥ त्या मंत्राचे सकाम जप केलिया ॥ संख्यानियम करावया ॥ जाणावें सूज्ञें ॥३॥ अक्षरास लक्ष जप केलिया ॥ मध्यमसिद्धि तया ॥ जाणोनि अनुष्ठान करोनियां ॥ लक्ष जपास १००००० तद्दशांश १०००० तर्पण जाणावें ॥४॥ तद्दशांश होम १००० तद्दशांश संतर्पण १०० । जपसम ॥ अथवा जपार्ध ॥ ५ ॥ अथवा षोडशांश दक्षिणा ॥ असा विधि सर्व जाणा ॥ तत्तत्संख्यानियम सामान्यपणा ॥ निर्धारावा ॥६॥

## जपविभाग.

पुरश्चरणरहित ॥ संख्या नेमें देहांतपर्यंत ॥ जप करणें नित्यकृत्य ॥ तें कनिष्ठ ह्मणवी ॥ १ ॥ पुरश्चरणविधानें ॥ करूनि यथा लक्षणें ॥ तरी मंत्रत्याग करणें ॥ तो मध्यम ह्मणवी ॥ २ ॥ पुरश्चरण समाप्त ॥ करूनि

---

८४-याप्रमाणें संख्येनें नियमित जप करावा स्त्रीमंत्रांस–१–३–९–२७–८१–२४३–७२९–२१८७–६५६१–१९६८३–नपुंसक मंत्रास २।६।१२।३६।७२।२१६।४३२ याप्रमाणें नियमित संख्या आहे. निष्कामजप करणाऱ्यांस प्रणवहंसपंचाक्षरी मंत्रास संख्यानियमाचा निर्बंध नसला तरी त्यानें यथेच्छ जप करून झालेली संख्या जाणून(३) ईश्वरार्पण करावें आणि सकाम जप करणाऱ्यानें पूर्वोक्त संख्यानियमाचा निर्बंध पाळावा.(४)अक्षरांस लक्ष जप केला असतां मध्यम सिद्धि प्राप्त होते. याप्रमाणें जप एक लाख करून दहा हजार तर्पण करावें. (५) आणि एक हजार होम करून शंभर तर्पण करावें. जपाच्या संख्येबरोबर किंवा जपाच्या निम्यानें (६) जपाच्या षोडशांशाइतकी दक्षिणा द्यावी याप्रमाणें संख्यानियम पाळावा.

## जपविभाग.

(१) नंतर सांगतात कीं पुरश्चरण न करतां संख्येच्या नियमानें देहांतपर्यंत जप केला तरी तो नित्य जप असा ह्मणवतो. परंतु हा कनिष्ठ जप होय. (२) पुरश्चरण करून मध्येंच सोडला असतां याला पुरश्चरण जप असें ह्मटलें तरी हा जप मध्यम होय. (३) पुरश्चरण करून संख्यानियमानें प्राण असेपर्यंत जप करणें

वरि नित्यकृत्य ॥ संख्या नेमें प्राणांत ॥ जप करणें ॥३॥ तो पुरश्चरण-पूर्वक ॥ नित्यजप विशेष ॥ उत्तम ह्मणवी मुख्य ॥ ह्मणोनि जाणावें ॥४॥

## जपारंभ.

उपरि मंत्र जपाचिये ॥ प्रारंभ समयें ॥ प्राणायाम त्रया करूनियां ॥१॥ आणिक तया मंत्रासि ॥ वामदेव ऋषि ॥ पंक्तिः छंदःसदाशिव विशेषि ॥ आदिदेवता ॥ २ ॥ बं कीलक हं सलक्ष्य सोहं भावना। चिन्मुद्रातारक स्थान ॥ शांभवी द्वार जाण ॥ षण्मुखी तंत्र ॥३॥ प्रणव बीज उमा शक्ति ॥ उदात्तस्वर श्वेतवर्ण स्थिति ॥ भोगमोक्ष प्रीत्यर्थे जपे विनियोगः इति ॥ स्मरोनियां ॥४॥ वरि पिंडब्रह्मांडाचे ठायीं मुख्य ॥ भूम्यादि आत्म्यांत षट्क्रमपूर्वक ॥ नकारादि प्रणवांत अक्षरात्मक ॥ अनुसंधानावें ॥५॥

## करन्यासभेद.

आणिक त्या मंत्रानें करन्यास विधि ॥ करावया करद्वयांगुष्ठादि। कनिष्ठांत यकारादि ॥ नकारांत ॥१॥ पंचाक्षरीविलोमवर्ण प्रत्येक बिंदु-

---

याला (४) पुरश्चरणपूर्वक नित्य जप असें ह्मणतात हा उत्तम जप होय. असा विभाग जपामध्यें आहे.

## जपारंभ.

(१) मंत्रजपाच्या आरंभीं शुचिर्भूत होऊन प्राणायामत्रय करावा. (२) आणि या मंत्रास वामदेव ऋषि असून पंक्ति छंदस आहे. सदाशिव देवता असून (३) प्रणव बीज आहे. उमा शक्ति असून बं कीलक आहे आणि हंस लक्ष्य असून या जपामध्यें " सोहं " अशी भावना करावी लागते. यांत चिन्मुद्रा असून तारक हें स्थान आहे. शांभवी द्वार असून षण्मुखी तंत्र आहे(४) व हा मंत्र उदात्त स्वराचा असून श्वेतवर्णाचा आहे आणि भोगमोक्ष देणारा आहे " उपात्तदुरितक्षयद्वारा परमेश्वरप्रीत्यर्थे जपे विनियोगः " असें स्मरण करून (५) नंतर पिंडांडब्रह्मांडामध्यें मुख्यत्वेंकरून असलेल्या भूम्यादि आत्मांत तत्वांच्या क्रमांनीं नकारादि प्रणवांत अक्षरात्मक अनुसंधान करावें नंतर न्यास करावा.

## करन्यासभेद.

(१) त्या मंत्रानें करन्यास करावयाचे वेळेस करद्वयाच्या अंगुष्ठादि कनिष्ठांत अंगुलीवर यकारादि नकारांत (२) पंचाक्षरींतील विलोमपंचाक्षरें प्रत्येक बिंदुयुक्त

संयुक्त ॥ मंत्रबीज एकएकातें ॥ बिंदुसमेते ॥ प्रणवद्वय ॥२॥ आदिअं-त मेळऊनि ॥ अंगुली आदिकरूनि ॥ अग्रपर्यंत करणें यालक्षणीं ॥ तो सृष्टिन्यास ह्मणवी ॥ ३ ॥ कनिष्ठादिअंगुष्ठांत ॥ नकारादि यकारांत ॥ वर्णानुक्रमें अंगुल्याद्यग्रपर्यंत ॥ करणें तो संहारन्यास ह्मणवी ॥४॥ मध्यांगुल्यादि तर्जन्यांत ॥ शिकारादि मकारपर्यंत ॥ अक्षरयथार्थं ॥ तयां परिक्रमें॥५॥ अंगुलि मध्यस्थान ॥ आदि अग्रस्थान ॥ पर्यंत करणें इहीं लक्षणें ॥ तो स्थितिन्यास ह्मणवी ॥ ६ ॥ आणिक अंगुलीचिया ॥ पर्वांचे ठायीं विवेकूनियां ॥ मंत्राक्षर याप्रकारें जाणोनिया ॥ न्यास करावा ॥७॥ आणिक प्रत्येक ॥ अंगुलीचे ठायीं विशेख ॥ संपुटजोडुनि मुख्य ॥ प्रणवन्यास करावा ॥८॥ आणिक तया करद्वय ॥ चतुरंगुलि-सी तया ॥ अंगुष्ठें करूनियां ॥ तर्जन्यादि न्यास करावा॥९॥ करतलद्व-यासि विचारें ॥ बिंदुयुक्त प्रणवत्रय वामदक्षिणकरें ॥ दक्षिणकर वाम-करें ॥ करतल ॥१०॥ आनुलोमकरशुद्धि ॥ करणें इहीं विधि ॥ तो न्या-सामर्थी ॥ सृष्टिन्यास ह्मणवी ॥११॥ विलोमकर ॥ शुद्धि करणें साचा-र ॥ तो संहार ॥ न्यास ह्मणवी ॥१२॥

---

एकेकास आधीं आणि शेवटीं सबिंदुप्रणवद्वयाचें (३) कवच करून अंगुलमूला-पासून अंगुलाग्रापर्यंत पल्लवसहित संधान करणें याला सृष्टिन्यास ह्मणतात. (४) नंतर कनिष्ठादि अंगुष्ठांत अंगुलीवर नकारादि यकारांत पंचाक्षरींतील अक्षरांचा अनुलोमन्यास करून क्रमानें अंगुष्ठदलाग्रानें आदिपर्यंत पूर्वोक्तक्रमानें अनुसंधान करणें याला संहारन्यास ह्मणतात. (५) आणि मध्यमांगुलीपासून तर्जनीपर्यंत अंगुलीवर शिकारादि नकारांत अक्षरांचा न्यास करून (६) अंगुलीमध्यस्थाना-पासून अग्रस्थानापर्यंत अनुसंधान करणें याला स्थितिन्यास असें ह्मणतात (७) नं-तर अंगुलीच्या पर्वांमध्यें मंत्राक्षरांचा न्यास रीतिपूर्वक उत्पत्त्यादिभेद जाणून क-रावा (८) नंतर प्रत्येक अंगुलीमध्यें समष्टीकरण करून प्रणवन्यास करावा (९) नंतर त्या करद्वयाच्या चार अंगुलींवर अंगुष्ठानें न्यास करावा अंगुष्ठावर तर्जनीनें न्यास करावा (१०) नंतर करद्वयास बिंदुयुक्त प्रणवत्रयानें वामकरास दक्षिणकरानें आणि दक्षिणकरास वामकरानें (११) अनुलोमपूर्वक संमार्जन करणें याला सृ-ष्टिन्यास ह्मणतात (१२) विलोमपूर्वक संमार्जन करणें याला संहारन्यास ह्मणतात.

## अंगन्यासभेद.

याप्रकारें ॥ करन्यास केलिया नंतरें ॥ वरि विशेषाकारें ॥ देहन्यासाचे ठायीं ॥१॥ मूर्ध्नि मुख कंठ हृदय ॥ गुह्यपादाचिये ॥ ठायीं पर्यायें ॥ क्रमें करूनि ॥२॥ प्रणवादि यकारांत प्रत्येक ॥ मंत्राक्षर बिंदुयुक्त पूर्वक ॥ प्रणवद्वय संपुट करूनि करणें मुख्य ॥ तो सृष्टिन्यास ह्मणवी ॥३॥ आणिक परिक्रमें पादादि मूर्ध्निपर्यंत ॥ प्रणवादि यकारांत ॥ करणें यथायुक्त ॥ तो संहारन्यास ह्मणवी ॥४॥ आणिक हृदये गुह्ये ॥ पादमूर्ध्नि मुख कंठाचिये ॥ ठायीं पर्यायें ॥ क्रमें करूनि ॥५॥ प्रणवादि यकारांत ॥ करणें यथार्थ ॥ तो असे ह्मणवित ॥ स्थितिन्यास ॥६॥ आणिक सर्व मंत्राचेनि ॥ शिरसादि करून ॥ सर्वांग विशेषूनि ॥ न्यास करावा ॥७॥ त्या सर्वांग न्यासाचिये ॥ ठायीं कनिष्ठांगुष्ठयोगें हृदये ॥ अनामिकाअंगुष्ठ उभयें ॥ योगें मूर्ध्नि ॥८॥ मध्यमांगुष्ठयोगें शिखा ॥ करद्वयतर्जनीयोगें कवच मुख्यें ॥ दक्षिण हस्तक ॥ मध्यांगुलित्रयें नेत्र ॥९॥ दक्षिणकर ॥ चतुरांगुलि एकत्र ॥ संयोगें अस्त्र ॥ वाम करावरी ॥१०॥ प्रणवादि यकारांत ॥ मंत्राक्षरें पूर्वोक्त ॥ जाणोनि करणें यथास्थित ॥ तो सृष्टिन्यास ह्मणवी ॥११॥ मंत्रवर्ण भेदरहित ॥ अस्त्रादि हृदयांत ॥

---

## अंगन्यास भेद

(१) असा करन्यास करून नंतर देहन्यासामध्यें विशेषेंकरून (२) मस्तक, मुख, कंठ, हृदय, गुह्य पाद यांवर क्रमानें (३) प्रणवादियकारांत प्रत्येक बिंदुयुक्त प्रणवद्वयसंपुटयुक्त होऊन अनुसंधान करणें याला सृष्टिन्यास असें ह्मणतात (४) नंतर अनुक्रमानें मंत्रानें पादादिमस्तकापर्यंत प्रणवादियकारांत न्यास करणें याला संहारन्यास ह्मणतात. (५) नंतर हृदय गुह्य, पाद, मस्तक, मुख, कंठ यांवर क्रमानें (६) प्रणवादि यकारांत न्यास करणें याला स्थितिन्यास ह्मणतात (७) नंतर सर्व मंत्रांनीं मस्तकापासून सर्वांगावर न्यास करावा (८) नंतर त्या अंगन्यासामध्यें कनिष्ठिकांगुष्ठयोगानें हृदयावर, अनामिकांगुष्ठयोगानें मस्तकावर (९) मध्यमांगुष्ठयोगानें शिखेवर न्यास करावा. करद्वयाच्या तर्जनींनीं कवच दक्षिण कराच्या मध्यांगुलित्रयानें नेत्र (१०) दक्षिणकराच्या चार अंगुली वाम करावर संयुक्त करून अस्त्र (११) वगैरे करून प्रणवादि यकारांत मंत्राक्षरांचा न्यास पूर्वोक्त क्रमानें तो तो पक्षयार्थ जाणून करणें याला सृष्टिन्यास ह्मणतात (१२) नंतर वर्णमंत्रामध्यें भेद न ठेवि-

करणें तो यथार्थ ॥ संहारन्यास म्हणावी ॥१२॥ आणि यथार्थ ॥ कवचादि शिखांत ॥ करणें तो न्यास ॥ स्थितिन्यास म्हणावी ॥१३॥ ईशानादि सद्योजातांत उद्धृति ॥ सद्यादि ईशानांत संहारपद्धति ॥ अघोरादि तत्पुरुषांत करणें तो स्थिति ॥ न्यास म्हणावी ॥१४॥ इति पंचप्रकार ॥ ब्रह्मन्यासप्रकार ॥ देहे अंगत्रयाचे ठायीं विचार ॥ पूर्वक करावा ॥ १५ ॥ वरि पूर्वादि ऊर्ध्वांत ॥ पंचदिशांचे ठायीं नकारादि यकारपर्यंत ॥ अक्षरें यथाक्रम ॥ करूनी स्थापावीं ॥१६॥ अंगुष्ठांत तर्जनी उभये ॥ संयोगें ध्वनि होय ॥ तैसें इंद्रादि दशदिशांचिये ॥ ठायीं अस्त्रपल्लव प्रयोजावें ॥१७॥ यकारादि नकारांत ॥ तो सृष्टिमंत्र म्हणावी विख्यात ॥ नकारादि यकारांत ॥ तो संहारमंत्र म्हणावी ॥१८॥ आणिक शिकार ॥ आदि अंत मकार ॥ तो स्थितिमंत्र ॥ म्हणावी निरुतें ॥ १९ ॥ एकूण अशीतिविधन्यासलक्षण ॥ त्या मंत्रयोगिन्यासलूप ॥ विचार करितां तो येथ ॥ प्रकार दोन आढळती ॥२०॥ प्रवृत्तिमार्ग आणिक ॥ निवृत्तिमार्ग आणा एक ॥ ऐसा द्विप्रकार ॥ जाणावा सूत्रें ॥ २१ ॥ त्यांत अनुलोमचि संहार जाणा ॥ विलोमचि सृष्टि जाणा ॥ हाच प्रवृत्तिमार्ग म्हणा ॥ शास्त्रविधीनें ॥२२॥ विलोमचि संहार आणोनि ॥ अनुलोमचि

---

तां अस्त्रादि हृदयांत न्यास करणें याला संहारन्यास म्हणतात (१३) नंतर कवचादि शिखांत न्यास अनुक्रमानें करणें याला स्थितिन्यास म्हणतात (१४) ईशानादि-सद्योजातांत न्यासाला सृष्टिन्यास म्हणतात सद्योजातादि ईशानांत न्यासाला संहार-न्यास म्हणतात. अघोरादि तत्पुरुषांत न्यासाला स्थितिन्यास म्हणतात (१५) या-प्रमाणें पंचब्रह्मन्यास कर, देह, अंगत्रय यांवर विचारपूर्वक करावा. (१६) नंतर पूर्वादि ऊर्ध्वांत पंचदिशांमध्यें नकारादि यकारांत अक्षरांची स्थापना अनुक्रमानें करावी. (१७) नंतर अंगुष्ठतर्जनीनें ध्वनि करून इंद्रादि दश दिशांमध्यें अस्त्र प-ल्लव मंत्रांचा प्रयोग करावा (१८) यकारादि नकारांत मंत्राला सृष्टिमंत्र म्ह-णतात. नकारादि यकारांत मंत्राला संहारमंत्र म्हणतात. (१९) आणि शिकारादि मकारांत मंत्राला स्थितिमंत्र म्हणतात. (२०) याप्रमाणें ( ८० ) ऐशीं प्रकारचे न्यास करणाऱ्या मंत्रयोग्यांनीं न्यासविकल्पमूलाचा विचार करावा म्हणजे दोन प्रकार दिसून येतील (२१) ते कोणते तर प्रवृत्तिमार्ग निवृत्तिमार्ग असें दोन मार्ग आहेत असें सूत्रें जाणावें (२२) यांत अनुलोमच संहार असून विलोमच सृष्टि आहे असें म्हणणाऱ्याच्या मार्गाला प्रवृत्तिमार्ग म्हणतात. (२३) आणि विलोमच

सृष्टि जाणोनि ॥ ह्या निवृत्तिमार्गे सम...ि ॥ आचरावें सूत्रें ॥२३॥ या- प्रमाणें तत्तल्लक्ष्यभेदें करून ॥ ...व्यु... ...दक्षिण ॥ मध्यवाम यु- क्तमध्य ॥२४ युक्तवामयुक्तदक्षिण ॥ युक्तस्वरयुक्तवर्ण ॥ युक्तपद युक्त- वाक्य जाण ॥ युक्तयोगयुक्तावयव ॥२५॥ यु...र्युत्...म युक्तांतयोग ॥ दिग्योग कालयोग ॥ अंगयोग ...करणयोग ॥ लक्ष्ययोग समष्टि- योग ॥२६॥ पिंडांडभावना ॥ ब्रह्मांडभावना ॥ इत्यादिक्रमानें न्यासभे- द जाणोन ॥ पल्लवयुक्त नानाफलसाधक व्हावें ॥२७॥ आणिक त्या मं- त्राचे ठायीं स्त्रीशूद्र ॥ तयासि प्रणवरहितसाचार ॥ नमः अंतस्थितिम- न्त्र ॥ जप करूं ये ॥२८॥ सांबशिव ॥ अथवा सदाशिव ॥ ...री तां- डव अवयव ॥ ध्यान करीत जप करावा ॥२९॥

## पंचाक्षरीविनियोग.

आणिक या अनुक्रमानें पुरश्चरण केलियावरी ॥ आणिक मन्त्रजप- विधान ॥ सकल सांगिक ॥ १ ॥ त्या लागीं बिल्ववृक्ष आश्रूनि एक ॥ दिवस जप केलियावरी॥ अविच्छेद नैरंतर्यतादात्म्य ॥ तन्मयत्वादिका- नें जप केला असतां ॥२॥ यानंतर सकळिक मन्त्रासि पुरश्चरण मुख्य होय ह्मणोनि ॥ ईश्वरगीतादि करून सांगितलें असे लागून ॥ पुरश्च- रणेसि सिद्ध झाला कारण ॥ पंचाक्षरीमंत्र॥३॥ तो पर्वताग्रीं लक्ष ए-

---

संहार असून अनुलोम सृष्टि आहे असें ह्मणणाऱ्याच्या मार्गाला निवृत्तिमार्ग ह्मण- तात. (२४) याप्रमाणें त्या त्या लक्ष्यभेदांनीं मंत्राक्षरांचा क्रम व्युत्क्रम मध्यदक्षि- ण मध्यवाम युक्तमध्य (२५) युक्तवाम युक्तदक्षिण युक्तस्वर युक्तवर्ण युक्तपद यु- क्तवाक्य युक्तयोग युक्तावयव (२६) युक्तांतर्व्युत्क्रम युक्तांतयोगादिग्योग कालयोग अंगयोग अधिकरणयोग लक्ष्ययोग समष्टियोग (२७) पिंडांडभावना ब्रह्मांडभाव- ना वगैरे क्रमांनीं न्यासभेद करून सपल्लव विधिपूर्वक केला असतां फलसिद्धि होते (२८) स्त्रीशूद्रांनीं प्रणवरहित नमोंतस्थितिपर्यंत जप करावा आणि (२९) सांबशिव किंवा सदाशिव किंवा तांडवाकारमूर्ति यांचें ध्यान करीत जप करावा.

## पंचाक्षरीविनियोग.

(१) या अनुक्रमानें पुरश्चरण केल्यावर मंत्रजपविधान सांग होतें (२) त्याक- रितां बिल्ववृक्षाचा आश्रय करून एकच दिवस अविच्छेद, नैरंतर्य, तादात्म्य व तन्मयत्वानें जप केला असतां (३) सर्व मंत्रास पुरश्चरण मुख्य आहे असें ईश्वरगीता वगैरे ग्रंथांमध्यें सांगितलें आहे ह्मणून पंचाक्षरीमंत्र पुरश्चरणास सिद्ध आहे. (४) अथवा

क ॥ जप केलिया आयुर्वृद्धिदायक ॥ महानदीतीरीं दोन लक्ष ॥ जप केलिया आयुर्वृद्धि ॥ ४ ॥ वटमूलीं दशसहस्र जप करून ॥ दूर्वा तिळ गुळवेलिकर्दम ॥ करूनि दशसहस्र वटिका नेम ॥ प्रतिमंत्रासि केलिया होम॥ आयुर्वृद्धि ॥५॥ अश्वत्थवृक्ष ॥ तयातळीं द्विलक्ष ॥ जप केलिया प्रत्यक्ष ॥ अपमृत्यु नसे ॥ ६ ॥ प्रतिशनिवारीं ॥ अश्वत्थवृक्ष धरूनि दोन्हीं करीं ॥ अष्टोत्तरशत जप केलिया साचारी ॥ अपमृत्यु नासे ॥७॥ आदित्याभिमुख होऊनि एक ॥ लक्षजप केलियावरि अर्क ॥ पुष्पें अष्टोत्तरशत होम केलिया अशोख ॥ सकलव्याधि नासे ॥८॥ प्रतिदिनीं एक मासपर्यंत ॥ उदयसमयीं अष्टोत्तरशत ॥ जप केलिया उदकमंत्रूनि घेऊनि समस्त ॥ कुक्षिव्याधि नासे ॥९॥ पालाशकुसुम ॥ तयानें दशसहस्र नेम ॥ जप युक्त केलिया होम॥सर्वव्याधि नासे॥१०॥ नदीतोयें करूनि॥ पूर्णकुंभ भरोनि ॥ हस्तकें करूनि ॥ दशसहस्र ॥११॥ केलिया जपविधान ॥ वरि तयाजळें करून ॥ केलिया स्नान ॥ सर्व व्याधि नासे ॥१२॥ चंद्रसूर्यग्रहणीं ॥नदी समुद्रगामिनी ॥ तयेआंत उपवास शुचि होऊनि ॥ बैसोनिया ॥१३॥ ग्रहणादिग्रहणांतपर्यंत ॥ अष्टि-

---

पुरश्चरणसिद्ध पंचाक्षरीमंत्राचा जप पर्वताग्रावर एक लक्ष केला असतां आयुष्याची वृद्धि होते. महानदीतीरीं दोन लाख जप केला असतां आयुष्याची वृद्धि होते. (५) वटमूलाचे ठिकाणीं दहा हजार मंत्र जप करून दूर्वा, तीळ, गुळवेल यांनीं होम केला असतां आयुष्याची वृद्धि होते. (६) अश्वत्थवृक्षाच्या मुळीं वसून दोन लाख जप केला असतां अपमृत्यु येत नाहीं. (७) प्रति शनिवारीं अश्वत्थवृक्षाचा दोन्ही हातांनीं आश्रय करून अष्टोत्तरशत जप केला असतां अपमृत्यु दूर होतो. (८) आदित्याभिमुख होऊन एक लाख जप करून अर्कपुष्पांचा अष्टोत्तरशत (१०८) होम केला असतां सर्व व्याधि नष्ट होतात. (९) एक महिन्यापर्यंत प्रतिदिवशीं सूर्योदयाचे वेळेस उदक अभिमंत्रण करून अष्टोत्तरशत जप केला असतां उदररोग नष्ट होतो. (१०) पलाशकुसुमांनीं दहा हजार होम केले असतां सर्व रोग नष्ट होतात. (११) नदीच्या पाण्यानें भरलेली घागर हातानें धरून १०००० दशसहस्र (१२) जप करून त्या पाण्यानें स्नान केलें असतां सर्व रोग नष्ट होतात. (१३) चंद्रसूर्यग्रहणाच्या वेळेस समुद्रगामिनी नदीमध्यें उपवासपूर्वक शुचिर्भूतपणें बसून (१४) ग्रहणादिग्रहणांतापर्यंत मंत्राच्या अष्टोत्तरशत-

रस अष्टोत्तरशत ॥ वेळां जपोनि सेविलिया इह लोकांत ॥ सर्वश्रुतिपा-
रंगत होय ॥१४॥ प्रातःकाळीं स्नान करूनि ॥ नित्यक्रिया संपन्न हो-
ऊनि ॥ पालाशपत्रीं विभूति भरूनि ॥ नातरी घृत ॥१५॥ अथवा पंचग-
व्य भरूनि ॥ करकमळें धरूनि ॥ अष्टोत्तरसहस्र जप केलिया जनीं ॥
सर्वविद्या पारंगत होय॥१६॥बिल्वछाया आश्रूनि दशसहस्र ॥ जप क-
रूनि वरि तेबिल्वफळपत्र ॥ कुसुमेंकेलिया होम अष्टोत्तरसहस्र॥सकळ
ऐश्वर्यसमृद्धि होय ॥१७॥ छिद्ररहितपालाशकुसुम॥तयानें दशसहस्र
होम ॥ केलियासर्वलक्षणसंपन्नोत्तम ॥ पुत्रहोय ॥ १८ ॥ तया पालाश-
कुसुमें एक ॥ सहस्रअष्टोत्तरक ॥ होमकेलियानक्षत्रग्रहादिक ॥ पीडा-
निवारे ॥१९॥ स्नान करूनि दशसहस्र ॥जप संपादून अष्टोत्तरशतमन्त्र
॥ घृतानें होमकेलिया साचार ॥ दुःस्वप्नशांति होय ॥२०॥ चंद्रसूर्यग्रह-
णीं॥शिवलिंगपूजा विध्युक्त करून ॥ दशसहस्रजप लिंगसंनिधानें॥के-
ल्या सर्व कामार्थ सिद्धि लाभे ॥२१॥ एकादश वेळां प्रतिदिनीं ॥ अ-
न्न प्रथम मंत्रूनि ॥ सेवविल्या परजारण करणी ॥ सकळ निवारे॥२२॥
तया मन्त्रें अष्टोत्तरशत ॥ जप केलिया नित्य ॥ कर्मलोप निषेध अनु-

---

जपानें ब्राह्मीरस अभिमंत्रित करून त्याचें सेवन केलें असतां सर्व वेदांचा अर्थ निःसंशयपणें कळतो. (१५) प्रातःकाळीं स्नान करून नित्यक्रिया संपवून पळ-साच्या पानांत विभूति किंवा घृत (१६) अथवा पंचगव्य भरून तें हातांत घेऊन आठ हजार जप केला असतां सर्व विद्या अवगत होतात. (१७) बिल्वच्छायेचे ठिकाणीं बसून दशसहस्र जप करून बिल्वफल, बिल्वपत्र, बिल्वपुष्प यांनीं एक हजार आठ १००८ होम केले असतां ऐश्वर्य प्राप्त होतें. (१८) आणि छिद्र-रहित पलाशकुसुमांनीं दहा हजार होम केले असतां सर्व लक्षणसंपन्न पुत्र उत्पन्न होतो. (१९) किंवा पलाशकुसुमांनीं एक हजार आठ होम केले असतां नक्षत्र-ग्रहपीडा दूर होते. (२०) स्नान करून दशसहस्र १०००० जप करून एकशे आठ होम तुपानें केले असतां दुःस्वप्नशांति होते. (२१) चंद्रसूर्यग्रहणाचे वेळेस विधिपूर्वक शिवलिंगपूजा करून शिवलिंगासन्निध दहा हजार जप केले असतां सर्व मनोरथ पूर्ण होतात. (२२) आणि प्रतिदिवशीं अकरा वेळा मंत्रानें अन्न अ-भिमंत्रित करून सेवन केलें तर दुसऱ्यानें आपल्यावर केलेल्या करणीचा ताबड-तोब नाश होतो. (२३) त्या मंत्राचे जप १०८ केले तर नित्य कर्मलोपाचें पा-तक व निषिद्ध अन्नस्वीकार केल्याचें पातक नष्ट होतें शिवाय अन्नदोष दूर होतो

वित ॥ अन्नस्वीकार दोष निवारे ॥२३॥ दशसहस्राधिके ॥ लक्षजप विशेषें ॥ महा पातकें ॥ नाश पावती ॥२४॥ पंचावन सहस्र मिति ॥ जप केलिया समस्ति ॥ पातकें परिहरति ॥ निश्चयानें ॥२५॥ सप्तविंशति सहस्र पंचशत ॥ जप केलिया समस्त ॥ उपपातकें अमित ॥ परिहरति ॥२६॥ पंच सहस्र जप केलिया साचार ॥ अति पातकां संहार ॥ होय अत्यंत ॥२७॥ तत्वासि एक एक लक्ष जप ॥ संख्येनें पंचविंशति लक्षजप ॥ केलिया भूम्यादि पंचविंशति तत्वरूप ॥ पार उतरे ॥२८॥ पंच शतलक्ष ॥ जपानें अखिलकारक ॥ अनादि ईश्वरत्व मुख्य ॥ प्राप्त होय ॥२९॥ शतलक्ष जपें प्राप्त रुद्रत्व ॥ सोळा लक्ष जपें उमात्व ॥ नऊ लक्ष जपें प्राप्त विष्णुत्व ॥ साठि लक्ष जपें ब्रह्मत्व-प्राप्ति होय ॥३०॥ चतुर्विंशति लक्ष मिती ॥ जपानें विराटत्व होय प्राप्ति ॥ त्रिलक्ष जपे अंतिं ॥ दीर्घायु होय ॥३१॥ लक्ष जपे सादि ॥ षट्कर्म मारणादि ॥ प्राप्त होय सिद्धि ॥ ह्मणोनि जाणावें ॥३२॥ आणिक तो पंचाक्षरी मंत्र ॥ वायुजित होऊनि भर ॥ माध्यान्हरात्रीं जप दशसहस्र ॥ केल्यानें नादसिद्धि होय ॥३३॥ त्या दशसहस्र ॥ संख्याजपें साचार ॥ प्राप्त होय अपार ॥ ब्रह्मसिद्धि ॥३४॥ आलस्य रहित ॥ होऊनि वायुजित ॥ मौनानें मध्यरात्रीं अश्रुत ॥ लक्ष जप ॥३५॥

---

(२४) एक लक्ष दहा हजार जप केले तर त्यापासून मोठमोठीं पातकें देखील जळून जातात. (२५) पंचावन हजार जप केले तर निश्चयानें सर्व पातकें जळून जातात. (२६) सत्तावीस हजार पांचशे जप केले तर उपपातकें नष्ट होतात.(२७) पांच हजार जप केले असतां अति पातकांचा संहार होतो. (२८) पंचवीस लाख जप केले तर पंचवीस तत्त्वांच्या पलीकडे जातो. (२९) पांचशे लाख जप केले तर साक्षात ईश्वरत्व प्राप्त होतें. (३०) शंभर लक्ष जप केले तर रुद्रत्व प्राप्त होतें. सोळा लक्ष जप केले असतां उमात्व प्राप्त होतें. नऊ लाख जप केले तर विष्णुत्व प्राप्त होतें. साठ लक्ष जप केले असतां ब्रह्मत्व प्राप्त होतें.(३१) चोवीस लक्ष जप केले असतां विराटत्व प्राप्त होतें. तीन लक्ष जप केले असतां दीर्घायु होतो.(३२) लक्ष जप केले असतां मारणादि षट्कर्में सिद्ध होतात. (३३) प्राणायाम करून मध्यरात्रीं पंचाक्षरीमंत्राचे दहा हजार जप केले असतां नादसिद्धि होते. (३४) याच संख्येच्या क्रमानें दशसहस्र जप केले असतां ब्रह्मत्वसिद्धि मिळते. (३५) आळस सोडून वायु ताब्यांत ठेवून मौनपणें मध्यरात्रीं लक्ष जप (३६) केले असतां सर्वा-

केलिया सकळकारक ॥ सर्वाधारक ॥ निवृत्ति आत्मक ॥ विंदुदर्शनें होय ॥३६॥ मध्यरात्रीं वायुजित ॥ होऊनि लक्ष जप समाप्त ॥ केलिया समस्त ॥ सर्वसिद्धि प्राप्त होय ॥३७॥ त्याकारणें इत्यादि ॥ विधान मंत्रसिद्धि ॥ संपादनें सकळसिद्धि ॥ होय ह्मणोनि जाणावें ॥३८॥

## जपकाल.

यानंतरें सर्व मंत्र पंचाक्षर्यादि ॥ पुरश्चरण प्रारंभीं आधिं ॥ शुभमासादि विधी ॥ परिक्रमें विचारावें ॥१॥ त्याचे ठायीं चैत्रमासीं दुःखाक्रांत ॥ वैशाखीं रत्नलाभ जेष्ठां मृत्यु ॥ आषाढमासीं नाशसिद्धांत ॥ बंधुजनासि ॥२॥ श्रावणमासीं पूर्ण आयुष्य ॥ भाद्रपदीं प्रजानाश ॥ अश्विनमासीं शुभसंतोष ॥ कार्तिकीं सर्वसिद्धि ॥३॥ मार्गशीर्ष मंगळवृद्धि ॥ पुष्पीं हानि माघीं बुद्धि वृद्धि ॥ फाल्गुनीं सर्वसिद्धि ॥ ह्मणोनि ते मास जाणावे ॥ अधिक क्षयमास विफळ जाणावें ॥४॥ आणिक मेषादिमीनांत ॥ द्वादश राशि समस्त ॥ तयामध्यें शुभकृत ॥ जाणावें येथें ॥५॥ मेष मिथुन ॥ सिंह तूल धन ॥ कुंभ ह्मणोन ॥ इति षड्राशि अशुभ ॥६॥ उरल्या षड्राशि ॥ शुभदायक

---

धकारनिवर्तक बिंदूचें दर्शन होतें. (३७)मध्यरात्रीं उठून वायु ताब्यांत ठेऊन लक्ष जप केले असतां सर्वसिद्धि प्राप्त होतात. (३८) त्या कारणानें विधानपूर्वक मंत्रसिद्ध करून घेऊन सर्व सिद्धि प्राप्त करून घ्याव्या.

## जपकाल.

(१) त्यानंतर पंचाक्षर्यादि सकल मंत्र पुरश्चरण करावयाचे आधीं शुभ मासादिकांचा विचार अनुक्रमानें करावा. (२) त्यांत चैत्रांत आरंभ केला असतां दुःखप्राप्ति होते. वैशाखांत आरंभ केला असतां रत्न लाभ होतो. ज्येष्ठांत मृत्यु प्राप्त होतो. आषाढांत बंधु नाश होतो. (३) श्रावणांत पूर्ण आयुष्य मिळतें. भाद्रपदांत प्रजानाश होतो. अश्विनांत शुभप्राप्ति होते. कार्तिकांत सर्व सिद्धि प्राप्त होतात. (४) मार्गशीर्षांत मंगलप्राप्ति होते. पौषमासांत हानि होते. माघांत बुद्धिवृद्धि होते. फाल्गुनांत सर्व सिद्धि प्राप्त होतात. अधिक क्षय निष्फल जाणावें. याप्रमाणें मासांचा अनुक्रम जाणावा. (५) आतां मेषादिमीनान्त राशींमध्यें शुभाशुभ विचार सांगतात. (६) मेष, मिथुन, सिंह, तूल, धन, कुंभ अशा सहा राशी अशुभ जाणाव्या. (७) बाकीच्या सहा राशी शुभदायक आहेत असें जाणून त्यांचा स्वीकार क-

विशेषीं ॥ ह्मणोनि निश्चियेसि ॥ अंगिकाराव्या ॥७॥ आणिक पाडवा चतुर्थी ॥ षष्ठी अष्टमी नवमी चतुर्दशी तिथी ॥ पूर्णिमा अमावास्यादि इति ॥ अष्ट अशुभ ॥८॥ उरलिया समस्त ॥ तिथी शुभा अत्यंत ॥ ह्मणोनिया कार्यार्थ ॥ अवलंबाव्या ॥९॥ आणिक आदित्यवार ।। मंगळवार ॥ शनिवार ॥ त्रय अशुभ ॥१०॥ उरले वार ॥ चतुर्थ शुभकर॥ ह्मणोनि अंगीकार ॥ करावा तयांचा ॥११॥ अश्विन्यादि समस्त ॥ सप्तविंशति ॥ नक्षत्रांतु अति ॥ उत्तमकारक ॥१२॥ मघामृगशिरहस्तस्वाति ॥ मूळ अनुराधा रोहिणी रेवती ॥ उत्तरा उत्तराषाढा उत्तराभाद्रपदादि इति ॥ एकादश शुभनक्षत्रें ॥१३॥ उरलीं नक्षत्रें ॥ सकळ अशुभकर ॥ ह्मणोनि अनादरें ॥ उपेक्षावीं ॥१४॥ आणिक विष्कंभादि समस्त ॥ योग सप्तविंशति ॥ तयांत अति ॥ शुभकर ॥१५॥ विष्कंभशूळ गंड अतिगंड व्याघात ॥ वज्रधृतिध्रुववैधृतिव्यतिपात ॥ परिघ ह्मणिजे अनुचित ॥ एकादश योग ॥१६॥ उरले षोडशयोग ॥ शुभ ह्मणोनि तें योग्य ॥ तयाकारणें तत्संग ॥ अंगीकारावा ॥१७॥ आणिक शकुनि आदिभद्रांत ॥ एकादश करण समस्त ॥ तयांत अनुचित ॥ अशुभकर ॥१८॥ शकुनि चतुष्पाद ह्मणोन ॥ नाग-

---

रावा. (८) आतां प्रतिपदा, चतुर्थी, षष्ठी, अष्टमी, नवमी, चतुर्दशी, पौर्णिमा, अमावास्या, या आठ तिथी अशुभ होत. (९) बाकीच्या सर्व तिथी शुभ आहेत असें जाणून या तिथीवर जपकर्मारंभ करावा. (१०) आणि आदित्यवार, मंगळवार, शनिवार, हे तीन वार अशुभ आहेत. (११) बाकीचे चार वार शुभ आहेत असें जाणून त्यांचा अंगिकार करावा. (१२) अश्विन्यादि सत्तावीस नक्षत्रांमध्यें उत्तम नक्षत्रें सांगतात. (१३) मघा, मृगशिरा, हस्त, स्वाती, मूल, अनुराधा, रोहिणी, रेवती, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपद, हीं अकरा नक्षत्रें शुभ होत. (१४) बाकीचीं सर्व नक्षत्रें अशुभ आहेत असें जाणून त्यांचा अनादर करावा. (१५) आतां विष्कंभादि सत्तावीस योगांमध्यें शुभयोग सांगतात. (१६) विष्कंभ, शूल, गंड, अतिगंड, वज्र, धृति, ध्रुव, वैधृति, व्यतीपात, परिघ, हे योग अशुभ होत. (१७) बाकीचे सोळा योग शुभ आहेत असें जाणून त्यांचा अंगीकार करावा. (१८) आतां शकुन्यादि भद्रान्त अकरा करणांमध्यें अशुभ करण सांगतात. (१९) शकुनी, चतुष्पात्, नागव, किंस्तुघ्न, वणिज, भद्रा, हीं सहा करणें अशुभ होत.

किंस्तुघ्न ॥ वाणिज्य भद्रा ह्मणिजे षट्करण ॥ अशुभकर ॥१९॥ उरलें पंचकरण ॥ शुभकर ह्मणोन ॥ यथा परीक्षून ॥ अंगीकारावें ॥२०॥ आणिक शुभतिथीनें श्रीविजय ॥ शुभ नक्षत्रें क्षय ॥ पापराशी ॥२१॥ शुभयोगें रोगनिवृत्ति ॥ शुभकरणें कार्यसिद्धि प्राप्ति ॥ होय तयाकारणे इति ॥ मंत्रजप ॥२२॥ प्रारंभाचे ठायीं विचारें ॥ सर्व जाणोनि निर्धारें ॥ मग सर्वथा आदरें ॥ अंगीकारावें ॥२३॥

## जपमालिकालक्षण.

आणिक त्या मंत्रजपासि कारण ॥ प्रथम करावें मालिकासंपादन ॥ उत्तरोत्तर गुण ॥ विशिष्ट तया मालिका ॥ १ ॥ मणिमालिकाफल ॥ स्वहस्ताचे ठायीं मध्य अंगुलिया ॥ अनामिकाद्वया मध्यमाद्वया ॥ रेखाचे ठायीं मेरू उरलिया ॥ मध्यांगुली ॥ २ ॥ अग्ररेखा धरूनि दक्षिणकरें ॥ दशरेखा अंगुष्ठाग्रें ॥ स्पर्शस्पर्शोनि करणें ॥ मंत्रोच्चार ॥ ३ ॥ यासि रेखाजप ॥ अंगुलीजप ॥ ह्मणावा तो अपाप ॥ नित्यकर्मासि उत्तम ॥४॥ शंखमणिमालिकेनें आयुरारोग्यैश्वर्याधिक्यास ॥ स्फटिकमणिमालिकेनें लक्ष्मीप्राप्ति वैभव प्रज्ञास ॥ पद्माक्षमणिमालिकेनें पुष्टि लक्ष्म्यादिकास ॥ पुत्रजीविमणिमालिकेनें मोक्षपुत्रादि ॥ ५ ॥ पशुधा-

---

(२०) बाकीचीं पांच करणें शुभ आहेत असें जाणून त्यांचा अंगीकार करावा. (२१) शुभतिथीनें शुभवारानें आयुष्याची वृद्धि होते आणि शुभनक्षत्रांनीं पापांचा क्षय होतो. (२२) शुभयोगानें रोगनिवृत्ति होत असून शुभकरणानें कार्यसिद्धि होते असें जाणावें. (२३) मंत्रजप प्रारंभाचे वेळेस बुद्धिमान् मनुष्यानें या सर्वांचा विचार चांगल्या रीतीनें करून त्यांचा अंगीकार करावा.

## जपमालिकालक्षण.

(१) आणि मंत्रजप करावयाच्या अगोदर जपाला कारण अशी माळ संपादन करावी. त्यामध्यें उत्तमगुणविशिष्ट माळ संपादन करावी. (२) आणि त्यांत अंगुलींनीं जप करतांना मध्यअंगुलीची किंवा अनामिका अंगुलीची रेखा मेरु करून (३) अंगुष्ठाग्रानें इतर सर्व रेखांचा स्पर्श करून मंत्रोच्चारपूर्वक जप करावा. (४) यांला रेखाजप किंवा अंगुलिजप असें ह्मणतात. नित्यकर्मास (५) शंखमणिमालिका घ्यावी त्यायोगानें स्फटिकमणिमालिकेनें आयुरारोग्यैश्वर्य मिळतात. पद्माक्षमणिमालिकेनें लक्ष्मीप्राप्ति वैभव प्रज्ञा मिळतात व पुत्रजीवीमणिमालिकेनें मोक्ष, पुत्र वगैरे, (६) प्रवाळमणिमालिकेनें पुत्र शुभ धान्य यांची वृद्धि होते. मुक्तामणिमालिकेनें

त्यादिक अभिवृद्धीस ॥ प्रवाळमणिमालिका धनधान्य सौभाग्यपापमुक्तीस ॥ मुक्तामणिमालिकेनें विद्याभिवृद्धीस ॥ माणिक्यमणिमालिका लोकवश्यस्त्रीवश्यादिकास ॥ ६ ॥ मरकत मणिमालिका शत्रुजयादिकास ॥ कुशग्रंथिमालिका सकलपापक्षयविद्यावृद्धीस ॥ सुवर्णरजतादिकमणिमालिका स्त्रीवश्यादिकास ॥ मातृकाक्षरमालिका वाक्सिद्धीस ॥७॥ रसमणिमालिका ॥ बिल्वकाष्ठमणिमालिका ॥ सकलकार्यसिद्धीदायका ॥ रुद्राक्षमणिमाला ॥८॥ तें भोगमोक्षफल ॥ दायक ह्मणोन केवल॥ काम्यफलदायक ह्मणोनि सकल ॥ विश्वासावें ॥९॥ कुष्ठपरिहारास भस्मगोलक मालिका ॥ अष्टभूतिसिद्धीस ॥ अष्टांगयोग सर्व मंत्रसिद्धीस ॥ सकलकार्यसिद्धि ज्ञानसिद्धीस ॥ १० ॥ सकामनिष्कामजपास ॥ सर्वकाळीं रुद्राक्षमाळेस ॥ सुकर सुरक्षित ऐसे ॥ आणिक शंभुप्रसादकर ॥११॥ क्षिप्रसिद्धिकर ॥ सर्वोत्तम साचार ॥ जाणोनि रुद्राक्ष मालांगीकार ॥ करोनि सकल देवर्षि ॥१२॥ आणिक ब्रह्मर्षि मनुजर्षि ॥ सिध्द योगीश्वर ॥ प्रमथगणादिक ॥ सर्वदा धारण करिती ॥१३॥ आणिक ते रुद्राक्षमालिका॥मेरूरहित एकादशसंख्या ॥ मणिमालिकेनें एका ॥ दशरुद्रप्रीति ॥१४॥ पंचदशमणिमालिकामिति॥

---

धन धान्य सौभाग्य पापमोचन हीं फलें मिळतात. माणिकमणिमालिकेनें विद्येची वृद्धि होते. लोकवश्य स्त्रीवश्य फलें मिळतात. (७) मरकतमणिमालिकेनें शत्रुजय मिळतो.कुशग्रंथिमालिकेनें सुवर्णरजत वगैरे मणिमालिकांनीं पापक्षय होतो, विद्यावृद्धि वगैरे मिळतात.मातृकाक्षरमालिकेनें स्त्रिया वश होतात. रसमणिमालिकेनें वाक्सिद्धि वगैरे होतात.(८)बिल्वकाष्ठमणिमालिकेनें सकल कार्यसिद्धि होते.(९)रुद्राक्षमणिमाला भोगमोक्षदायक व काम्यफलदायक आहे. (१०) भस्मगोलकमालिकेनें कुष्ठपरिहार होतो. रुद्राक्षमालिकेनें अष्ट भूति सिद्ध होतात, अष्टांगयोगसिद्धि होते, सर्व मंत्रसिद्धि होते, सर्व कार्यें सिद्ध होतात. ज्ञानमोक्ष मिळतात. याप्रमाणें काम्यसिद्धि प्राप्त होतात असें समजावें.(११)रुद्राक्षमणिमाला ही सकाम आणि निष्काम या दोनी जपाचे वेळेस उपयोगीं पडते. या मालेनें जप केल्यास सुरक्षितपणा राहून सुख मिळतें व शंभुप्रसाद मिळून (१२) लवकर सिद्धि मिळते. अशा रीतीनें ही माळ सर्वोत्कृष्ट असल्यामुळें देवर्षि,(१३) ब्रह्मर्षि, राजर्षि, सिद्ध, योगी, प्रमथगण या सर्वांनीं प्रेमपूर्वक तिचा अंगीकार गुप्तपणें सर्वदा केला आहे. (१४) मेरुरहित अकरा रुद्राक्षांची माळ करून तिनें जप केला असतां एकादश रुद्रांची प्रीति होते. (१५) पंधराम-

अभिचार क्रियाप्राप्ति ॥ रुद्राक्ष पंचविंशति ॥ मणिमालिकेनें पंचविंशति तत्वलाभ होय ॥१५॥ षड्विंशतिमणिमाळ ॥ तयेनें धनधान्य केवळ ॥ सप्तविंशति मणि नक्षत्रमालिकेनें सकल ॥ अर्थसिद्धि ॥१६॥ अष्टविंशति ॥ मणिमालिकेनें पुष्टि अति ॥ तीस मणिमालिकेनें प्राप्ति॥ अर्थलाभ ॥१७॥ बत्तीस मणिमालिकामिति ॥ तयेनें जयलक्ष्मीप्राप्ति॥ पन्नास मणिमालिकेनें अंतीं ॥ काम्यकर्मप्रवृद्धि ॥१८॥ चौपन्नमणिमालिकेनें सर्वार्थसिद्धि ॥ शतमणिमालिकेनें कार्यप्रसिद्धि ॥ शतपंचोत्तरमणिमालिकेनें त्रिसिद्धि ॥ भोगमोक्ष ॥१९॥ शतअष्टोत्तरमिति॥ मणिमालिकेनें भुक्तिमुक्ति ॥ ह्मणोनि परम प्रीति ॥ विश्वासावी॥२०॥ मेरुसहित रुद्राक्षमाला ॥ सकामनिष्काम जपाला ॥ योग्य असें बोला ॥ तेणेंकरून ॥२१॥ सोळामणि बत्तीस अठ्ठेचाळीस चौसष्ट अष्टोत्तरशत एकशेंअठ्ठावीस ॥ याप्रमाणें मणि घेऊन ॥ त्यांची माला रचून ॥ तिजला मेरु शिखामणि ठेवून ॥ जप करावा सूज्ञें ॥२२॥

## अक्षमाला फलतारतम्य.

तें अक्षमालाजपविधान ॥ अंगुलिजप एकगुण ॥ फल देई असें मान ॥ शास्त्रविधि यापरि ॥१॥ रेखाजपें अष्टगुणफल ॥ रौप्यमणि-

---

णिमालिकेनें अभिचार क्रियासिद्धि होतात. पंचवीस रुद्राक्षांच्या माळेनें पंचवीस तत्वांची सिद्धि होते. (१६) सव्वीस मणिमालिकेनें इष्टसिद्धि होते, सत्तावीस नक्षत्रमणिमालिकेनें सकल अर्थसिद्धि होते. (१७) अठ्ठावीस मणिमालिकेनें पुष्टि मिळते. तीस मणिमालिकेनें अर्थलाभ होतो. (१८) बत्तीस मणिमालिकेनें जयलक्ष्मी प्राप्त होते. पन्नास मणिमालिकेनें काम्यकर्में सिद्ध होतात. (१९) चौपन्न मणिमालिकेनें सर्व सिद्धि होते- शंभर मणिमालिकेनें कार्यसिद्धि होते. शतपंचोत्तरमणिमालिकेनें भोगमोक्ष मिळतात. (२०) एकशेआठ मणिमालिकेनें भुक्तिमुक्ति मिळतात. ह्मणून परम प्रेमपूर्वक आदर करावा. (२१) मेरुसहित रुद्राक्षमणिमालिका सकामनिष्काम जपास योग्य असल्यामुळें (२२) १६-३२-४८-६४-१०८-१२८ याप्रमाणें संख्येनें माळ करून त्या माळेस मेरुमणि बांधून जप करावा.

## अक्षमालाफलतारतम्य.

(१) या माळेमध्यें अंगुलीजपानें एकपट फल मिळतें. (२) रेखाजपानें आठपट फल मिळतें. रौप्यमयमणिमालिकेनें दशपट फल मिळतें. शंखमणिमालिकेनें

मालिकेनें दशगुणफल ॥ शंखमणिमालिकेनें शतगुणफल ॥ पोंवळ्यांनीं सहस्रगुणफल ॥२॥ सुवर्णमालिकेनें दशसहस्रफल ॥ मुक्तामालेनें लक्षफल ॥ कमलमालिकेनें दशलक्षफल ॥ स्फटिकांनीं कोटिगुण॥३॥ बिल्वकाष्ठमण्यानें दशकोटिफल॥ मातृकाक्षरांनीं शतकोटिफल ॥ मानसजपानें अर्बुदफल ॥ रुद्राक्षांनीं अमितफल असे ॥४॥

## मणिपरिमाण.

आणिक ते मालिकेस आमलक ॥ प्रमाण मणि तो उत्तम मुख्य ॥ बदरीफल प्रमाण ते विशेख ॥ तो मध्यम ॥१॥ चणक प्रमाण मणि ॥ तो अधम ह्मणोनि ॥ विचारें जाणोनि ॥ अंगीकारावे ॥२॥ अति स्थूल अति सूक्ष्म भिन्न वक्र ॥ लघु व्रण कंटक जीर्ण॥ धृतशेषधारण ॥ इति सांकर्यादि दोषरहित ॥३॥ दृढ वृत्त सुवर्ण ॥ गौरव पाटव दृष्टि प्रीत्यादिकरून ॥ परि शुद्ध नवीन मणि सुलक्षण ॥ मालिकेसि ॥४॥ सुवर्ण रजत तापादिक ॥ शिसें लोह इति पंचक ॥ वर्णसूत्रें ओवूनि विशेख ॥ जपमालिका करावी ॥५॥ नातरि पट सूतें ॥ अथवा कार्पा-

---

शतपट मिळतें. प्रवाळमणिमालिकेनें सहस्रपट फल मिळतें. (३) सुवर्णानें दशसहस्रपट फल मिळतें. मुक्तामणीनें लक्षपट फल मिळतें. कमलमणीनें दशलक्ष फल मिळतें. स्फटिकमणीनें कोटिपट फल मिळतें. (४) बिल्वकाष्ठमणिमालिकेनें दशकोटि फल मिळतें, मातृकाक्षरमालेनें शतकोटि फल मिळतें. मानसजपानें अर्बुदफल मिळतें. रुद्राक्षमणीनें अमितफल मिळतें.

## मणिपरिमाण.

(१) नंतर रुद्राक्षमालेंतील मणि आवळ्याएवढा असावा अशा माळेला उत्तम माळ ह्मणतात. बोराएवढें मणि असतील तर ती माळ मध्यम होय. (२) चणक (हरभऱ्या) एवढें मणि असतील तर ती माळ कनिष्ठ होय. याप्रमाणें माळांचा विचार करून अंगिकार करावा. (३) मणि अति स्थूल असूं नये, अति सूक्ष्म असूं नये. शिथिल लघु भिन्न असूं नये, व्रणयुक्त असूं नये, कंटकयुक्त व वक्र असूं नये, धृतशेष असूं नये इत्यादि सांकर्यदोषानें रहित (४) असून दृढ, वर्तुलाकार, सतेज, गौर व पाटव, दर्शनाप्रिय शुद्ध व नवीन अशा मण्यांची माळ करावी. (५) मणि गोंवावयाचे झाल्यास सोनें, रुपें, शिसें, लोह, ताम्र यांपैकीं कोणत्यातरी धातूचा तंतु काढून किंवा पंचरसी तंतु काढून त्या तंतूंत मणि गोंवावेंत. (६) किंवा का-

ससूत्रें ॥ दोरा विधियुक्तें ॥ करूनियां ॥६॥ मृदु पवित्र सूक्ष्म ॥ सप्तविंशति पदर करूनि सम ॥ पुनः त्रिपदर करूनि ओंविजे ती उत्तम॥ मालिका ह्मणवी ॥७॥ एकविंशति तंतुसमान ॥ त्रिपदर करूनि मेळवून ॥ वरिमणि ओंवणें ॥ ती मध्यम मालिका ॥८॥ पंचदश तंतु समान करूनि ॥ त्रितय पदर मेळवूनि ॥ वरि ओंविजे मणि ॥ ती कनिष्ठ मालिका ॥९॥

## मालिकारचनादिमंत्र.

"ॐ सर्वप्रोताय ॥ शुभात्मकाय ॥ परमात्मने नमः" या मंत्रानें॥१॥ वळून सूत्र रचून ॥ मुळासीं पीळ घालून ॥ कोनप्रवेश करून ॥ त्या अग्रासी ॥ २ ॥ प्रणवशूलांनीं कीलित करून ॥ "ॐ हृदयाधिष्ठानाय प्राणलिंगाय नमः" या मंत्रानें गंधादिकांनीं संस्कारून ॥ "ॐ भूत्यात्मने अब्लिंगाय नमः" या मंत्रानें उदक अभिमंत्रून ॥ नंतर सद्योजातादि ॥३॥ अभिषेकमंत्रांनीं मणि प्रक्षालन ॥ वामदेवादि अलंकारमंत्रानें ॥ मणि सर्व पुसून ॥ अलंकारावे ॥४॥ अघोरादि मंत्रांनीं धूप देवून ॥ तत्पुरुषादि मंत्रांनीं मणि सर्व पुजून ॥ ईशानादि शांभवमंत्रांनीं अभिमंत्रण ॥ करावें सूज्ञें ॥५॥ मग प्रार्थना करून ॥ प्रत्येकीं शिवसां-

---

पांस तंतु किंवा वाकाचा दोर (७) सत्तावीस तंतूनें युक्त करून पुनः त्याचे समभाग तीन तंतु करून वळून त्यांत गोंवावें ती माळ उत्तम होय. (८) एकवीस तंतु करून वळून पुनः तिपदरी करून वळून माळ करावी. ती माळ मध्यम होय (९) पंधरा तंतु वळून पुनः तिपदरी करून वळून मणि गोंवावेत. ती माळ कनिष्ठ होय. सत्तावीस तंतूंपेक्षां कमी तंतूचा दोर अधम जाणावा.

## मालिकारचनादिमंत्र.

(१) नंतर "ॐ सर्वप्रोताय शुभात्मकाय परमात्मने नमः" या मंत्रानें (२) वळून सूत्र रचावें. मुळापासून अग्रापर्यंत चांगलें वळून तयार झाल्यानंतर अग्राला (३) प्रणवशूलादिकांनीं कीलित करावें. "ॐ हृदयाधिष्ठानाय प्राणलिंगाय नमः" या मंत्रानें त्या सूत्राला गंधादिकांनीं संस्कार करावा. नंतर "ॐ भव्यात्मने अब्लिंगायनमः या मंत्रानें अभिमंत्रण करावें. नंतर सद्योजातादि (४) अभिषेकमंत्रांनीं मणि स्वच्छ धुवावेत वामदेवादि मंत्रांनीं मणि स्वच्छ पुसून अलंकृत करावेत. अघोरादि मंत्रांनीं त्यांपुढें धूप घालून तत्पुरुषादि मंत्रांनीं मण्यांची पूजा करावी. नंतर ईशानादि शांभव मंत्रांनीं सूज्ञानें अभिमंत्रण करून (५-६) प्रार्थना

निध्य आणून ॥ " ॐ शिवचैतन्यरूपाय प्रणवज्योतिषे नमः " या मंत्रानें स्थूलमणि सूत्रमुळीं गोंवून ॥ सूक्ष्ममणि तारतम्यें ॥६॥ क्रमानें अग्रभागीं गोंवून ॥ सूत्राग्र गोपुच्छाकार करून ॥ मुखमुखासी संयोग करून ॥ माळ करावी जाणा ॥७॥ त्या नंतर मणिघर्षण ॥ न होईल ऐसें विरळ करून ॥ "ॐ ब्रह्मस्वरूपाय संहृताज्ञानाय नमः" या मंत्रानें दोन गांठी देऊन ॥ माळ करावी जाणा ॥८॥ नंतर मूलाग्र एक करून ॥ गणनाव्यतिरिक्त एक मणि घेऊन ॥ "ॐ शिखामध्यस्थितरूपाय नमः"-या मंत्रानें मेरुमणि गोंवून ॥ त्यावरि दोंन ग्रंथि द्याव्या ॥९॥ याप्रमाणें बांधून ॥ जपमालिका रचून ॥ नंतर श्रीगुरुहस्तें करून पंचगव्य पंचामृत ॥१०॥ 'ॐ' या मंत्रानें अभिषेक करवून ॥ 'ॐ' मंत्रानें जलस्नान घालवून ॥ नंतर गंधपुष्पादिकें करून ॥ प्रत्येक मणि स्पर्श करावा ॥११॥ ॐ मंत्रानें पूजा करवून ॥ नैवेद्य तांबुलादि समर्पण ॥ करोनि दंड नमस्कार प्रदक्षिणा ॥ घालाव्या जाण ॥१२॥ गुरूपदेशानुग्रहें करून ॥ जपमाला स्वीकारून ॥ जप करण्यापूर्वीं आपण ॥ ज-

---

करावी. नंतर प्रत्येक मण्यांत शिवसांनिध्य आणावें. नंतर " शिवचैतन्यरूपाय प्रणवज्योतिषे नमः " या मंत्रानें स्थूल स्थूल मणिसूत्राचे मूळांत गोंवावेत. (७) नंतर क्रमानें बारीक बारीक मणि अग्रभागांत गोंवावेत. सूत्राग्र गायीच्या शेपटीच्या आकाराप्रमाणें करून प्रत्येक मुखाचा संयोग होईल अशा रीतीनें माळ तयार करावी. (८) मण्याला मणि न लागेल अशा रीतीनें गोंवून " ॐ ब्रह्मस्वरूपाय संहृताज्ञानाय नमः " यामंत्रानें दोन वेढ्यांची गांठ देऊन माळ करावी. (९) नंतर मूळ व अग्र यांस चांगली गांठ द्यावी. नंतर संख्येंत नसलेला एक मणि घेऊन " ॐ शिखामध्यस्थितरूपाय नमः " या मंत्रानें तो मेरुमणि गोंवावा. त्यावर दोन वेढ्यांची चांगली गांठ द्यावी. (१०) असें झाल्यानंतर जपमाळ तयार झाली असें समजावें. नंतर श्रीगुरूच्या हस्तेंकरून त्या माळेला पंचगव्य पंचामृत यांनीं (११) " ॐ " या मंत्रानें अभिषेक घालवावा. नंतर " ॐ " याच मंत्रानें जलस्नान घालवावें. नंतर प्रत्येक मण्याला गंधपुष्पादिकांनीं स्पर्श करावा. (१२) ॐ मंत्रानें पूजा करून नैवेद्य तांबूल वगैरे समर्पण करावें. नंतर दंडनमस्कार प्रदक्षिणा घालाव्या. विधिपूर्वक दक्षिणा त्यांपुढें ठेवावी. (१३) नंतर गुरूपदेशपूर्वक गुर्वनुग्रहपूर्वक गुरूच्या हस्तें ती माळ स्वीकारावी. जप करण्यापूर्वीं

पमालेसी ॥१३॥ जलपुष्पादिकें करून ॥ शुक्तिमुद्रा दाखवून ॥ मंत्रसहित अर्घ्य देवून ॥ यथाविधि ॥१४॥ जपमाळेनें ॥ स्थूलादि सूक्ष्मांत करून ॥ ऐसें तें जपविधान ॥ उत्पत्ति ह्मणवी ॥१५॥ स्थूलसूक्ष्मादि स्थूलान्त करून ॥ ऐसें तें जपविधान ॥ यासि संहार ह्मणती जाण ॥ शास्त्रविधीनें ॥१६॥ परदृष्टिगोचर न करून ॥ शीघ्र मंद न करोन ॥ प्रत्येक मणीस एकेक वेळ मंत्रोच्चारण ॥ करूनी जप करावा ॥१७॥ त्तयेवेळीं प्रमादें करून ॥ होईल जरि माळापतन ॥ मंत्रहानि जाणोन पुनः जपारंभ करावा ॥१८॥ मेरुमणि उल्लंघन ॥ न करितां प्रदक्षिण क्रमानें ॥ घेऊन नमस्कार करोन ॥ जपारंभ करावा ॥१९॥ याप्रमाणें जपनियमविधान ॥ केलियावरि समाप्त करोन ॥ जपमालेसि अर्घ्य देऊन ॥ यथाविधि ॥२०॥ वामहस्तें न करावें। मालास्पर्शन ॥ न करितां कंठादिस्थानीं धारण ॥ जपसमयीं जप करोन ॥ शुद्धस्थळीं ठेवावी ॥२१॥

## जपादिकांचीं स्थानें.

आणिक गृह गोस्थान नदीतीर॥ समुद्रतटाक गिरी पुण्याश्रम क्षे-

---

जपमाळेला आपण स्वतः (१४) जल पुष्पादिकांनीं पूजा करून शुक्तिमुद्रा दाखवून मंत्रपूर्वक अर्घ्य द्यावें. (१५) नंतर स्थूलादिसूक्ष्मान्त संख्या मोजून जप करणें याला उत्पत्ति असें ह्मणतात. (१६) स्थूलसूक्ष्मादिस्थूलान्त जप करणें याला शास्त्रविधीनें संहार असें ह्मणतात. (१७) असा क्रम जाणून परक्याच्या दृष्टीस न पडेल अशा व्यवस्थेनें व विशेष जलद नव्हे व विशेष विलंबानें नव्हे अशा व्यवस्थेनें प्रत्येक मण्याला एक वेळ मंत्राचा उच्चार करून जप करावा. (१८) याप्रमाणें जप करतांना प्रमादानें माळ खालीं पडली तर मंत्राची हानि झाली असें समजून पुनः पहिल्यापासून जपास सुरवात करावी. (१९) मेरूचें उल्लंघन न करितां प्रदक्षिणक्रमानें नमस्कार करून जपारंभ करावा. (२०) नंतर पहिल्याप्रमाणें जप करीत नेमाला अनुसरून जपसमाप्ति झाल्यानंतर त्या माळेला यथाविधि अर्घ्य देऊन (२१) डाव्या हातानें माळेला स्पर्श न करितां व कंठादिकांचे ठिकाणीं न घालतां सर्वदा शुद्ध ठिकाणीं ती माळ ठेवावी.

## जपादिकांचीं स्थानें.

(१) घर, गोठा, नदीतीर, समुद्रकांठ, महापर्वत, पुण्याश्रम, क्षेत्र, देवालय,

त्र ॥ देवालयादि उत्तरोत्तर ॥ स्थान ह्मणोनि जाणावें ॥१॥ उदकसन्निधी दीपसंन्निधीं ॥ शिवलिंगसंन्निधीं ॥ सूर्यसंनिधीं ॥ ह्मणोनि मंत्र जप ॥२॥ विधानासि उत्तरोत्तर ॥ विशिष्टसंनिधीवर ॥ त्यालागीं अंगीकार ॥ करावा विश्वासें ॥३॥ आणिक पूर्वाभिमुखें वश्यादि ॥ अग्नि अभिमुखें व्याधि ॥ दक्षिणाभिमुखें सिध्दि ॥ अभिचारक्रिया ॥४॥ नैऋत्याभिमुखें द्वेषादिक ॥ पश्चिमाभिमुखें धनलाभ अनेक ॥ वायव्याभिमुखें अशेष ॥ आकर्षण ॥५॥ उत्तराभिमुखें दोषशांति सौख्य ॥ ईशान्यादिमुखें मोक्ष ॥ सिध्दि होय ह्मणोनि पूर्वक ॥ दिग्विचारिजे ॥६॥

## जपासनफल.

आणिक वंशासनें दारिद्र्य ॥ पाषाणासनें व्याधिभार ॥ भूम्यासनें मंत्र ॥ हानि दुःखादिक ॥१॥ दूर्वासनें दौर्भाग्य व्याधि काष्ठासनें ॥ यशोहानि तृणासनें ॥ पल्लवासनें ॥ चित्तविभ्रम ॥२॥ कृष्णाजिनासनें ज्ञानाधिक्य ॥ व्याघ्रचर्मासनें लक्ष्मी मोक्ष ॥ कंबलासनें सौख्य ॥ व-

---

वगैरे मनोहर स्थानें उत्तरोत्तर अधिक पुण्य देणारीं आहेत असें जाणावें. (२) त्यामध्यें जलसांनिध्य, दीपसांनिध्य, सूर्यसांनिध्य शिवसांनिध्य वगैरे स्थानें जप (३) करावयास उत्तम असून उत्तरोत्तर विशेष फल देणारीं आहेत ह्मणून विश्वासानें अंगीकार करावा असें जाणावें. (४) पूर्वाभिमुख होऊन जप केला असतां वशीकरण सिद्धीस जातें. आग्नेयेस रोग उत्पन्न होतात. दक्षिणेस व्यभिचारक्रिया सिद्ध होतात. (५) नैऋत्यदिशेस अभिमुख होऊन जप केला तर लोक द्वेष करतात. पश्चिमेस धनलाभ होतो. वायव्य दिशेस अशेष आकर्षण सिद्ध होतें. (६) उत्तरेस दोषशांति होते. ईशान्येस मोक्षसिद्धि होते. याप्रमाणें दिशांचा विचार करून जप करावा.

## जपासनफल.

(१) वेळूच्या आसनावर बसून जप केला असतां दारिद्र्य येतें. दगडावर बसून जप केला असतां रोग उत्पन्न होतात. जमिनीवर बसून जप केला असतां दुःखें उत्पन्न होतात. (२) दूर्वासनावर दौर्भाग्य येतें, काष्ठासनावर बसून जप केला तर ऋण होतें. (नुसत्या पाटावर बसून जप केला तर ऋण होतें) तृणासनानें कीर्ति नष्ट होते. पल्लवासनानें चित्तविभ्रम होतो. (३) कृष्णाजिनासनानें ज्ञान वाढतें. व्याघ्रचर्मासनानें लक्ष्मी, मोक्ष मिळतो. कंबलासनानें दुःखमोचन होतें. वस्त्रासनानें व्या-

आसनें व्याधिनिवृत्ति वेत्रासनें संपदाभिवृद्धि ॥३॥ कृष्णवस्त्रासन॥ अभिचार क्रियेसि कारण ॥ रक्तवस्त्रासन ॥ शत्रुजयासि ॥ ४ ॥ धूम्रवस्त्रें शत्रुमरण ॥ सिंधूरवस्त्रें वश्य जाण ॥ पट्टवस्त्रें पुष्टि जाण ॥ पुष्पासनें देवतादि वशीकरण ॥५॥ धौतवस्त्रें मंत्रप्रसाद जाण ॥ चित्रासनें कार्यसिद्धि जाण ॥ लोहासनें क्षणिकफल जाण॥ वृक्षाग्रीं दीर्घकालफल ॥६॥ उदकमध्यीं सर्वदोषशांति जाण ॥ आणि देवतानुग्रह जाण॥ श्मशानीं भूतवश्य जाण ॥ वाळूवरि मनोव्यथा ॥७॥ मंचकीं मनाची उपरति जाण ॥ व्याघ्रचर्मासनीं सकल मंत्रसिद्धि जाण ॥ आणिक तंत्रयंत्रसिद्धि जाण ॥ ज्ञानसिद्धि शिवानुग्रह जाण ॥ मोक्षप्राप्तिधौरा ॥ ८ ॥ शुभ्रवस्त्रासनें शांत्यादिविधि ॥ चित्रकंबलासनें सर्वसिद्धि ॥ होय ह्मणूनि जपसंबंधि ॥ पीठ करावया योग्य ॥९॥

## आसनबंधभेद.

चौऱ्यांसि आसनें ॥ तयांत सिद्धासन पद्मासन ॥ स्वस्तिकासन वीरासन ॥ गोमुखासन ॥१॥ सुखासनादि करूनि ॥ इति आसनें जपकर्मालागूनि ॥ योग्यहोऊनि असतां तयें आसनीं ॥ स्थिर बैसावें ॥२॥ जपसिद्धीस षडासन ॥ योग्य ऐसें जाणोन ॥ अवशिष्ट कुक्कुटासन॥

---

धिनिवृत्ति होते. वेत्रासनानें संपत्तीची वाढ होते. (४) कृष्णकंबल, कृष्णवस्त्र वगैरे आसनांनीं अभिचारक्रिया सिद्ध होतात. रक्तवस्त्रानें शत्रुजयवश्यादि क्रिया सिद्ध होतात. (५) धूम्रवस्त्रानें शत्रु मरण पावतात. सिंधूरवस्त्रानें वशीकरण सिद्ध होतें. पट्टवस्त्रावर पुष्टि मिळते. पुष्पासनानें देवता वश होतात. (६) धौतवस्त्रानें मंत्रप्रसाद होतो. चित्रासनानें कार्यसिद्धि होते. लोहासनानें क्षणिक फल मिळतें. वृक्षाग्रावर दीर्घ कालानें फल मिळतें. (७) उदकांत बसून जप केला असतां सर्व दोषनाश व देवतानुग्रह होतो. स्मशानांत भुतें वश होतात, वाळूवर बसून जप केला असतां मानसिकव्यथा होते. (८) झोपाळ्यावर बसून जप केला असतां चित्त उपरत होतें. व्याघ्रचर्मासनानें सर्व मंत्रतंत्रांची व यंत्रांची सिद्धि होते, व ज्ञान मिळतें, शिवानुग्रह मोक्ष वगैरे मिळतात असें जाणावें. (९) शुभ्र वस्त्रासनानें शांतादिविधि व चित्रकंबलासनानें सर्व सिद्धि होतात.

## आसनबंधामधील भेद.

(१) चौऱ्याऐशीं आसनांमध्यें सिद्धासन, पद्मासन, स्वस्तिकासन, वीरासन, गोमुखासन (२–३) सुखासन हीं सहा आसनेंच जपसिद्धीला योग्य आहेत.

इत्यादि आसनें ॥३॥ अठ्यात्तर संख्या जाणोन ॥ त्या त्या योगासि उ-पयुक्त समजून ॥ मंत्रजपासि उचित नसोन ॥ त्याचे ठायीं ॥ ४ ॥ गुर्वासन देशिकासन ॥ शिवासन दक्षिणासन ॥ निजासन ध्यानासन॥ हीं पर्यायनामें ॥५॥ युक्त भूनिक्षिप्त समपादद्वयमात्र ऋज्वंगासन ॥ तयाचा अंगीकार करोन ॥ तत्तल्लक्षणें उपदेशसुलभ जाण ॥ यथाविधि ॥ ६ ॥

## जपाचेवेळीं रहावयाचा प्रकार.

आणिक वाहन मंचक॥ हिंडतां देहीं वस्त्रकंचुक ॥ दिगंबर मुक्त केशादिक ॥ अशौचउच्छिष्टमालिन्याद्यशुचित्व ॥ १ ॥ बहु भाष जांभई शिंक ॥ पैंग शयनादिक उभें राहणें अंगमोडणें वक्रबसणें अपानविसर्जन ॥ इतर विषयपरिग्रहण इतर कर्मसंक्रमण ॥ नीचप्राणिस्पर्शन दर्शन ॥२॥ क्रोध शोक व्याकुलता ॥ मूत्ररेतोत्सर्जन ॥ निष्ठीवनभक्षण ॥ जलप्राशन ॥३॥ तांबूलचर्वण ॥ गंधमाल्यादि स्वीकार ॥ इतर विषय स्वीकार ॥ लक्ष्यचलन साचार ॥४॥ मूर्च्छा मोहस्वप्नफा-

---

बाकी राहिलेलीं कुक्कुटासन (४) वगैरे अठ्याहत्तर आसनें त्या त्या योगाला उपयुक्त असलीं तरी मंत्रजपाला योग्य नाहींत. (५) त्यांमध्यें गुर्वासन, देशिकासन, शिवासन, दक्षिणासन, निजासन, ध्यानासन अशीं पर्याय नांवें असलेलें (६) भूनिक्षिप्त समपादद्वय मात्र ऋज्वंगासनच अंगीकार, करावयास योग्य आहे त्याचीं त्याचीं लक्षणें उपदेशानें समजावयास सुलभ आहेत असें जाणावें.

## जपाचेवेळीं रहावयाचा प्रकार.

(१) याप्रमाणें आसनावर स्थिरपणें वसावें. वाहनांवर बसणें, झोंपाळ्यावर बसणें, कवच वस्त्र वगैरे घालून वसणें, वस्त्ररहित होऊन दिगंबर होऊन राहणें, केश मोकळे सोडून राहणें, अशुचिपणें राहणें (२) वाणीचा नियम सोडून भाषण करणें, जांभई देणें, शिंकणें, पेंगणें, निजणें, उठून उभें राहणें, अलक्षपणें राहणें, वांकडें वसणें, अंग मोडून घेणें, अपानविसर्जन करणें, इतर विषयपरिग्रहण, कर्मसंक्रमण, नीचप्राणिस्पर्शन, दर्शन (३) क्रोध, शोक, यांनीं व्याकुळ होणें, मूत्ररेताचें विसर्जन करणें, थुंकणें, भक्षण करणें, जलप्राशन करणें, (४) तांबूलचर्वण करणें, गंधमालेचा स्वीकार करणें, इतर विषय स्वीकार करणें, लक्ष्य नसणें, (५) मूर्छा मोह स्वप्न वगैरे पडणें, नीचस्थानस्पर्श करणें, निषिद्ध विषय-

र ॥ नीचस्थानस्पर्शन ॥ निषिद्ध विषयस्मरण ॥ क्रमभंगविस्मृति जा-
ण ॥५॥ इत्यादि होऊन विलक्षण ॥ निर्विकारत्वें मौन ॥ स्थिरवृत्तीनें
जितेंद्रिय होऊन ॥ समग्रीव शिरासि ॥६॥ जपोत्सव सुषुप्तिसि होऊन
विलक्षण ॥ मनोदृष्टि एकाग्रध्यान ॥ मुद्रासमन्वित होऊन ॥ स्थिर बै-
सावें ॥७॥ वरि भस्मोध्दूलन ॥ रुद्राक्षाभरण ॥ गुरुपादस्मरण ॥ पूर्व-
क होऊनि ॥८॥ गुरुवंदनाराधन करून ॥ ध्यानयोगादि क्रमानें ॥ स्व-
बहिर्भोगी देवतातादात्म्य पावोनि ॥ नैरंतर्यानुसंधान करावें॥९॥ स्व-
मात्र श्राव्यजपविधान ॥ स्पष्टमंत्रोच्चारण ॥ स्वरसहितकरून ॥ अर्थ-
युक्त ॥ १० ॥ निर्दुष्टउच्चारण ॥ मंत्रजपविधान ॥ विधिपूर्वक करोन ॥
फलकारी करावें ॥११॥

## प्राणायामयोग.

प्राणिशरीर स्थानीं ॥ अवस्था त्रय अवधारोनी ॥ क्रमें शिवजीव-
संबंध जाणोनि ॥ प्राणापान गति ॥१॥ निरंकुश असल्या कारणानें ॥
लोकयात्रार्थ चालन ॥ शारीरिक पापाचें कारण ॥ श्वासगति होय॥२॥
जाणोन प्राण अपानस्थानीं ॥ अपान प्राणस्थानीं ॥ प्राणापान हंसप्र-

---

स्मरण करणें, क्रम सोडणें, विस्मृतीनें राहणें, (६) इतर कर्मसांकर्य करणें इ-
त्यादि तेहतीस दोषांनीं रहित होऊन निर्विकारपणें राहून, स्थिरवृत्तीनें राहून
मौनपणा जितेंद्रियपणा यांनीं राहून, गळा शरीर सरळ ठेवून (७) जपोत्सव सुषु-
प्ती घालवून मनोदृष्टि एकाग्र ठेवून ध्यानमुद्रायुक्त होऊन स्थिर वसून (८) भस्म
रुद्राक्षादि जपाभरणांनीं युक्त होऊन श्रीगुरुदेवता स्मरण करून (९) वंदन क-
रून आराधना करून ध्यानयोगादिकांनीं आपल्यामध्येंच बाहेर व आंत देवता-
तादात्म्य पावून नैरंतर्यानुसंधानपूर्वक (१०) केवळ आपणालाच ऐकूं येई असा
सुस्वर स्पष्ट उच्चार करून अर्थयुक्त (११) निर्दुष्ट मंत्राचा जप विधिपूर्वक करावा.
तो जप फलदायक होतो असें समजावें.

## प्राणायामयोग.

(१) प्राण्याच्या शरीरामध्यें तीनही अवस्थांत क्रमानें शिवजीवांचा संबंध अस-
लेले प्राणापानवायु निरंकुशपणें फिरत असतात. (२) ह्मणूनच ही लोकयात्रा
अबाधित चाललेली आहे यावरून शारीरिक पापाला श्वासगतिच मूलकारण आहे
असें स्पष्टपणें सिद्ध होतें. (३) हें जाणून प्राणवायूला अपानामध्यें अपानवायूला

णवाग्निस्थानीं ॥ होम करावे ॥३॥ येणेंप्रमाणें परिशुद्धीस ॥ प्राणाया-
मयोग ह्मणती त्यासि ॥ हें जाणोन प्राणायामासी ॥ आरंभ करावा
॥४॥ सूर्यचंद्रस्वरूप ॥ दक्षिण वामनासारंध्र अमुप ॥ निर्गमनागम-
युक्त वायुरूप ॥ ईडा पिंगळा गति ॥ ५ ॥ निर्बंध करोन ॥ दश प्रणव
एक मंत्रें करून ॥ आणिक त्रिबीजांनीं समानस्थिति करून ॥ दक्षिण-
नासापुटीं रेचावें ॥ ६ ॥ द्वादशप्रणवें करून ॥ आणिक एक मंत्र पंच
बीजें करून ॥ वाम नासापुटीं पूरण ॥ यथाविधि करावें ॥७॥ षोडश
प्रणवें करून ॥ आणिक एक मंत्र सप्त व्याहृतिमंत्रें करून ॥ गायित्री
तुरीय मंत्रबीज जाणोन ॥ भ्रूमध्यसुषुम्नास्थान ॥८॥ ऐशा ज्योतिर्मंड-
लस्थानीं ॥ यथाविधि कुंभक करोन ॥ येणेंप्रमाणें आरोहण क्रमें साध-
न ॥ केलियावरी ॥९॥ यथापूर्वक अवरोहण ॥ क्रमानें दिनक्रम साध-
न ॥ केलियावरि कुंभकीं देवतादर्शन ॥ लक्ष्यस्थ शिवार्चन ॥१०॥ क-
रावया उपयुक्त जाणोन ॥ करावें तत्साधन ॥ त्याचे ठायीं दक्षिणक-
रकनिष्ठिकांगुलि जाण ॥ आणिक अनामिका ॥ ११ ॥ आणिक अंगुष्ठ
धरोन ॥ येणें अंगुलित्रयानें ॥ वामदक्षिणनासापुटस्थान ॥ पीडन क-
रावें ॥१२॥ नंतर ब्रह्मविष्णुरुद्रदेवतात्मक ॥ अकार उकार मकारात्म-

---

प्राणवायूंत व प्राणापान या दोन्ही वायूंला हंसप्रणवाग्नींत ठेवून होम करावा. (४) याप्रमाणें होम करून शुद्ध होणें याला प्राणायाम असें ह्मणतात. (५) हें जाणून सूर्यचंद्रस्वररूप दक्षिण वाम नासारंध्रापासून जाणाऱ्या येणाऱ्या ईडा पिंगळा वायूंची गति (६) बंद करावी. दशप्रणव, एकमंत्र, त्रिबीज यांनीं समानस्थितीनें उजव्या नाकपुडींत रेचन करावें. (७) द्वादशप्रणवांनीं, एक मंत्रानें पंचबीजांनीं डाव्या नाकपुडींत यथाविधि पूरण करावें. (८) नंतर षोडश प्रणवांनीं, एक मंत्रानें, सप्त व्याहृतींनीं गायत्री तुरीय मंत्रबीजांनीं भ्रूमध्य सुषुम्नास्थान (९) ज्योतिर्मंडलांत यथाविधि कुंभक करावा. हा आरोहणक्रम साधल्यानंतर (१०) यथापूर्वक अवरोहणक्रमानें रेचक करून दिनक्रम साधिला असतां कुंभकांत देवतादर्शन, लक्ष्याचे ठिकाणीं, शिवार्चना (११) वगैरे करावयास उपयुक्त होतें असें जाणून प्राणायाम करावा. त्या साधनांमध्यें उजव्या हाताची कनिष्ठिका व अनामिका (१२) व अंगुष्ठ यां तीन अंगुलींनीं वामदक्षिण नासापुट धरावा. (१३) ब्रह्मविष्णुरुद्राधिदेवतात्मक अकार उकार मकारात्मक प्रणवांमध्यें ब्रह्मदेवताक

क ॥ प्रणवाचे ठायीं ब्रह्मदेवताक ॥ प्रणवाद्यकारचिंतन करावें ॥१३॥ ईडेमध्यें वायुशक्त्यनुसरण ॥ उदराचे ठायीं पूरण ॥ नंतर विष्ण्व-धिदेवताक जाण ॥ प्रणवमध्य उकार ॥१४॥ सुषुम्ना मध्यस्थानीं ध्यान करीत ॥ पूरित प्राणवायूचे ठायीं कुंभक करोन ॥ नंतर रुद्राधिदेव-तात्मक जाण ॥ प्रणवांत्यमकारस्मरण करावें ॥१५॥ कुंभित वायूस ॥ मंद मंद पिंगळेनें रेचन करून त्यास ॥ नंतर धरोनि तत्तन्मंत्रक्रमा-स ॥ आणिक पिंगळेनें ॥१६॥ पूरण करीत उदरस्थानीं ॥ कुंभक क-रीत ईडानाडीनें ॥ यथाविधि करावें रेचन ॥ ऐसें प्राणायामत्रय॥१७॥ करितां सर्व पाप परिहार ॥ होऊन शिवप्रसाद फार ॥ पावावया यो-ग्यतासिद्धि साचार ॥ होईल निश्चयें जाणा ॥१८॥

## मंत्रांगें.

केलियावरि सकलमंत्रासि ॥ साधारण झाला ऋषि ॥ छंदविशेषीं॥ देवताबीज ॥१॥ शक्तिकीलक स्वरवर्ण स्थानाक्षर ॥ कलातत्त्व अर्थ विचार ॥ तत्त्व लक्ष्यार्थ ॥ चिंतनादिक ह्मणिजे ॥२॥ सकळ अंगांत झाले मुख्य ॥ मंत्रासि प्रथमकारक ॥ द्रष्टाऋषि तो मस्तक ॥ स्थानीं-निरुता ॥३॥ मंत्राक्षरसंख्यारूपकर्ता ॥ छंदतोमुखीं निरुता ॥ मंत्र-

---

प्रणवादि अकाराचें चिंतन करावें. (१४) ईडानाडींत वायूच्या शक्त्यनुसारपणें उदरांत पूर्ण करावें. नंतर विष्णु अधिदेवताक प्रणवमध्यस्वरूप उकाराचें (१५) चिंतन सुषुम्ना नाडींत करावें. पूर्ण झालेल्या प्राणवायूंतच कुंभक करावें. नंतर रुद्राधिदेवताक प्रणवांत्यस्वरूप मकाराचें चिंतन करावें. (१६) कुंभक केलेल्या वायूला हळूच पिंगळेंत न्यावें. नंतर त्या त्या मंत्राचें स्मरण क्रमानें करावें. नंतर पिंगळेनें (१७) पूरण करीतच उदरांत कुंभक करावें. ईडेनें रेचन करावें. याप्र-माणें प्राणायामत्रय (१८) केला असतां सर्वपापरहित होऊन शिवप्रसादाला तो निश्चयानें योग्य होतो.

## मंत्रांगें.

(१) सर्व मंत्रांस साधारणपणें ऋषि, देवता, छंदस्, बीज, (२) शक्ति की-लक, स्वर, वर्ण, स्थान, अक्षर, कला, तत्त्व, लक्ष्य, अर्थचिंतन अशीं स्वरूपें अ-सतात. (३) यांमध्यें मंत्रास मुख्य प्रथम द्रष्टा ऋषि हा मस्तकस्थानीं आहे. (४) मंत्राक्षर संख्यारूप छंदस् हें मुख्यस्थानीं आहे. मंत्रवाच्य अधिदेवता ही हृदय-

वाचक आदिदेवता ॥ तो हृदयस्थानीं ॥४॥ मंत्रदेवता नामवर्णादि ॥ विशेष बीज तो नाभिमंत्रसिद्धि ॥ प्रदायक कुंडलिन्यादि ॥ शक्ति ते गुह्यस्थानीं ॥ ५ ॥ मंत्रविघ्ननिवर्तक ॥ झाला जो कीलक ॥ तो पादादिक ॥ स्थानीं निरुता ॥६॥ मंत्ररक्षक कारण ॥ झाला उमा विघ्नेश्वर आपण ॥ तियें अनुक्रमें वामदक्षिण ॥ भुजस्थानीं ॥७॥ ऋषये नमः ह्मणोनि ॥ परिक्रमें चतुर्थ्यंत नमस्कार करूनि ॥ तेते स्थानीं शिवोनि ॥ स्मरणपूर्वक ॥८॥ आणिक त्यामंत्रानें करन्यास ॥ देहन्यास ॥ अंगन्यास ॥ ह्मणिजे न्यासत्रय ॥९॥ उत्पत्तिस्थितिसंहार ॥ पूर्वोक्त भेदविचार ॥ परिक्रमें जाणोनि अंगीकार ॥ करावा त्याचेठायीं ॥१०॥ गृहस्थासि ॥ सुवासिनीसि ॥ विधवेसि ॥ स्थितिन्यास योग्य ॥११॥ ब्रह्मचर्यासि उत्पत्ति ॥ न्यास योग्य वानप्रस्थ यति ॥ तयांसि संहारन्यास योग्य इति ॥ जाणोनि अवधारावें ॥१२॥

## जपांगुलिविनियोगादि

आणिक अंगुष्ठानें मोक्ष ॥ तर्जनीनें शत्रुजयादिक ॥ मध्यमेनें विशेष ॥ अर्थसिद्धि॥१॥अनामिकेनें शांति ॥ कनिष्ठिकेनें अंति ॥ होय रक्षणस्थिती ॥ त्याचे ठायीं ॥२॥ मध्यमांगुष्ठयोगेकरून ॥ मालिका धरून ॥ करणें जपसंपादन ॥ तें कनिष्ठ ह्मणवी ॥३॥ तर्जनीअंगुष्ठयोगें ज-

---

स्थानीं आहे. (५) मंत्र देवनामवर्णविशेषरूपबीज हें नाभिस्थानांत आहे. मंत्रसिद्धिदायक कुंडलिन्यादि शक्ति गुह्यस्थानांत असतात. (६) मंत्रविघ्ननिवर्तक कीलक हें पादस्थानीं आहे. (७) मंत्ररक्षक उमा विघ्नेश्वर हे क्रमानें वाम दक्षिणभुजस्थानीं आहेत. (८) " ऋषये नमः " या क्रमानें चतुर्थ्यंत प्रयोग करून नमस्कार करावा नंतर त्या त्या स्थानाचा स्पर्श करावा. (९) व स्मरण करून त्या मंत्रांनीं करन्यास, देहन्यास, अंगन्यास असे न्यासत्रय (१०) उत्पत्तिस्थिति संहारभेद पूर्वोक्त क्रमानें जाणून करावेत. (११) कारण गृहस्थ, सुवासिनी, विधवा यांस स्थितिन्यास योग्य आहे. (१२) ब्रह्मचारी यास उत्पत्तिन्यास योग्य आहे. वानप्रस्थ यति यांस संहारन्यास योग्य आहे असें जाणावें.

## जपांगुलिविनियोग वगैरे.

(१) अंगुष्ठानें मोक्ष, तर्जनीनें शत्रुहानि मध्यमेनें अर्थसिद्धि (२) अनामिकेनें शांति, कनिष्ठिकेनें रक्षण अशीं फलें सांगितलीं आहेत. यांमध्यें (३) मध्यमांगुष्ठयोगानें माळ धरून जप करणें हें कनिष्ठ आहे. (४) तर्जन्यंगुष्ठ योगानें माळ ध-

पणें ॥ तैंमध्यम ह्मणवी आपण ॥, अनामिकांगुष्ठयोगें जप करणें ॥ तें उत्तम ह्मणवी ॥४॥ आणिक येथें ॥ मध्यमांगुष्ठयोगें विहित ॥ बाह्य जपकृत्य ॥ संपादूं ये ॥५॥ तर्जन्यांगुष्ठयोगें ॥ उपांशु जप करूं ये प्रसंगें ॥ अनामिकांगुष्ठसंयोगें ॥ मानसजप करूं ये ॥६॥ त्याचे ठायीं ॥ परश्रुति विशेष ॥ गोचरादिक होय तें वाचिक ॥ ह्मणवी निरुतें ॥७॥ होय स्वश्रुतिगोचर ॥ ओष्ठस्पंदमात्र ॥ उच्चारणमंत्र ॥ तें उपांशु ह्मणवी ॥८॥ मंत्रवाक्यार्थकारण ॥ अनुभूत चिंतन ॥ अंतरुच्चारण ॥ तें मानस ह्मणवी ॥९॥ त्याचे ठायीं ॥ वाचकजप तो क्षुद्रकार्यातें ॥ उपांशुजप तो सर्व सिद्धीतें ॥ मानसजप तो सत्यातें॥मोक्षविषयीं॥१०॥

## नवावरणें

आणिक तयामंत्राचे मुख्य ॥ वाच्यवाचक ॥ संबंध विशेष ॥ जाणोनिया ॥१॥ वरि पंचब्रह्मषडंग तें ॥ प्रथम आवरण निरुतें ॥ अनंतादि अष्ट विद्येश्वर तें ॥ द्वितीयावरण ॥२॥ उमा चंडीश्वर नंदिकेश्वर ॥ महाकाळी भृंगी रिटि गणेश्वर ॥ वृषभ षण्मुखेश्वर ॥ ह्मणिजे तृतीयावरण ॥३॥ इंद्रादिलोक ॥ पाळ अष्टक ॥ ब्रह्माविष्णु आदिदेवतादशक ॥ तें चतुष्क आवरण ह्मणवी ॥४॥ वज्रादिपद्मचक्रस्तोम ॥

---

रून जप करणें मध्यम होय- अनामिकांगुष्ठ योगानें माळ धरून जप करणें उत्तम होय. (५) मध्यमांगुष्ठ योगानें बाह्य जप करावा. (६) तर्जन्यंगुष्ठ योगानें उपांशुजप करावा. अनामिकांगुष्ठ योगानें मानस जप करावा. (७) त्यांमध्यें दुसऱ्याला ऐकावयास जाण्याजोगा जप करणें त्याला वाचिक जप ह्मणतात. (८) केवळ आपल्याच कानाला ऐकावयास येईल अशा रीतीनें उच्चार करून जप केला असतां त्याला उपांशु जप असें ह्मणतात. (९) मंत्रवाक्यार्थ चिंतन करणें याला मानस जप ह्मणतात. (१०) त्यांमध्यें वाचिक जप क्षुद्रकार्याला उपयुक्त होतो. उपांशु जप सर्वसिद्धीला कारण आहे. मानस जप मोक्षाचें साधन आहे.

## नवावरणें.

(१) त्या मंत्राचा वाच्यवाचक संबंध जाणून (२) पंचब्रह्मषडंगें प्रथमावरण आहे असें समजावें. नंतर अनंतादि अष्टविद्येश्वरच द्वितीयावरण जाणावें. (३) उमा, चंडीश्वर, नंदिकेश्वर, महाकाली, भृंगि, रिटि, गणपति, वृषभ, षण्मुख हे अष्टगणेश्वरच तृतीयावरण समजावें. (४) इंद्रादि अष्टदिक्पाल, ब्रह्मा, विष्णु वगैरे देवतादशक चौथें आवरण समजावें. (५) वज्र, पद्म, चक्र, वगैरे दशायुधें पांचवें

म्हणिजे दशम ॥ आयुध पंचम ॥ आवरण जाणावें ॥५॥ ब्रह्म आदिक-रून ॥ सप्तमातृका तें षडावरण ॥ अष्टवसु ते आपण ॥ सप्तम आवरण ॥६॥ एकादशरुद्र तें ॥ अष्टम आवरण निरुतें ॥ आदित्यादि ग्रहांतें ॥ नवमावरण जाणावें ॥७॥ पंचाक्षर्यादि मंत्रादिदेवतासहित ॥ सदाशिवध्यानयुक्त ॥ अथवा सावरणनिरावरण तरी ध्यानित ॥ जपावें त्याचे ठायीं ॥८॥ सद्योजप, निष्कामजप, ॥ सात्विकजप, मानसिकजप ॥ निरावरण केलिया जप ॥ जाणावें सूज्ञें ॥९॥ चिरकालजप सकामजप ॥ राजस तामस जप ॥ आवरणसहित करावा ॥१०॥

## ॥ ध्यानक्रम ॥

अभिचारग्रहउच्चाटणादिक ॥ तयासि कृष्णवर्णरूपपूर्वक ॥ वश्यादिकर्मासि मुख्य ॥ रक्तवर्णरूप ध्यानावें ॥ १ ॥ मुक्त्यादिक प्रयत्न ॥ तयासि कारण ॥ शुक्लादिक वर्ण ॥ रक्तवर्णरूप ध्यानावें ॥२॥ आणिक तें ध्यान ॥ अनुक्रमें विभिन्न ॥ करावया अवलंबन ॥ मंत्रदेवतासि ॥ ३॥

## ध्यानलक्षण.

नंतर मंत्रजपकर्त्यानें ॥ मंत्रवाच्यदैवतास्मरण ॥ शास्त्रविचारें करू-

---

आवरण समजावें. (६) ब्राम्ह्यादि सप्तमातृका साहवें आवरण समजावें. अष्टवसु सप्तमावरण समजावें. (७) एकादशरुद्र आठवें आवरण समजावें. आदित्यादि नवग्रह नवमावरण समजावें. (८) पंचाक्षरीमंत्राधिदैवत सदाशिवमूर्तीचें ध्यान आवरणसहित जप करावा किंवा निरावरण जप करून केवळ मूर्तीचें ध्यान करून जप करावा. (९) तथापि सद्योजप, निष्कामजप, सात्विकजप, मानसिकजप, यांस निरावरणध्यान करावें. (१०) चिरकालजप, सकामजप, राजस तामसजप यांचें आवरणसहित ध्यान करावें.

### ध्यानक्रम.

(१) कृष्णवर्णमूर्तीचें ध्यान केलें असतां अभिचार, उच्चाटन, वगैरे सिद्ध होतात. रक्तवर्णरूपाचें ध्यान केलें असतां वश्यादि कर्में सिद्ध होतात. (२) शुक्लादिवर्णरूपाचें ध्यान केलें असतां मोक्षसिद्धि होते. (३) याप्रमाणें ध्यानामध्यें अनेक भेद आहेत अनुक्रमानें अवलंबन करावें.

### ध्यानलक्षण,

(१) नंतर जपकर्त्यानें मंत्रवाच्य देवतेची आकृति शास्त्रद्वारानें समजून घ्यावी.

न ॥ लोकदृष्टप्रतिमेपरि ॥१॥ अथवा तेजोरूपेंकरून ॥ सांग सालंकारें करून ॥ स्वधारणेस अनुसरून ॥ नासाग्रासमीप ॥२॥ बाह्यदृष्टीनें तरी ॥ सूर्यचंद्रदेवतालय वैखरी ॥ तत्रस्थ चित्रादिबिंबामध्यें जरी ॥ दूर दृष्टीनें ॥३॥ अथवा अंतर्लक्ष्यानें भ्रूमध्यस्थानीं ॥ कुंडली, बिंदु, सहस्रारस्थानीं ॥ अथवा मूलाधारादि स्थानीं ॥ उक्त वर्णानें भावना करावी ॥४॥ अभ्यासवशें दृढीकृत ॥ लक्ष्यस्थानीं मनासि परिचारी कृत ॥ मंत्राक्षररूप पूजोपहार ॥ तत्त्वोपकरणांनीं ॥५॥ सभक्तिक समर्पण करून ॥ तद्दर्शनजनितानंदमग्न ॥ होय विस्मरण करून ॥ देवताज्ञप्तिमात्रावशिष्ट ॥६॥ राहणें तें ध्यान ह्मणवी ॥ ध्यानयोग बरवी ॥ सर्वयोगोत्तम ह्मणवी ॥ मुख्य ह्मणोनि जाणा ॥७॥

## ध्यानक्रमफलादि

नंतर त्या ध्यानक्रमांत ॥ पंचाक्षरीमंत्राधिदेवता ॥ जाणोनि परशिवातें ॥ वर्णन ते करिती यापरि ॥१॥ अघोरादि घोरमूर्तिं ह्मणोनि ॥ सदाशिवादि मित्रमूर्तिं ह्मणोनि ॥ सांबशिवादि शांतमूर्तिं ह्मणोनि ॥ त्रिविधमूर्ति असती ॥ २ ॥ त्याचे ठायीं ॥ अघोरादिघोरमूर्तिध्यानें शीघ्र ॥ पाप

---

लोकदृष्ट प्रतिमेचें ध्यान असो, (२) किंवा ज्योतिराकृतीचें ध्यान असो, परंतु ती मूर्ति सांग सालंकार आपल्या धारणेस योग्य अशी कल्पावी. अशा मूर्तीचें ध्यान नासाग्राजवळ (३) बाह्यदृष्टीनें किंवा सूर्यचंद्र देवतालयविग्रहच्चित्रादि बिंबामध्यें दूरदृष्टीनें (४) किंवा अंतर्लक्ष्यानें भ्रूमध्य, कुंडली, बिंदु, सहस्रार, मूलाधार यांमध्यें तरी उक्तवर्णानें ध्यान करावें. (५) अभ्यासवशानें दृढ झालेल्या लक्ष्यामध्यें मनाला परिचारक करावें. मंत्राक्षररूप पूजोपहार द्यावा तत्वोपकरणांनीं (६) सभक्तिक समर्पण करावें. त्याच्या दर्शनानें आनंद होऊन त्यांत मग्न होऊन त्याज्य सोडून देवताज्ञप्तिमात्र अवशिष्ट होऊन राहणें. (७) याला ध्यान असें ह्मणतात. ध्यानयोगच सर्व योगांत मुख्य आहे असें समजावें.

### ध्यानक्रमफल.

(१) या ध्यानक्रमामध्यें पंचाक्षरी मंत्राधिदैवत परशिवाच्या त्रिविधमूर्ति आहेत त्या अशा कीं, (२) अघोरादि घोरमूर्ति, सदाशिवादि मित्रमूर्ति, सांबशिवादि शांतमूर्ति अशा त्रिविधमूर्ति होत. (३) त्यांत अघोरमूर्तिध्यानानें पाप, रोग, शत्रु,

रोग रिपुसंहार ॥ मित्रमूर्तिध्यानें चिर ॥ काळीं सर्वसिद्धि होय ॥३॥ शांतमूर्तिध्यानें शीघ्र ॥ चिरकाळरहित सुविचार ॥ शांतिप्रज्ञादिक साचार ॥ होय ह्मणोनि जाणावें ॥४॥

### द्विविधजप.

आणिक तो मंत्रयोग जाण ॥ त्यामध्यें चित्तस्थैर्यादिक नसून ॥ जपमात्र फलाकांक्षा धरून ॥ फलाभिसंधिरहित ॥१॥ यथालाभ संतुष्ट असोन ॥ देवतामूर्तिध्यान नसोन ॥ क्रमानें मंत्रजप करणें तें जाण ॥ अगर्भजप ॥२॥ पूर्वोक्त ध्यानलक्षणादिक जाणून ॥ साधून करितो विधिपूर्वक ध्यान ॥ त्या जपासि ह्मणती जाण ॥ सगर्भजप ॥३॥ अगर्भजपाहून ॥ सगर्भजप जाण ॥ कोटिपट अधिक गुण ॥ देत असे ॥४॥ ध्यानरहित तो अगर्भजप ॥ ध्यानयुक्त आक्षेप ॥ तो सगर्भजप ॥ तयांत ॥५॥ अगर्भजपातें ॥ आणि सगर्भजपातें ॥ कोटि कोटि अंतर निरुतें ॥ ह्मणूनि जाणावें ॥६॥

### मंत्रगर्भ.

तयामंत्रासि आत्मगर्भ ॥ शिवगर्भ शक्तिगर्भ ॥ ह्मणोनि त्रयगर्भ ॥ त्याचे ठायीं ॥१॥ आत्मगर्भ तो सामर्थ्य फलदायक ॥ शिवगर्भ तो न-

---

दुःख वगैरे नष्ट होतात. मित्रमूर्तिध्यानानें पुष्कळ कालानंतर सर्व सिद्धि प्राप्त होतात. (४) शांतमूर्तिध्यानानें लौकरच शांति, प्रज्ञा वगैरे सिद्धि प्राप्त होतात. असें निश्चयानें जाणावें.

### द्विविधजप-

(१) आणि त्या मंत्रयोगामध्यें भावना ठेवणें चित्तस्थैर्य करणें याशिवाय जपमात्रफलापेक्षेनें फलाकांक्षा न धरतां (२) यथालाभांत संतुष्ट राहून देवतामूर्तिध्यानाशिवाय केवल मंत्राचा जप क्रमानें करणें याला अगर्भजप ह्मणतात. (३) पूर्वोक्त ध्यानलक्षणादि जाणून तें साधून विधिपूर्वक ध्यानसहित जप करणें याला सगर्भ जप ह्मणतात. (४) अगर्भजपापेक्षां सगर्भजपच कोटपट फल देणारा आहे.(५) ध्यानरहित जपाला अगर्भ जप ह्मणतात. ध्यानयुक्त जपाला सगर्भ जप ह्मणतात. (६) अगर्भ सगर्भ जपामध्यें कोटिपट अंतर आहे असें जाणावें.

### मंत्रगर्भ.

(१) त्या मंत्रांस आत्मगर्भ, शिवगर्भ, शक्तिगर्भ, असे तीन गर्भ आहेत. (२) त्यांमध्यें आत्मगर्भ सामर्थ्य देणारा आहे. शिवगर्भ षंढ आहे. शक्तिगर्भ भुक्तिमु-

पुंसक ॥ शक्तिगर्भ तो भुक्तिमुक्तिदायक ॥ ह्मणोनि क्रम जाणोनि ॥२॥

## जपोपसंहार.

जप करावा विध्युक्त ॥ जप झालिया समाप्त ॥ वरि माळिकेसि पूर्वोक्त ॥ विधिसी विपरीत ॥१॥ विलोम प्राणायामत्रयानें ॥ प्रथम ऐशा लक्षणें ॥ छंद ऋषि देवतादिस्मरणें ॥ हा विधि ह्मणवी ॥२॥ ध्यान लक्ष्य न्यासादिकें करून ॥ यथाविधिकृत दिग्बंधन ॥ उपास्यदेवता दिग्विमोचन ॥ करावें सूज्ञें ॥३॥ पुनरपि देवता अभिमुखीकरण ॥ करावया प्रार्थना करून ॥ तत्तन्मंत्र जपकर्त्यानें जाणून ॥ तत्तद्देवता संध्यावंदन ॥ ४ ॥ आणिक अर्घ्यबलियंत्रपूजन ॥ स्तवन पारायणतर्पण ॥ होमादिक करीत असोन ॥ निर्धार धरावा चित्तीं ॥५॥ संतत मंत्रयोगाभ्यासीं ॥ कर्त्याचीं पापें जातीं लयासि ॥ यज्ञें करून अवधारा मनासि ॥ सर्व काम्यार्थसिद्धि ॥६॥ शिवानुग्रहें ज्ञान ॥ मोक्षासि होतें कारण ॥ हाचि सिद्धांत जाण ॥ शास्त्रनिर्धारें ॥७॥ इति मंत्रादिक्रिया समस्त ॥ श्रीगुरूपदेशें शास्त्राभ्यासरत ॥ तयासि सक-

---

क्तिदायक आहे. याप्रमाणें जपरहस्य जाणून सांप्रदायज्ञ मांत्रिकांकडून उपदेश घेऊन जप करावा.

## जपोपसंहार.

(१) याप्रमाणें क्रमानें विधिपूर्वक जप केल्यानंतर जप समाप्त झाल्यानंतर पूर्वोक्त विधिविपरीत (२) विलोमप्राणायामत्रयानें पहिल्याप्रमाणें छंदस्, ऋषि, देवता यांचें स्मरण करावें. यास विधि असें ह्मणतात. (३) आणि ध्यान लक्ष्य न्यासादिकांनीं दिग्बंधन करावें उपास्य देवतेला दिग्विमोचन करावें. (४) नंतर पुनः देवता अभिमुख होण्याकरितां देवतेची प्रार्थना करावी. त्या त्या मंत्राचा जप करणाऱ्यानें त्या त्या देवता, संध्यावंदन, (५) अर्घ्य, बलि, यंत्र, बिंबपूजा, स्तोत्रपारायण तर्पण यांमध्यें तत्पर होऊन होमादिक करावेत. (६) मंत्रयोगाचा अभ्यास न चुकतां करणाऱ्यांनीं यज्ञांमध्यें श्रेष्ठ जपयज्ञानें सर्व पातकांचा संहार करून घ्यावा सर्व मनोरथ परिपूर्ण होण्यासारखा जपपरिपूर्त्यर्थ यज्ञ करावेत. (७) व शिवानुग्रहद्वारानें ज्ञानकारण मोक्ष मिळवावा. याप्रमाणें जपपरिपूर्तीकरितां यज्ञ प्रासादिक केलें असतां पूर्वोक्त फलें मिळतात असा सिद्धांत झाला आहे. (८) इत्यादि सर्व मंत्रक्रिया शास्त्राभ्यासीं चित्त ठेवून गुरूपदेशानें करणाऱ्याला सर्वा-

ळार्थ ॥ सिद्धि होय ॥८॥ नातरि स्वयुक्ति अनुसारें ॥ शास्त्रबळ विचारें अनुष्ठान करूं नये साचारें ॥ ह्मणोनि निश्चयें ॥९॥ गुरूपदेश नसोन ॥ मंत्रजप केलिया जाण ॥ उन्मादादिबाधन ॥ होईल अवधारा ॥१०॥ गुरुक्त उपदेशावरि ॥ जो स्वमनीं विश्वास धरीं ॥ जपसिद्धि स्वकरीं ॥ अवधारा निःसंदेहे ॥११॥

## शिवपूजाविषय.

इति भसित रुद्राक्ष ॥ पंचाक्षरी मंत्रविधान सिद्धिपूर्वक ॥ झालिया शुद्धशैवासि शिवार्चन मुख्य ॥ कर्तव्य होऊनि असे ॥१॥ त्याचे ठायीं ॥ जैसें मूलाभिषेकें वृक्ष ॥ शाखापरि उपशाखा ॥ सकळासि चेतनासुख ॥ प्रतिफलित होय ॥२॥ कां प्राणोपाहार लेशें ॥ सकळ इंद्रियसमूह तोषें ॥ चेतनानंदें परिपोषें ॥ जयापरि ॥३॥ केलिया गृहपतीचें आराधन ॥ संतुष्ट होती आप्तजन ॥ दृष्ट श्रुत तें जाण ॥ जयापरि ॥४॥ तैसें एक सर्वदेवतामूल शिवार्चनमात्रें ॥ सकळ देवता उत्तरोत्तरें ॥ संतुष्ट होती साचारें ॥ तया कारणें सकल पुरुषार्थसिद्धि होई ॥५॥ चंद्रार्कमंडल वन्हि गंगातीरीं ॥ स्थंडिल कळस पुस्तकपरी ॥ शालिग्रामादि अष्टस्थानाभीतरीं ॥ जाणावें तें ॥६॥ विग्रह

---

र्थसिद्धि प्राप्त होते. (९) केवळ स्वयुक्तीनें व शास्त्रविचारबलानें कधींहि अनुष्ठान करूं नये. (१०) गुरुकृपेशिवाय शास्त्राभ्यासाच्या व युक्तीच्या केवल बळानें अनुष्ठान करूं नये. उपदेशाशिवाय जप केला असतां उन्मादादि पीडा होतात.(११) उपदेश हा विश्वासामुळें प्रयोजक होतो असें जाणावें.

## शिवपूजाविषय.

(१) नंतर भस्म, रुद्राक्ष, पंचाक्षरी मंत्रविधान वगैरे सिद्ध झाल्यानंतर त्या शुद्धशैवास शिवपूजा मुख्य कर्तव्य आहे. (२) त्यांत मुळाला पाणी घातलें असतां वृक्ष जसा पल्लव, कुसुम, फल, शाखा, उपशाखा, यांसहित प्रतिफलित होतो. (३) प्राणाला आहार घातला असतां सर्व इंद्रियें जशीं विकास पावतात, (४) व गृहपति एक संतुष्ट असला तर घरांतलीं सर्व माणसें जशीं प्रफुल्लित असतात.(५) त्याप्रमाणें एका शिवाची पूजा केली असतां सर्व देवता संतुष्ट होतात. सकलपुरुषार्थ सिद्ध होतात. (६) चंद्रमंडल, सूर्यमंडल, अग्निमंडल, गंगातीर, स्थंडिल कलश, पुस्तक, शालिग्राम वगैरे ठिकाणीं लिंगाधिष्ठान विशेषेंकरून असतें. ह्मणून सर्व देव सर्व लोक शिवलिंगाची पूजा करतात असें जाणावें. (७) विग्रह,

चित्र मानव या त्रिस्थानीं ॥ पृथिव्यप्तेजवाय्वाकाश सूर्यचंद्रजीवाष्ट-स्थानीं ॥ शरीर वृक्ष पर्वतादिउपाधिस्थानीं ॥ शब्दस्पर्शरूपरसगंध ॥७॥ इत्यादि पंचतनूमात्रास्थानीं ॥ विचार करितां प्रपंचगत श्रेष्ठ व-स्तूचे ठिकाणीं ॥ शिवशक्तिसान्निध्यअसोनि ॥ जगचि जाणा शिव-लिंगाकार ॥८॥ तथापि पूजाधिष्ठानविंबांत ॥ लिंगाधिष्ठान विशेषें अ-सत ॥ शिवलिंगार्चनचि सर्वोत्कृष्ट ह्मणती ॥ निगमागम सर्व ॥९॥ शिवलिंगपूजन ॥ करावया शैवास प्रथम साधन ॥ अवधाराशिव-लिंगस्वरूपज्ञान ॥ तें सांगे पुढती ॥१०॥

## शिवलिंगस्वरूप.

नंतर सर्वमय होवोन ॥ आणिक पूर्ण होवोन ॥ असे तो परशिव जाण ॥ तयाचें यथार्थ आराधन ॥१॥ करावया नसोनि ज्ञान ॥ आ-णिक असमर्थ जाण ॥ ब्रह्मविष्णवादि सकल सुरजन ॥ ऋषिमुनियक्ष सिद्धादि ॥२॥ आणिक प्रमथगण ॥ स्वस्वशक्त्यनुसारें करून ॥ योग्य रीति अनुसरोन ॥ शिवलिंगविंब भावना ॥३॥ करोनि शिवपूजा क-रिती ॥ आणिक तत्तद्भिमत ॥ तत्तन्नामें शिवलिंग जात ॥ तत्तद्देव-तात्मक जाणावया सांगे पुढती ॥४॥

---

चित्र, मनुष्य या तीन स्थानांमध्यें, व पृथिवी, अप्, तेज, वायु, आकाश, सूर्य, चंद्र, जीव यां अष्टमूर्तींमध्यें शरीर, वृक्ष, पर्वत यांमध्यें, शब्द, स्पर्श, रूप, रस-गंध, (८) वगैरे पंच तन्मात्रा यांमध्यें विचार केला असतां व जगांत उत्तमोत्तम पदार्थांमध्यें विचार केला असतां शिवशक्तीचेंच सांन्निध्य दिसून येतें. फार काय! जगच शिवलिंगाकार असल्यामुळें (९) पूजाधिष्ठानबिंबामध्यें लिंगाधिष्ठानच वि-शेषेंकरून असतें. ह्मणूनच शिवपूजाच सर्वोत्तम आहे, असें निगमागम ओरडून स्पष्ट सांगत आहेत. (१०) या करितां शिवपूजा करावी. अशा शिवपूजकानें प्रथम शिवलिंग स्वरूप जाणलें पाहिजे. तें पुढें सांगतात—

## शिवलिंगस्वरूप

(१) सर्वमय, परिपूर्ण अशा शिवाची पूजा तात्त्विकपणें करावयास (२) अस-मर्थ असलेले ब्रह्मा, विष्णु वगैरे सर्व देव, ऋषि, मुनि यक्ष, सिद्ध, (३) प्रमथगण हे सर्व आपापल्या शक्तीला अनुसरून योग्य रीतीनें शिवलिंगबिंबाची भावना (४) करून पूजा करतात. त्यांना त्यांना अभिमत असलेलें शिवलिंग त्या त्या नांवानें प्रसिद्ध होऊन तत्तद्देवतात्मक झालें आहे असें जाणावें. तेंच पुढें सांगतात कीं—

## शिवलिंगभेद.

स्फटिक शिलामय लिंग तें ब्रह्मातें ॥ इंद्रनील लिंग तें विष्णूतें ॥ मरकतरत्नमय लिंग तें ॥ उपेंद्रासि पै ॥१॥ चिंतामणिमयलिंग तें इंद्रातें ॥ सुवर्णमयलिंग तें कुबेरासि ॥ रजतमयलिंग तें विश्वेदेवतासि ॥ पित्तलमय लिंग तें वायूसि ॥ कांस्यमय लिंग तें वसूंसि ॥२॥ मृण्मयलिंग तें ॥ अश्विनीदेवांतें ॥ स्फटिकमयलिंग तें ॥ वरुणासि ॥ ॥३॥ अन्नमयलिंग तें अग्नि ॥ ताम्रमयलिंग तें सूर्यालागूनि ॥ मुक्ताफळ लिंग तें निशीमणि ॥ बहुवर्ण लिंग नक्षत्रांसि ॥४॥ सर्वदेवता लिंगधारण ॥ पांचमणिमयलिंग तें बुधास योग्य ॥ लोहमयलिंग तें शुक्रासि योग्य ॥ विद्रुममयलिंग ॥ तें मंगळासि ॥५॥ माणिकमयलिंग तें ॥ बृहस्पतीसि निरुतें ॥ अयोमयलिंग तें ॥ शनैश्चरासि ॥६॥ धूम्रमयलिंग तें राहुकेतूंसि ॥ गोमयलिंग तें निर्ऋतीसि ॥ कुशमयलिंग तें सकलऋषींसि ॥ जाणा निर्धारें ॥७॥ रुद्राक्षमयलिंग प्रमथासि ॥ भस्मगोलकमयलिंग तें सिद्धासि ॥ मूलिकामयलिंग तें धन्वंतरीसि ॥

---

## शिवलिंगभेद.

(१) स्फटिकशिलामय लिंगाची पूजा ब्रह्मदेव करतो, इंद्रनीलमय लिंगाची पूजा विष्णु करतो, मरकत रत्नमय लिंगाची पूजा उपेंद्र करतो. (२) चिंतामणिमय लिंगाची पूजा इंद्र करतो. सुवर्णमय लिंगाची पूजा कुबेर करतो. रजतमयलिंगाची पूजा विश्वेदेव करतात. पित्तलमयलिंगाची पूजा वायु करतो. कांस्यमयलिंगाची पूजा अष्टवसु करतात. (३) मृण्मयलिंगाची पूजा अश्विनीकुमार करतात. धवळशिलामयलिंगाची पूजा वरुण करतो. (४) अन्नमयलिंगाची पूजा अग्नि करतो. ताम्रमयलिंगाची पूजा सूर्य करतो. मुक्तामयलिंगाची पूजा चंद्र करतो. चित्रवर्णलिंगाची पूजा नक्षत्र करतात. (५) सर्व देवता लिंगधारण करितात. पाचेचें लिंग करून बुध पूजा करतो. लोहमयलिंगाची पूजा शुक्र करतो. विद्रुममय (पोंवळ्याचें) लिंगाची पूजा मंगल करतो. (६) माणिक्यलिंगाची पूजा बृहस्पति करतो. अयोमयलिंगाची पूजा शनैश्चर करतो. (७) धूम्रमयलिंगाची पूजा राहुकेतु करतात, गोमयलिंगपूजा निर्ऋती करितात कुशमयलिंगाची पूजा सर्व ऋषि करतात. असें निश्चयें जाणावें. (८) रुद्राक्षमयलिंगाची पूजा प्रमथ गण करतात. भस्मगोळकमयलिंगाची पूजा सिद्ध करतात. मूलि-

शंकुमयलिंग तें मार्कंडेयासि ॥८॥ पवित्रमयलिंग तें वसिष्ठासि ॥ दर्भस्तंभमयलिंग तें विश्वामित्रासि ॥ कूर्चमयलिंग तें वामदेवासि ॥ स्वस्वरूपमयसदाशिवलिंग तें सनकादिकासि ॥ ९ ॥ शिरोरत्नमयलिंग तें नागासि ॥ अयःपिष्टलिंग तें राक्षसासी ॥ त्रपुमयलिंग तें ब्रह्मराक्षस वेताळ पिशाचादिकांसि ॥ जाणावें ॥ १० ॥ त्रिलोहमयलिंग तें गुह्यकांसि ॥ पंचलोहमय लिंग तें शावरादि मांत्रिकासि ॥ वज्रमय लिंग तें सप्तमातृकांसि ॥ ११ ॥ प्रसूनमय लिंग तें मन्मथासि ॥ इच्छामयलिंग तें लक्ष्मीसि ॥ ज्ञानमयलिंग तें पार्वतीसि ॥ क्रियामयलिंग तें सरस्वतीसि ॥१२॥ पतिमयलिंग तें अरुंधत्यनुसूयासावित्र्यादि पतिव्रतांसि ॥ बिल्वफलमय लिंग तें धर्मदेवतेसि ॥ जंबूफलमयलिंग तें मृत्युदेवतेसि ॥ निंबफलमयलिंग तें आरोग्यदेवतेसि ॥१३॥ गिरिमयलिंग तें पर्जन्यासि ॥ आकाशलिंग तें दिगंबरासि ॥ ध्वजमयलिंग तें गगनचारीसि ॥ मोहमयलिंग तें पश्वादिकांसि ॥१४॥ बीजमयलिंग तें कर्षकांसि ॥ एकूण नानाविध शिवलिंगासि ॥ यथाश-

---

कामयलिंगाची पूजा धन्वंतरी करतो. शंकुमयलिंगाची पूजा मार्कंडेय करतो, (९) व पवित्रमयलिंगाची पूजा वसिष्ठ करतो. दर्भस्तंभमयलिंगाची पूजा विश्वामित्र करीत असून कूर्चमयलिंगाची पूजा वामदेव करतो. स्वस्वरूपमय सदाशिवलिंगाची पूजा सनकादिज्ञानयोगी करीत असून(१०)शिरोरत्नमयलिंगाची पूजा नाग करतात.अयोमय ( लोखंडाच्या पिठाच्या ) लिंगाची पूजा राक्षस करतात. त्रपुमय ( कथिलाच्या ) लिंगाची पूजा ब्रह्मराक्षस, वेताळ, पिशाच वगैरे करतात. (११) त्रिलोहमयलिंगाची पूजा गुह्यक करतात. पंचलोहमयलिंगाची पूजा शाबरादिमांत्रिक लोक करतात. वज्रमयलिंगाची पूजा सप्तमातृका करतात. (१२) पुष्पमयलिंगाची पूजा काम करतो. इच्छाज्ञानक्रियात्मक लिंगाची पूजा अनुक्रमें लक्ष्मी पार्वती व सरस्वती ह्या करतात. (१३) पतिमय लिंगाची पूजा अरुंधती, अनुसूया, सावित्र्यादि पतिव्रता स्त्रिया करतात. बिल्वफलमय लिंगाची पूजा यमधर्म करतो. जंबूफलमय लिंगाची पूजा मृत्यु करतो. निंबफलमय लिंगाची पूजा आरोग्यदेवता करते. (१४) गिरिमय लिंगाची पूजा पर्जन्य करतो. आकाशलिंगाची पूजा दिगंबर करतात. ध्वजमय लिंगाची पूजा गगनचारीलोक करतात. मोहमय लिंगाची पूजा पशु वगैरे करतात. (१५) बीजमय लिंगाची पूजा कर्षकलोक ( शेतकरी )

कि पूजा करून इष्टार्थासि ॥ पावले असा शिवलिंग विभूति विस्तार-
जाणा ॥१५॥

## कर्मठानें पूजा करावयाचा प्रकार.

मानवांत ब्राह्मण करिती अग्निलिंगपूजन ॥ क्षत्रिय करिती खड्ग-
लिंगपूजन ॥ वैश्य करिती धनलिंगपूजन ॥ शूद्र करिती धान्यलिंग
सेवा ॥१॥ हें विधान सहज असोन ॥ शिवपूजा फलांत विशेषैंकरून॥
निगमागमोक्तवत् जाण ॥ जगांतील सकल मानव ॥२॥ स्वयंव्यक्त-
स्वयंभुलिंगपूजन ॥ सकल जातीस असे सर्वसाधारण ॥ तथापि शै-
वसिद्धांतसम्मतपंचलिंगार्चन ॥ त्याचे ठायीं स्वयंभुलिंग ॥३॥ बाण-
लिंग ॥ चरलिंग ॥ संकीर्णलिंग प्राणलिंग ॥ या पांच लिंगांचे ठायीं
॥४॥ स्वस्वशक्त्यनुसारें करून ॥ यथाविधि शास्त्र जाणोन ॥ तत्पर
होवोन शिवलिंगार्चन ॥ करावें निश्चय जाणा ॥५॥

## पंचशुद्धि.

आणिक तें शिवपूजन ॥ विधानासि देशकाल स्थान ॥ द्रव्य ह्मणो-
न ॥ इति प्रयोजनादिक ॥१॥ तांत्रिक वैदिक ॥ ह्मणोन द्विविध पूजा-
भेद पृथक् ॥ अंतःशौचादिक ॥ बाह्यशौच ॥२॥ ह्मणोनि विभिन्न ॥

---

करतात. याप्रमाणें नानाविध शिवलिंगपूजा करून आपापला इष्टार्थ पावले. याप्र-
माणें शिवलिंगविस्तर जाणावा.

### कर्मठानें पूजा करावयाचा प्रकार.

(१)मानवांमध्यें ब्राह्मण अग्निलिंगाची पूजा करतात. क्षत्रिय खड्गलिंगाची पूजा
करतात. वैश्य धनलिंगाची पूजा करतात. शूद्र धान्यलिंगाची पूजा करतात. (२)
हें विधान सहज असून यामध्यें वेदागमोक्त पूजा विशेष फलदायक आहे. मान-
वांमध्यें असा विशेष प्रकार जरी सांगितला आहे तथापि सर्वांनीं (३) स्वयंव्यक्त
स्वयंभु लिंगाची पूजा करावी. आणि शैवसिद्धांत संमत पंचलिंगार्चनांमध्यें स्वयं-
भुलिंग (४) बाणलिंग, चरलिंग, संकीर्णलिंग, प्राणलिंग असे भेद आहेत. यां
पांच लिंगांमध्यें (५) आपापल्या शक्तीला अनुसरून यथाविधि शास्त्र जा-
णून शिवलिंगार्चनतत्पर होऊन त्या त्या लिंगाचा अंगीकार करावा.

### पंचशुद्धि.

(१) आणि त्या शिवपूजेमध्यें देश, काल, स्थान, द्रव्य, प्रयोजन यांनीं (२)
तांत्रिकपूजा व वैदिकपूजा असे दोन भेद आहेत. अंतःशौच, बाह्यशौच(३) असे

द्विविध शौचभेदलक्षण ॥ शोषण दाहन ॥ प्लावन क्रिया ॥३॥ आत्मशुद्धि स्थानशुद्धि ॥ द्रव्यशुद्धि लिंगशुद्धि ॥ मंत्रशुद्धि ह्मणोनि पंचविधशुद्धि ॥ विस्तारावी ॥४॥ त्याचे ठायीं ॥ शौच आचमन स्नान ॥ भस्मरुद्राक्ष धारण ॥ कवचमंत्र न्यासकलानुसंधान ॥ ध्यानस्तवादिकरून ॥५॥ शिवात्मक होऊन समस्त ॥ परिक्रमें रचित ॥ राहणें यथार्थ ॥ ती आत्मशुद्धि ह्मणवी ॥६॥ शोधन संमार्जन अनुलेपनवर्णक॥ गंधपुष्पधूपदीपक ॥ पूजोपकरणवस्तु शुद्ध्यादिकें भरिजे चौक ॥ ती स्थानशुद्धि ह्मणवी ॥७॥ जलगंधाक्षतापुष्पांनीं ॥ मंत्रोदक निरक्षून भस्ममंत्रण ॥ संप्रोक्षणकरण ॥ ती द्रव्यशुद्धि ह्मणवी ॥८॥ सकल पूजार्थ करूनि ॥ ॐ नमः शिवाय अनामिका मध्यमास्थानीं ॥ निर्मल कुसुम धरूनि ॥ अंगुष्ठ तर्जनी तयानें प्रथम ॥९॥ निर्माल्य त्यजणें॥ लिंगपीठ त्या उदकानें ॥ प्रक्षालन करणें ॥ यथाविधि ॥१०॥ लिंगास सप्रणव पंचाक्षराभिमंत्रित ॥ घेऊन विधीनें भसित ॥ लेपन करावें यथोचित ॥ तें लिंगशुद्धि ॥११॥ कलश पूजादिकास ॥ तत्तत्सूक्तमंत्र विनियोगपूर्वी त्यास ॥ दशवार प्रणव एकवार प्रणवादिकांस ॥ आणिक पंचाक्षर ॥१२॥ ॐनमः शिवाय स्वाहा मंत्रेंकरून ॥ अष्टाक्षर-

---

दोन भेद आहेत. आणि शोषण, दाहन, प्लावन (४) या तीन क्रियांनीं आत्मशुद्धि, स्थानशुद्धि, द्रव्यशुद्धि, लिंगशुद्धि, मंत्रशुद्धि, पांच तऱ्हेची शुद्धि करावी लागते. (५) त्यांमध्यें शौच, आचमन, स्नान, भस्मरुद्राक्षधारण, कवच, न्यास, मंत्र, कलानुसंधान, ध्यान, स्तव इत्यादि अनुक्रमानें (६) शिवात्मक होऊन राहणें याला आत्मशुद्धि ह्मणतात. (७) शोधन, संमार्जन, अनुलेपन, वर्णक, गंध, पुष्प, धूप, दीप, पूजोपकरण, इत्यादि शुद्ध वस्तूंनीं चौक भरावा. याला स्थानशुद्धि असें ह्मणतात. (८) जल, गंध, अक्षत, भस्म, पुष्प, मंत्रोदक यांनीं संप्रोक्षण करणें याला द्रव्यशुद्धि ह्मणतात.(९) ॐनमः शिवाय या मंत्रानें अनामिका मध्यमांगुलि यांच्या मध्यभागीं नवीन पुष्प धरून अंगुष्ठतर्जनी यांनीं पहिलें (१०) निर्माल्य काढावें. लिंगपीठाचें यथाविधि प्रक्षालन पाण्यानें करावें. (११) नंतर सप्रणव पंचाक्षरी मंत्रानें अभिमंत्रित झालेलें भस्म लिंगास समर्पण करणें याला लिंगशुद्धि असें ह्मणतात. (१२) कलशपूजेकरितां त्या त्या सूक्तांतील मंत्रांचा विनियोग करावा. त्याचे अगोदर दशवार प्रणव, एकवार सप्रणव पंचाक्षर, (१३)

मंत्र जाण ॥ उदात्तमध्य स्वरितें करून ॥ पठन करणें मंत्रशुद्धि ॥१३॥

## मुद्राविवेक.

आणिक अस्त्रमुद्रा चक्रमुद्रा ॥ महामुद्रा शोधिनीमुद्रा ॥ संहारमुद्रा ॥ इति पंचमुखीमुद्रा ॥१॥ सुरभिमुद्रा द्रव्यमुद्रा ॥ मुकुलितमुद्रा पद्ममुद्रा ॥ शशकर्णमुद्राशुक्तिमुद्रा ॥ वीजमुद्रा ॥२॥ शांतिमुद्रा आवाहनमुद्रा ॥ मनोहरमुद्रा ध्वजमुद्रा ॥ लिंगमुद्रा गायत्रीमुद्रा ॥ काळकंठमुद्रा ॥३॥ शूलमुद्रा नमस्कारमुद्रा ॥ योनिमुद्रा उच्चाटनमुद्रा ॥ आच्छादनमुद्रा ॥ संहारमुद्रा ॥४॥ ह्मणोनि सकल मुद्रांचें ॥ उपमुद्रा बंधलक्षण गुरुमुखें जाणोनि साचें ॥ गुरूस न दाखवितां आत्मैकग्राह्य तया तया योग्य क्रियेचे ॥ ठायीं प्रयोगावें ॥५॥ मुद्रास्वरूपज्ञान ॥ नसे तयास मंत्रसिद्धि जाण ॥ नसे हें वचन ॥ निश्चित जाणणें ॥६॥

## शिवपूजायोगपीठ.

शिवपूजोपयुक्त होऊन ॥ अनंत पीठ कमठपीठ जाण ॥ शेषपीठ सिंहपीठ असोन ॥ पद्मपीठ विमलपीठ ॥१॥ भद्रपीठ ॥ योगपीठ ॥ प्रणवपीठ ॥ यां भावनेनें कल्पित ॥२॥ दिव्यमंडप मध्यगत ॥ सिंहास-

---

ॐ नमः शिवाय स्वाहा हा अष्टाक्षर मंत्र यांचें पठन उदात्त, मध्यम, स्वरित या प्रकारानें करावें याला मंत्रशुद्धि ह्मणतात.

### मुद्राविवेक.

(१) आणिक अस्त्रमुद्रा, चक्रमुद्रा, महामुद्रा, शोधिनीमुद्रा, संहारमुद्रा, पंचमुखीमुद्रा, (२) सुरभिमुद्रा, द्रव्यमुद्रा, मुकुलितमुद्रा, पद्ममुद्रा, शशकर्णमुद्रा, शुक्तिमुद्रा, बीजमुद्रा, (३) शांतिमुद्रा, आवाहनमुद्रा, मनोहरमुद्रा, ध्वजमुद्रा, लिंगमुद्रा, गायत्रीमुद्रा, कालकंठमुद्रा, (४) शूलमुद्रा, नमस्कारमुद्रा, योनिमुद्रा, उच्चाटनमुद्रा, आच्छादनमुद्रा, संहारमुद्रा, (५) याप्रमाणें सर्व मुद्रोपमुद्राबंधलक्षणें गुरुमुखानें जाणून नंतर गुरूला देखील न दाखवितां आत्मैकग्राह्यपणें त्या त्या योग्यक्रियेमध्यें आवश्यक प्रयोग करावेत. (६) मुद्रास्वरूप न समजलेल्या मांत्रिकाला मंत्रसिद्धि होत नाहीं.

### शिवपूजायोगपीठ.

(१) शिवपूजोपयुक्त अनंतपीठ, कमठपीठ, शेषपीठ, सिंहपीठ, पद्मपीठ, विमलपीठ, (२) भद्रपीठ, योगपीठ, प्रणवपीठ, अशा पीठांची भावना करून कल्पित (३) झालेल्या दिव्यमंडपाच्या मध्यभागीं असलेल्या सिंहासनास श्वेत, रक्त,

न जात ॥ श्वेतरक्तपीत ॥ श्यामादिवर्णचतुष्टय ॥३॥ रचित सिंहाकार-धर्मज्ञान ॥ वैराग्यैश्वर्यरूप जाण ॥ विभूति चतुष्टयरूप जाण ॥ ईशान्यादि विदिक्चित्पाद चतुष्टय जाण ॥ राजावर्त प्रभारंजित ॥४॥ अधर्म अज्ञान ॥ अवैराज्य अनैश्वर्य ह्मणोन ॥ इंद्रादिक जडपाद चतुष्टय जाण ॥ परिभावना करावी ॥५॥ अणिमादि अष्टसिद्धि ह्मणोन॥ पूर्वाद्यष्टदिग्दळ असोन ॥ वामदेवादि सर्वभूतदमन ॥ पर्यंत रुद्रचि केसर जाण ॥ ऐसें वैराग्यचि मध्यकर्णिका ॥६॥ वामादिमनोन्मनीपर्यंत एकादशशक्ति जाण ॥ अंतर्बहिरादि मध्यांतराळ पूर्ण ॥ व्याप्तप्रकाशक नित्य सुख कर्णिकाबीज ॥ असोन नंतर त्याच्यावरि ॥७॥ अग्निरविशशित्रयमंडल ॥ त्यावरि अंतरात्मा परमात्मा सकल ॥ त्यावरि आत्मतत्व विद्यातत्व शिवतत्व अखिल ॥ एकूण षट्त्रिंशद्भावनांत ॥८॥ शंभुलिंगस्थान स्वीकारून ॥ आयत सिंहासन कल्पना करोन ॥ त्या सिंहासनाग्रावरि जाण ॥ यथाविभवविस्तर ॥९॥ श्रीशिवलिंग स्थापना करून ॥ यथाविधि पूजन ॥ करावें तें विधान ॥सांगे पुढती ॥१०॥

---

पीत, श्याम असें चार रंग, (४) कल्पिलेले असावेत. असें सिंहासन रचित झाल्यानंतर धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य असे विभूतिचतुष्टयरूप चार चित्पाय ईशान्यादि विदिशेला कल्पावेत. आणि राजावर्तप्रभारंजित (५) अधर्म, अज्ञान, अवैराग्य, अनैश्वर्य असे चार जड पायांची पूर्वादि दिशेला भावना करावी. (६) याप्रमाणें कल्पना केल्यानंतर आणिमादि अष्टसिद्धि पूर्वादि दिशांचे अष्टदिग्दळ आहेत. अशी कल्पना करावी. वामदेवादि सर्व भूतदमनांत रुद्रच केसर आहेत अशी कल्पना करावी. वैराग्यच मध्यकर्णिका करून (७) वाम आरंभ करून मनोन्मनीपर्यंत असलेल्या एकादशशक्ति आदिमध्य अंतीं व मध्यांतराळ्यांमध्यें परिपूर्णपणें व्याप्त असून प्रकाशणाऱ्या नित्यसुखकर्णिकेमध्यें बीज आहेत अशी कल्पना करावी नंतर त्यावर (८) अग्नि, रवि, शशि, या मंडलत्रयाची कल्पना करावी. नंतर त्यावर अंतरात्मा परमात्मा यांची कल्पना करावी. त्यावर आत्मतत्वाची, त्यावर विद्यातत्व शिवतत्व यांची भावना करून एकूण छत्तीस तत्वांची भावना करावी. (९) याप्रमाणें शंभुलिंगस्थान स्वीकारून विस्तृत सिंहासनाची कल्पना करावी त्या सिंहासनाग्रावर वैभवसहित (१०) शिवलिंगाची स्थापना करून यथाविधि त्याची पूजा करावी. तें पूजाविधान पुढें सांगतों.

## शिवार्चनसंग्रह.

नंतर समाहित शुद्धांतःकरण मन ॥ तयें यथायोग्य पूजन ॥ संभार संपन्न ॥ प्रणव पंचाक्षरी पंचब्रह्म ॥१॥ मंत्र शांभवोपनिषद्रुद्राध्याय स्तवागमश्रवण ॥ सुस्वर वाद्य घोषण ॥ तयीं शिवैकायत्त चित्त होऊन ॥ सहस्राष्टोत्तर शत ॥२॥ चतुःषष्ठि द्वात्रिंशत् चतुर्विंशति षोडश नवपंच जात ॥ ऐशा त्या उपचारांत ॥ यथाशक्त्युपचरणें ॥३॥ श्रद्धा भक्ति ध्यान ज्ञानसमेत ॥ शिवभजन करीत ॥ आवाहन स्थापन संनिधान होत ॥ संनिरोधन संमुखी करण ॥४॥ इत्यादि मुख्य क्रियायुक्त ॥ पूजापरिसमाप्तिपर्यंत ॥ प्रत्युपचार क्षालन पात्र ॥ जलस्पर्श पुनः पुनः करावें ॥ ५ ॥ अर्घ्याद्युपचार सांकर्यरहित ॥ सकल क्रिया जात ॥ ईश्वरार्पण करीत ॥ असणें तें शिवपूजा जाण ॥६॥

## शिवपूजासामग्री.

आणिक नदीतटाक ॥ कूपाचे ठायीं विशेख ॥ स्वादु मिश्र लवणादिक ॥ अनुक्रमें ॥१॥ उत्तम मध्यम कनिष्ठ ह्मणोन ॥ पूजायोग्य होऊन ॥ असे जीवन ॥ त्यापरि भेदें ॥ २ ॥ शुभ्र राई कुसुमादिक ॥ दूर्वा

---

## शिवार्चनसंग्रह.

(१) नंतर शुद्ध शांत मन इंद्रियें यांनीं यथायोग्य पूजासंभार संपन्न होऊन प्रणवपंचाक्षरी पंचब्रह्म (२) मंत्र, व शांभवोपनिषत्, रुद्राध्याय, स्तव,:आगम, श्रवण, सुस्वर, मंगळवाद्य यांच्या घोषानें शिवाचे ठिकाणीं एकाग्र मन करून सहस्र, अष्टोत्तरशत, (३) चतुःषष्ठि, बत्तीस, चोवीस, सोळा, नऊ, पांच या उपचारांमध्यें यथाशक्त्युपचारांनीं (४) श्रद्धा भक्ति ध्यान ज्ञान संपन्न होऊन शिवाचें भजन करीत आवाहन, स्थापन, सन्निधान, सन्निरोधन, संमुखीकरण (५) वगैरे मुख्य क्रियांसहित होऊन पूजा समाप्त होईपर्यंत प्रत्युपचार क्षालन पात्रस्थ जलाचा स्पर्श वारंवार करीत असावा. (६) अर्घ्यादि उपचार सांकर्य न करितां सर्व क्रिया ईश्वरार्पण करणें याला शिवपूजन असें ह्मणतात.

## शिवपूजासामग्री.

(१) आणि नदी, तळीं, विहिरी, आड, यांमध्यें पाणी गोड, मिश्र, खारट, असे तीन तऱ्हेचें असतें. यांमध्यें अनुक्रमानें (२) उत्तम मध्यम कनिष्ठ असे तीन वर्ग आहेत. यांत पूजायोग्य पाणी निवडून घ्यावें. (३) नंतर पांढऱ्या मोहऱ्या,

कोष्ठ वाळा पच्चकर्पूरादिक ॥ ह्मणजे षट्मुख्य ॥ पाद्यद्रव्यें ॥३॥ कुशाग्र तिळ राई शुभ्र ॥ जव साळी क्षीर ॥ ह्मणजे षट् प्रकार ॥ अर्घ्य द्रव्यें ॥४॥ यानंतर तयांस ॥ मुखांबुजास ॥ घृतदधिमधुमिश्र ॥ मधुपर्क द्रव्यें ॥५॥ फळ कचोर ॥ कोष्ठ कुंकुम एला कर्पूर ॥ ह्मणिजे षट् प्रकार ॥ आचमन द्रव्यें ॥६॥ पंचगव्य ॥ पंचामृतादिक ॥ गोधूम चूर्ण मुद्ग चूर्णादिक ॥ गंधादि विशेष ॥ उद्वर्तन द्रव्यें ॥७॥ मंद परिमळ। उष्णादिकमय ॥ ह्मणिजे उभय ॥ वारि स्नानें ॥८॥ गंधोदक पुष्पोदक। सुवर्णोदक रत्नोदक ॥ मंत्रोदकादि मुख्य ॥ महास्नान विधीनें ॥९॥ विधिलब्ध मृदु नय शुभ्र गुणयुक्त भसित मात्रें ॥ पट्ट देवांग शुभ्रचित्रादि वस्त्रें ॥ व्याघ्राजिनाद्युपधानें सुवर्ण रजत पट्ट कार्पास दर्भादि रचित यज्ञोपवीतें ॥ किरीट हार कवच नागवलय चंद्रकला गलगरळ रुंडमाला रुद्राक्षमालादि दिव्याभरणें ॥ १० ॥ चंदनागरु कस्तूरि कर्पूर ॥ कचोर केशर ॥ वाळा कोष्ठ ह्मणिजे अष्ट प्रकार ॥ गंधद्रव्यें ॥११॥ जव शुभ्र राई तीळ ॥ तंडूल मुक्ताफल रत्नादि सकल ॥ अक्षता द्रव्यें ॥१२॥ शुभ्र रक्त कृष्ण वर्णानुक्रमें करून ॥ नंद्यावर्त मल्लिका द्रोण ॥ कुमुद श्वेत शेवंतिका सुगंधराज जाण ॥ श्वेतार्क प्रमुख सा-

---

फुलें, दूर्वा, कोष्ठ, वाळा, पच्चकापूर अशीं हीं सहा द्रव्यें मुख्यत्वेंकरून पाद्याचीं आहेत. (४) कुशाग्र, तीळ, पांढऱ्या मोहऱ्या, जव, साळी, क्षिर अशीं सहा द्रव्यें अर्घ्याचीं होत. (५) घृत, दहि, मधु हीं सर्व मिसळलीं असतां याला मधुपर्कद्रव्य ह्मणतात. (६) फल, कचोरा, कापूर, कोष्ठ, कुंकुम, वेलदोडे हीं सहा द्रव्यें आचमनीयाचीं होत. (७) पंचगव्य, पंचामृत, गव्हाचें पीठ, मुगाचें पीठ, गंध हीं द्रव्यें उद्वर्तनाचीं होत. (८) मंदोष्णादि स्नानोदक लक्षणानें युक्त (९) गंधोदक, पुष्पोदक, सुवर्णोदक, रत्नोदक, मंत्रोदक हीं द्रव्यें महास्नानाचीं होत.(१०)मृदु, शुभ्र गुणांनीं युक्त भस्में व पट्टवस्त्र, देवांग, अशीं उंचीं शुभ्र वस्त्रें, आणि व्याघ्राजिनाचीं उपधानें (उशी) सुवर्ण किंवा पट्टकार्पास दर्भादिरचित यज्ञोपवीतें, किरीट, कवच, हार, नागवलय, चंद्रकला, गलगरळ, रुंडमाला, रुद्राक्षमाला वगैरे दिव्य आभरणें, (११) चंदन, अगरु, कस्तूरी, कापूर, केशर, कचोरा, वाळा, कोष्ठ वगैरे अष्टविध गंधद्रव्यें (१२) जव, पांढऱ्या मोहऱ्या, तीळ, तांदूळ, मुक्ताफळ, रत्नें वगैरे अक्षताद्रव्यें, (१३) शुभ्र, रक्त, कृष्ण या अनुक्रमानें नंद्यावर्त, मल्लि-

त्विक ॥१३॥ कोकनद कमल कुशेशय कुसुम ॥ रक्त जपादि कुसुम ॥ जगीं पंडितस्तोम ॥ यांसि राजस ह्मणती ॥ १४ ॥ नीलोत्पल तमाल ह्मणून ॥ नील धत्तूरादि प्रसून ॥ तामस ऐसें जाण ॥ शास्त्रनिर्धारें ॥१५॥ केतकीरहित नाना प्रसून ॥ दूर्वा बिल्व तुलसी ह्मणोन ॥ मरुवादि पत्रें जाण ॥ संपादावीं ॥१६॥ रूप रस गंधादिकें करून ॥ रमणीय अनिषिद्ध असोन ॥ योग्य भोग्य वस्तु जाण ॥ संपादाव्या॥१७॥ कृष्णागरु श्वेतागरु ह्मणोन ॥ श्वेत गुग्गुल श्रीगंध लाक्षा बिल्व असोन ॥ घृत मधु सर्जरस कर्पूर जाण ॥ दशांग धूप ॥१८॥ तैलवर्ति घृतवर्ति कर्पूर त्रिविध दीप असोन ॥ हरिद्रान्न परमान्न मुद्गान्न ॥ कृसरान्न दध्यन्न गुडान्न ॥ शुद्धान्न शाल्यन्नादि अष्टविधअन्नें ॥१९॥ भक्ष्य भोज्य लेह्य असोन ॥ आणिक चोष्य शाक व्यंजन ॥ दधि क्षीर मधु शर्करा जाण ॥ नारिकेळोदक ॥ २० ॥ इक्षु खर्जूर नारिकेल ॥ कदली चूत पनस दाडिमफल ॥ संत्री जंबू द्राक्षादि रुचिकर शुद्ध फल ॥ नैवेद्यार्थ संपादावें ॥२१॥ नागपर्ण क्रमुकचूर्ण ॥ सुधा कर्पूर एला ह्मणोन ॥ जायफल लवंगादि असून ॥ योग्य तांबूल ॥२२॥ एकार्ति पंचार्ति ॥ नक्षत्रार्ति कलशार्ति ॥ रथार्ति वसंतार्ति ॥ पंक्तिनीराजन॥२३॥ कर्पूर नीराजनादि आर्तिक्य द्रव्य असोन ॥ दर्पण व्यजन श्वेत छत्र

---

का द्रोण, कुमुद, श्वेतशेवंतिका, सुगंधराज श्वेतार्कप्रमुख सात्विक फुलें. (१४) कोकनद, कमल, कुशेशय, रक्तजपादि राजसफुलें (१५) नीलोत्पल, तमाल, नीलोन्मत्तादि तामसफुलें (१६) केतकीवर्ज नानाविधफुलें दूर्वा, बिल्व, तुलसी, मरवा अशीं नानाविध पत्रें, (१७) रूपरस गंधादिकांनीं मनोरम व अनिषिद्ध योग्य अनेक भोग्य वस्तु, (१८) कृष्णागरु, श्वेतागरु, श्वेतगुग्गुळ, श्रीगंध, लाक्षा, बिल्वफल, घृत, मध सर्जरस, कापूर, वाळा अशीं दशांग धूपद्रव्यें (१९) तेलवात, घृतवात, कापूर अशीं दीपद्रव्यें, हरिद्रान्न, परमान्न, मुद्गान्न, कृसरान्न, दध्यन्न, गुडान्न, शुद्धान्न, शाल्यन्न अशीं अष्टविध अन्नें (२०) भक्ष्य, भोज्य, लेह्य, चोष्य, शाक, व्यंजन, दधि, क्षीर, मध, साखर, नारळाचें पाणी, (२१) ऊंस, खजूर, नारळ, केळी, आंबा, फणस, डाळिंब, संत्री, जंबू, द्राक्ष वगैरे रुचकर नैवेद्य द्रव्यें, (२२) विड्याचीं पानें, सुपारी, चुना, कापूर, वेलदोडे, जायफल लवंगादि योग्य तांबूलद्रव्यें (२३) एकार्ती, पंचार्ति, नक्षत्रार्ति, कलशार्ति, रथार्ति, वसंतार्ति, पंक्तिनीराजनार्ति, (२४) कर्पूरनीराजन अशीं आर्ति द्रव्यें, दर्पण, व्यजन, श्वेतच्छत्र, चामर, सूर्यचंद्रपान,

ह्मणोन ॥ चामर सूर्यचंद्र पान ॥ नंदिध्वज तोरण पताक ॥ २४ ॥ दंड वेत्र पटांचल ॥ वृषभ भसित गोरुद्राक्ष शूल ॥ प्रमथ वीर वीरभद्र वेल्हाळ ॥ खड्ग पट्टकादि विविधोपचार बिरुदें ॥२५॥ पूर्णकुंभ बीजपूर कुशस्तंब कर्णपूर ॥ कमलमंजरी पुष्पमालादि द्रव्य निकर ॥ डमरु डिंडिम झर्झर ॥२६॥ झल्लरी शंख वीणा वेणु मृदंग काहळ ॥ तम्मटि भेरी घंटादि वाद्यजाल ॥ पट्टवृषभ पट्टाश्व पट्टगज सकळ ॥ रथ दोला आंदोलकादि विहारद्रव्यें ॥ २७ ॥ तोमर मुद्गर भिंडिवाल ॥ मुसंडी गदा टंक करवाल ॥ पिनाक चक्र शूल ॥ डमरु हरिण पाश ॥२८॥ अंकुशादि दिव्यायुध सकल ॥ अर्घ्यपात्र पानीयपात्र ॥ अभिषेकपात्र सोमसूत्र ॥ धारापात्र शंख गोशृंग ॥२९॥ करजल शुद्धकूर्च मयूरपिच्छल ॥ रक्षा मयूख नव पवित्र अखिल ॥ आत्मरक्षाकरंडाद्युपायजाल ॥ यथाशक्ति संपादावें ॥३०॥ परिशुद्ध होऊन ॥ भक्तिश्रद्धादिकें करून ॥ करावें शिवार्चन ॥ ईशप्रेरणेनें ॥३१॥

## उपचारसंग्रह.

आणिक परम पवित्र ॥ सकळ परिमनोहर ॥ द्रव्यानें उपचार ॥ केलियामध्यें ॥ १ ॥ आवाहन अर्चन निवेदन ॥ त्रिविध उपचार ॥ अति

---

नंदिध्वज, तोरण, पताक, (२५) दण्ड, वेत्र, पटांचल, वृषभ, भसित, गोरुद्राक्ष शूल, प्रमथ, वीर, वीरभद्र, खड्ग, पट्टक, अशीं विविध उपचार बिरुदावळीद्रव्यें, (२६) पूर्णकुंभ, बीजपूर, कुशस्तंभ, कर्णपूर, कमलमंजरी पुष्पमाला वगैरे द्रव्यें; डमरु, डिंडिम, झर्झर, (२७) झल्लरी, शंख, वीणा, वेणु मृदंग, काहल, तम्मट, भेरी, घंटा वगैरे वाद्यद्रव्यें; पट्टवृषभ, पट्टाश्व, पट्टगज, रथ, डोला, आंदोलिका वगैरे विहारपदार्थ (२८) भिंडिवाल, तोमर, मुद्गर, मुसंडी, गदा, टंक, करवाल, पिनाक, शूल, चक्र, डमरुग, हरिण, पाश, (२९) अंकुश वगैरे दिव्य आयुधें; अर्घ्यपात्र, पानीयपात्र, अभिषेकपात्र, सोमसूत्र, धारापात्र, शंख, गोशृंग, (३०) करजल, शुद्धिकूर्च, मयूरपिंछ, रक्षामयूख, नवपवित्र, आत्मरक्षाकरंड वगैरे उपायनद्रव्यें या द्रव्यांपैकीं मिळतील तितकीं द्रव्यें मिळवून (३१) भक्तिश्रद्धापूर्वक शिवपूजा करावी.

## उपचारसंग्रह.

(१) याप्रमाणें परमपवित्र, सुंदर पूजासामग्री संपादन केल्यानंतर उपचारसंग्रह करावा. (२) आवाहन, अर्चन, निवेदन असे त्रिविधोपचार, आणि अष्टोप-

मनोहर ॥ अष्टोपचार ॥२॥ दशोपचार षोडशोपचार ॥ चतुर्विंशत्युपचार ॥ द्वात्रिंशत्युपचार चतुःषष्ठ्युपचार ॥ अष्टोत्तरशतोपचार ॥३॥ सहस्रविधोपचार॥ भक्तजनोपकल्पित लीलोपचार ॥ त्याचे ठायीं स्मृत्यागमसंमत साचार ॥ द्वात्रिंशदुपचाराचि मुख्य ॥४॥ ते कैसे ह्मणतिले तरी ॥ ध्यान आवाहन आसन ॥ पाद्य अर्घ्य आचमन ॥ स्नान वस्त्र यज्ञसूत्र भूषण ॥ गंधाक्षता ॥५॥ पुष्प धूप दीप नैवेद्य मुखवासन ॥ नीराजन दर्पण फलार्पण ॥ तांबूल प्रदक्षिणा ॥ नमस्कार ॥ ६ ॥ स्तोत्रपुराणादि पठन ॥ छत्र चामर व्यजन ॥ शयन संगीत नृत्य वाद्य आत्मार्पण ॥ ह्मणिजे इति ॥ ७ ॥ द्वात्रिंशत्युपचार समस्त ॥ समंत्रक होऊन यथामति ॥ सकळिक करावें ॥८॥ प्राणप्रतिष्ठापूर्वक शिवमंत्रें करून ॥ शंभुलिंगासि उपचार देऊन ॥ नसे जरि समस्त पूजाद्रव्यसाधन ॥ जलमात्रें करून ॥९॥ पूजा केलिया सकलसांगिक ॥ पूजेसमान ह्मणती सकळिक ॥ पूजकासि विवेक श्रद्धा भक्ति ध्यान ॥ निष्ठादि मुख्य असोन ॥१०॥ त्याचे ठायीं अर्चनेसि मुख्य भक्तिसाधन ॥ ईश्वरविषयक श्रवण ॥ कीर्तन स्मरण ॥ पादसेवा ॥ ११ ॥ पूजा वंदन

---

चार, (३) अथवा दशोपचार षोडशोपचार, चतुर्विंशति उपचार, द्वात्रिंशति उपचार, चतुःषष्ठ्युपचार, अष्टोत्तरशतोपचार (४) सहस्रविधोपचार असे भक्तजन भावनोपकल्पित लीलोपचार आहेत त्यांमध्यें स्मृत्यागमसंमत द्वात्रिंशदुपचारच मुख्य आहेत. (५) ते असे कीं, ध्यान, आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, भूषण, गंध, अक्षता (६) पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, मुखवासन, नीराजन, दर्पण, फलार्पण, तांबूल, प्रदक्षिणा, नमस्कार, (७) स्तोत्र, पुराणादि पठन, छत्र, चामर, व्यजन, शय्या, संगीत, नृत्य, वाद्य, आत्मार्पण, असे मुख्य (८) हे बत्तीस उपचार समंत्रक होऊन सर्वांनीं यथामति करावेत.(९) श्रद्धावुद्धि यांनीं प्राणप्रतिष्ठापूर्वक शंभुलिंगास शिवमंत्रानें उपचार समर्पण करावेत. पूर्वोक्त सर्व पूजाद्रव्यें अनुकूल होत नसलीं तर केवल जलमात्रें (१०) पूजा करावी. ती पूजा सर्वसांगिक पूजेसमान आहे. याप्रमाणें सांग पूजा करणाऱ्या पूजकास सत्यपणें श्रद्धा, भक्ति, विवेक, ध्यान, निष्ठा हे पंचक मुख्य आहेत (११) त्यांत ईश्वराचे ठिकाणीं मुख्यत्वें करून भक्ति असली पाहिजे. श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवा, (१२) पूजा, वंदन, दास्य, सख्य, आत्मार्पण अशा तऱ्हेनें नव-

दास्य सख्य आत्मार्पण ॥ ऐसें नवविध भक्तिसाधन ॥ हें अंतरंगांत ठेवून ॥ पीठस्थ शिवलिंगाची ॥ १२ ॥ बहिरंग पूजा करावी ह्मणोन ॥ तत्तन्मंत्रार्थानुगुण ॥ निगमागमांत प्रसिद्ध असोन ॥ सर्वत्र मूलमंत्र ॥ विनियोग करावा ॥१३॥

## अंतरंगशिवार्चन.

आणि इहलोक फलकामुक ॥ झाला नातरि परलोक ॥ फलकामी विशेष झाला तरी ॥ १ ॥ अथवा सकळिक ॥ परिजन लोक ॥ तयासि हितचिंतक ॥ झाला तरी ॥२॥ पूर्वोक्त प्रकारें सकल बाह्य द्रव्यानें ॥ शिवलिंगपूजाविधान ॥ कृतनिश्चय करणें ॥ ह्मणोनि जाणावें ॥३॥ परमेश्वर प्रसादार्थी मात्र होऊन ॥ निष्कामें मोक्षेच्छा करून ॥ असा जो अधिकारी जन ॥ आभ्यंतरीं ॥४॥ सन्मय पीठाचे ठायीं ॥ आनंदमय लिंगप्रतिष्ठा होई ॥ चिन्मय द्रव्यांनीं सर्व कालीं ॥ निष्कलमष शिवाराधना ॥५॥ करणें तें कर्तव्य जाणून ॥ आतां चिन्मय पूजोपचारांत ॥ उपचर्य देवतेच्या गुणांतें ॥ उपचार आरोपण ॥६॥ गुरुमुखें उपदिष्ट होऊन ॥ योगाभ्यासबळें करून ॥ करावयाचा प्रकार जाण ॥ सांगे पुढती ॥७॥

---

विधभक्ति आहे. या भक्तीनें युक्त होऊन पीठस्थ शिवलिंगाच्या (१२) बहिरंगाची पूजा करावी. पूजा करावयाचे वेळेस त्या त्या मंत्राचा अर्थ मनांत आणून पूजा करावी. वरील सर्व मंत्र वेद व आगम यांत प्रसिद्ध आहेत असें समजावें. आणि प्रत्येक वेळेस मूलमंत्राचा उच्चार करावा.

## अंतरंगशिवार्चन.

(१) ऐहिकफलाकांक्षी असो, पारत्रिक सुखाची इच्छा करणारा असो, (२) सर्व लोकांच्या हिताची इच्छा करणारा असो. (३) त्यानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें बाह्यपूजा करावी. (४) परमेश्वर प्रसादार्थी व केवल मुमुक्षु होऊन निष्कामपूजा करणारा जो अधिकारी असेल, त्यानें अंतरंग पूजा करावी. (५) अंतरंगांत सन्मयपीठावर आनंदमय लिंगाची स्थापना करून चिन्मय द्रव्याची कल्पना करून निष्कलमष होऊन सर्वकाळीं शिवाराधना करावी. (६) चिन्मय उपचारामध्यें उपचर्य देवतागुणांमध्यें उपचार आरोप करून (७) गुरूपदेश घेऊन योगाभ्यासानें पूजा करावयाचा प्रकार पुढें सांगितल्या प्रमाणें

## आंतरशिवयोगसंग्रह.

तें कैसें ह्मणतिलें तरी ॥ प्रथम अंतरंगाभीतरीं ॥ अनुसंधानाचा परि ॥ रचनारंभ॥१॥ शिवधर्म तो कंद सुज्ञान तें नाळ ॥ अष्टमहदैश्वर्य तें दळ ॥ रुद्र ईश्वरादि केसर सकळ ॥ वैराग्य तें कर्णिका ॥ २ ॥ चंद्रप्रभामय होऊनि ॥ मिरवे स्वतेज प्रभेचेनि ॥ हृत्कमळीचे सोमसूर्याग्नि ॥ मंडळत्रय मध्यात ॥३॥ सत् ह्मणिजे दिव्यमूर्ति ॥ चित् ह्मणिजे कायाकांति ॥ आनंद ह्मणिजे अति ॥ लावण्यानें ॥ ४ ॥ तत्वें परिकल्पित भरणायुधादियुक्त ॥ सर्व आलंकृत ॥ होऊनिया ॥५॥ स्फटिक घटांत दीपकन्यायें ॥ बाह्यांतरि प्रभामय ॥ असे ईश्वरविग्रह ॥ तयासि परिभाविजे॥६॥ सर्वाधार ईश्वर कारण ह्मणोनि बुद्धीते आसन ॥ परमात्मा परिपूर्ण ह्मणोन ॥ मति तें आवाहन ॥७॥ जगत सर्व शिवमय ह्मणोनि ॥ शिवाचे श्रीपद जाणोनि ॥ निश्चलभाव जाणिवेचेनि ॥ तेंचि पाद्य ॥८॥ सुखांबुधिसमान ॥ शंभो ह्मणोन ॥ अनुसंधान ॥ तेंचि अर्घ्य ॥९॥ परम पवित्र स्वरूप ह्मणोन ॥ सद्भाव जाणिव

---

## अंतरशिवयोगसंग्रह.

(१) याचा प्रकार असा आहे कीं, प्रथम अंतरंगांत रचनेला सुरवात करावी. (२) शिवधर्मच कंद करून सुज्ञानच नाळ करावा. अष्टैश्वर्यच दळ करून रुद्र ईश्वर वगैरे देवताच केसर आहेत अशी कल्पना करावी. आणि वैराग्यच कर्णिका करावी. (३) चंद्रप्रभामय हृदयकमलांत सोमसूर्याग्नि मंडलत्रयाच्या मधोमध (४) सत् नांवाची दिव्यमूर्ति आहे अशी कल्पना करावी. चित् नांवाची शरीरकांति कल्पावी, आनंद नांवाच्या लावण्याची रचना करावी. (५) सर्व तत्वें अलंकार आहेत आणि आयुधांनीं युक्त आहे अशी कल्पना करून त्या अलंकारांनीं ती मूर्ति अलंकृत झाली आहे असें मनांत आणावें. (६) स्फटिकाच्या घागरींत चमकणाऱ्या दिव्याप्रमाणें आंत बाहेर प्रकाशणाऱ्या परमेश्वराची कल्पना करावी. (७) सर्वाधार परमेश्वर आहे अशी जी बुद्धि आहे ती बुद्धिच आसन होय. परमात्मा परिपूर्ण आहे अशी जी मति आहे ती मतिच आवाहन होय. (८) जग सर्व शिवमय आहे, आणि जग सर्व शिवश्रीपाद आहे, असा निश्चलभाव करणें हेंच पाद्य होय. (९) शंभु सुखसमुद्र आहे अशी भावना करणें हेंच अर्घ्य होय. (१०) शिवाचें स्वरूप परमपवित्र असून शिवपरवस्तु नित्यानंदाचा अनुभव देणारी आहे

तें आचमन ॥ नित्य निर्मळ ईश्वर आपण ॥ ह्मणोनि उपलब्धि तें स्नान ॥१०॥ जगत्सर्व अतिक्रमून ॥ शुद्ध विद्या तें वस्त्रप्रावर्ण ॥ त्रिगुणातीत सुज्ञान ॥ तें यज्ञोपवीत ॥११॥ चैतन्य तें जगातें ॥ अलंकार निरुतें ॥ ह्मणोनि प्रतिभासतें ॥ आभरण ॥१२॥ शुद्धचिच्छक्ति तें अनुलेपिता ॥ कारुण्य तें अक्षता ॥ प्रणवात्मक सत्य ॥ वचन तें पुष्प ॥१३॥ विषयवासना विलीन तो धूप ॥ जगद्वर्तिरूप ॥ धरूनि प्रज्वलित स्वरूप ॥ परंज्योति तो दीपक ॥ १४॥ अखिल जगत ॥ तें अंतर्गर्भीकृत ॥ करूनि असे आत्मा तो नित्य ॥ तृप्त ह्मणिजे ॥ १५ ॥ संवित् तें निवेदन ॥ त्रिगुण अंतर घेऊन ॥ असे ज्ञप्ति आपण ॥ तें तांबूल ॥१६॥ सोहंभावप्रवृत्ति ते प्रदक्षिणा ॥ सकळ तत्वें अतिक्रमून ॥ राहणी समान॥ तो निज नमस्कार ॥१७॥ शिवैक्यस्थिति ॥ तें विसर्जन ह्मणोनि इति ॥ उपचारपूजा अति अंतरीं विस्तारावी ॥१८॥ आणिक ऐसें शिवार्चन ॥ हृत्कमळकर्णिकेमध्यें समान ॥ गुरूनें दिधलें इष्टलिंगकारण ॥ तें सिंहासनाचे ठायीं ॥१९॥ पूजाविधान यथार्थ ॥ करावें आत्मार्थ ॥ ते पूजेसि विध्युक्त ॥ भेदादिक ॥२०॥ ग्रामारामनदीतिरीं ॥ पुण्याश्रमक्षेत्र गिर्यादिकांचे ठायीं तरी ॥ अथवा देवदानवमानवादि परि ॥ तयां

---

अशी भावना करणें हेंच आचमन होय. ईश्वर हा नित्यनिर्मल आहे, अशी भावना करणें हेंच स्नान होय. (११) जगाचें अतिक्रमण केलेल्या शुद्धविद्येला वस्त्राचे ठिकाणीं योजना करावी. त्रिगुणातीत ज्ञानच यज्ञोपवीत आहे अशी योजना करावी. (१२) चैतन्य हें जगदलंकारभूत प्रतिमा आहे. अशी भावना करणें हेच दागिने होत. (१३) शुद्ध चिच्छक्तीला अनुलेपाचे ठिकाणीं योजना करावी. कारुण्यच अक्षता आहे असें समजावें. प्रणवात्मक सत्यवचनच पुष्प आहे असें समजावें. (१४) विषयवासनेचा लयच धूप असून जगद्वर्ति (वात) प्रज्वलित परंज्योतिच दीप आहे असें समजावें. (१५) जग सर्व पोटांत ठेवून घेऊन नित्यतृप्त होऊन राहिला आहे. (१६) ह्या ज्ञानाला नैवेद्य ह्मणतात. त्रिगुण अंतर्यामी करून राहिलेली ज्ञप्ति (स्मृतिज्ञान) तांबूल होय. (१७) सोहंभावाची प्रवृत्तिच प्रदक्षिणा होय. सर्व तत्वांचें अतिक्रमण करून राहणें नमस्कार होय. (१८) शिवैक्य स्थितिच विसर्जन समजून इत्यादि उपचारांनीं अंतरंगांत पूजा करावी. (१९) नंतर हृत्कमल कर्णिकेमध्यें गुरूनें दिलेलें इष्टलिंग सिंहासनावर ठेवून (२०) आत्मार्थ करण्यांत येणारे पूजाभेद (२१) ग्राम, नदीतीर, आराम (बाग), पु-

पासूनि ॥२१॥ प्रतिष्ठितलिंगासन्निधीं ॥ करणें तो परमार्थ पूजावि-
धी॥ न उबगतां स्वसंबंधीं ॥ आचरत असतां ॥२२॥

## परार्थपूजादिप्रायश्चित्त.

ते परमार्थ पूजेंत ईश्वर ॥ आवरण झालें वृषभ भास्कर वीर-
भद्र ॥ मातृका स्कंद क्षेत्रपाळ ब्रह्माविष्णुरुद्र ॥ ह्मणिजे देवता ॥१॥
त्यांचे स्थानक्रम जाणोन॥आपण करीत आराधन॥पृथक् स्थापित वि-
ष्ण्वादि देवतांचें भजन ॥ त्यजूनिया ॥२॥ आपुलें पूजावें इष्टलिंग ॥
तें चोरादिकेंकरून वियोग ॥ झालिया तें आलें तरी चांग ॥ न साधे
तरी ॥३॥ एक लक्ष अघोरजप करून ॥ शुद्धात्मा होऊन ॥ वरि आ-
चार्यापासून ॥ विध्युक्तक्रमें ॥४॥ पुनः पावोनिया लिंग ॥ व्रतनेमादि-
क भंग ॥ लोपवी योग ॥ न होय तैसें ॥५॥ अष्टोत्तरशत वरी ॥ आक्षे-
पें गायित्री ॥ जपमात्रें परी ॥ शुद्धि पावोनि ॥६॥ आणिक परम प-
वित्र ॥ झाले मुख्य विशेषाकार ॥ शिवपादोदक स्वीकार ॥ शिवप्र-
सादान्नसेवन ॥७॥ शिवप्रसादांबुपान ॥ शिवनिर्माल्य कुसुमबिल्वा-
दिधारण ॥ शिवार्पण सेवन ॥ तांबुलादिक ॥८॥ शिवेतर वर्ज्य करू-

---

ण्याश्रम, क्षेत्र पर्वत वगैरे ठिकाणीं देव, दानव, मानव यांनीं (२२) प्रतिष्ठा के-
लेल्या लिंगाची पूजा ती परार्थ पूजा होय. ह्या दोन्ही पूजा नियमानें कराव्या.

## परार्थपूजादिप्रायश्चित्त.

(१) परार्थपूजेमध्यें ईश्वराला आवरणभूत देवता, वृषभ, भास्कर, वीरभद्र, मा-
तृका, स्कंद, क्षेत्रपाल, ब्रह्मा, विष्णु, रुद्र याच होत. (२) त्यांचें त्यांचें स्थान जा-
णून क्रम समजून आराधना करावी. निराळ्या रीतीनें स्थापना केलेल्या विष्ण्वादि
देवतांचें भजन करूं नये. (३) आपल्या इष्टलिंगाचीच पूजा करावी. कदाचित
इष्टलिंग चोरांनीं नेलें असतां पुनः सांपडण्याचा संभव नसेल तर (४) एक लाख
अघोर मंत्राचा जप करून शुद्धात्मा होऊन नंतर आचार्याकडून विधिपूर्वक अ-
नुक्रमानें (५) पुनः इष्टलिंग मिळवावें. व्रतनियमादिकांचा भंग झाला असतां
(६) अष्टोत्तरशत गायत्री मंत्राचा जप करावा ह्मणजे तो शुद्ध होतो. (७) नंतर
परमपवित्र शिवपादोदकाचा स्वीकार करावा, नंतर शिवप्रसादाचें सेवन करावें.
(८) नंतर शिवप्रसादांबुपान करावें. शिवनिर्माल्य कुसुमबिल्वादि धारण करावें,
शिवार्पित तांबूलादिकांचें सेवन करावें. (९) शिवेतर देवता वर्ज करून शिव-

न ॥ शिवकथा श्रवण ॥ शिवभक्त सल्लापन ॥ शिवधर्मनिष्ठादि ॥९॥ सद्ब्राह्मण ॥ सत्क्षत्रिय वैश्य जाण ॥ सच्छूद्रादि करून ॥ मानवांस कर्तव्य होय ॥१०॥ नाहींतरी अवशिष्ट पापात्म्यासि ॥ शिवेतरपरायण पाषंडियासि ॥ नंदीदधीच्यादि शापदग्धांसि ॥ शिवसंस्काररहीनांसि ॥११॥ नास्तिकजनांतें ॥ वेदबाह्य ज्यातें ॥ शिवप्रसाद योग्य नव्हे सत्यार्थें ॥ ह्मणोनि जाणावें ॥१२॥ इति सकळ सत्क्रियेनें बुद्धि ॥ निर्मळ अंतःकरणविशुद्धि ॥ होऊन असे तो शुद्ध ॥ शैव ह्मणवी ॥ १३ ॥

---

कथाश्रवण, शिवभक्तांशीं भाषण करणें, शिवधर्मनिष्ठा वगैरे कर्में (१०) सद्ब्राह्मण, सत्क्षत्रिय, सद्वैश्य, सच्छूद्र यांना सांगितलीं आहेत. (११) बाकी पापात्म्यांस शिवेतरपरायण पाषंड्यांस, नंदीदधीच्यादि शैव ऋषींच्या शापानें दग्ध झालेल्या मानवांस, शिवसंस्काररहीनांस, (१२) नास्तिकांस, वेदबाह्यांस, शिवप्रसादांबुपान योग्य नाहीं व त्यांना शिवधर्मादि कर्में सांगू नयेत हें निश्चितपणें जाणावे. (१३) याप्रमाणें भावना करणारा, व याप्रमाणें सर्व सत्क्रिया करणारा, निर्मलांतःकरणाचा असा मानव सर्वपूज्य शुद्धशैव आहे असें समजावें.

## वीरशैवलक्षण.

आणिक परमेश्वर विख्यात ॥ निर्मित केला जगांत॥ वीरशैवप्रख्यात॥ चरमशरीरी असे ॥१॥ सर्वोत्तम व्रत करीत ॥ अप्रतिहत शिवव्रत ॥ करीत असोन लोकपावन ह्मणवीत ॥ समस्त सज्जन करिती वर्णन ॥२॥ समस्त शैवांत श्रेष्ठ असोन ॥ इतर शैवांपरि क्रियाबाहुल्यें करून ॥ अल्प फल पावत नसोन ॥ अल्प क्रियांनीं ॥३॥ अनंतफल पावत ह्मणोनि आदरें ॥ शिवदीक्षेवरि निर्धारें ॥ विश्वास श्रद्धाभरें ॥ निष्ठापणें ॥४॥ स्नान भोजन निद्रा जागरण ॥ मलमूत्रविसर्जन ॥ कालीं अशौचभावन ॥ मनांत नसतां ॥५॥ सदासर्वदा लिंगांग ॥ संबंध करून लिंगभोगोपभोग ॥ सेवून स्वेष्टलिंग ॥ त्याचे ठायीं ॥६॥ आवाहनविसर्जन ॥ क्रियेसि अकर्ता होऊन ॥ त्रिकाललिंगार्चनीं अवधान ॥ असे सक्तपणें ॥७॥ लिंगलोप व्रतलोपादिक ॥ तेथें प्राणत्याग नातरीं आणि एक ॥ प्रायश्चित्तासि अश्रद्धिक ॥ होऊनि असे ॥८॥ गुरुनिंदा शिवनिंदा ॥ शिवकथानिंदा ॥ प्रमथनिंदा ॥ शैवनिंदा ॥९॥ जंगमनिंदा ॥ प्रसादनिंदा ॥ पादोदकनिंदा ॥ भस्मधारणनिंदा ॥१०॥

---

## वीरशैवलक्षण.

(१) परमेश्वरनिर्मित या जगांत चरमशरीरी ( शेवटचें शरीर धारण करणारा ) (२) सर्वोत्कृष्ट व्रत करणारा, अप्रतिहत शिवव्रत करणारा, जगांत परमपवित्र ह्मणविणारा सर्व सज्जन लोकांस पूज्य झालेला (३) सर्वांमध्यें श्रेष्ठ असें ह्मणवून घेऊन इतर शैवांप्रमाणें बहुक्रिया करून अल्प फल न घेतां अल्पक्रियेनें (४) अनंत फल मिळवून शिवदीक्षेच्या निर्धारानें विश्वासनिष्ठा ठेवून (५) स्नान, भोजन, निद्रा, जागरण, मलमूत्र विसर्जनाचे वेळेस अशुचि भावना मनांत न आणतां (६) सर्वदा लिंगांगसंबन्ध करून लिंग भोगोपभोगी होऊन आपल्या इष्टलिंगाचे ठिकाणीं (७) आवाहन विसर्जन न करतां त्रिकाल लिंगार्चनासक्त होऊन (८) लिंगलोप व्रतलोप झाला असतां प्राणत्यागाविषयीं तत्पर होऊन इतर प्रायश्चित्तांविषयीं अश्रद्धा ठेवून वागणारा, (९) गुरुनिंदा, शिवनिंदा, शिवकथानिंदा, प्रमथनिंदा, शैवनिंदा, (१०) जंगमनिंदा, शिवप्रसादनिंदा, पादोदकनिंदा भस्म-

शिवागम शिवक्षेत्र ॥ शिवजन शिवाचार ॥ सांप्रदायनिंदा लेशमात्र॥ न सहन करी ॥११॥ शिवनिंदा श्रवण केलिया॥ प्रायश्चित्त देई निज- देहा ॥ निंदकाची जिव्हा वाया ॥ करी छिन्न करोनि ॥१२॥ सर्वशि- वमय जाणोनि ॥ फिरत आहे जगांतूनि ॥ नसे त्यासमान त्रैलो- क्यांत ॥१३॥ विष्णवादिदेवताजन ॥ सकल अलक्ष करून ॥ वाह्य शिवलिंगलांच्छन ॥ नसे त्या भवियुक्ता ॥१४॥ एकासन शयन यान॥ सहवास संभाषण सौहार्द सहभोजन ॥ न करितां सन्निधान ॥ असं- गी होऊनि असे ॥१५॥ भस्ममात्र लांछनयुक्त ॥ लोकांवरि दया क- रीत ॥ जो शिवचिन्हरहित ॥ पापिष्ठासि शिक्षा करी ॥१६॥ शिवध- र्माभिवृद्धी करितां ॥ तनुमनधन अर्पण करांत ॥ असे तो विख्यात॥ वीरशैव ॥१७॥ अनृत अस्थिरवाक्य ॥ वंचना पंक्तिभेद उदासीनताक॥ निर्दय ह्मणिजे इतिषट्क ॥ दोषांनीं षड्विध भवि होत नाहीं ॥१८॥ वीरशैवमाहेश्वरादिक ॥ देखतां उठोनि संमुख ॥ अभ्युद्गमन पूर्वक॥ तयासंगें ॥१९॥ संचरणें प्रियवचन ॥ स्वआसनीं बसवोन ॥ अन्नपान समर्पण ॥ युक्त होऊनि वर्ते ॥२०॥ इति मुक्तिसोपान ॥ सप्तक प्रयो- जन ॥ क्रमयुक्त होऊन ॥ असे निरत ॥२१॥ शिवधर्मविरुद्ध सर्वथा

---

धारणनिंदा, (११) शिवागमनिंदा, शिवक्षेत्रनिंदा, शिवजननिंदा, शिवाचारसंप्र- दायनिंदा सहन न करणारा, (१२) निंदा ऐकली असतां प्रायश्चित्त घेणारा, निंदा करणाऱ्याची जीभ तोडणारा, (१३) सर्व शिवमय आहे असें मानणारा, जगांत संचार करणारा होय. ह्या सारिखा त्रैलोक्यांत कोणी नाहीं. (१४) विष्णवादि देवांचा तिरस्कार करणारा, बाह्य लिंग नसलेल्या भवी बरोबर (१५) एका- सनं, शयन, यान सहवास, संभाषण, सहभोजन, सौहार्द वगैरे न करणारा, (१६) भस्म मात्र धारण करणाऱ्यावर दया करणारा, शिवचिन्ह नसलेल्या पापी प्रा- ण्यांस शिक्षा करणारा, (१७) शिवधर्माभिवृद्धीकरितां तनुमनधन अर्पण करणारा जो, त्यास प्रख्यात वीरशैव ह्मणावें. (१८) खोटें बोलणें, अस्थिर बोलणें, वंचना, पंक्तिभेद, उदासीनता, निर्दयता ह्या सहा दोषांनीं षड्विध भवी न होऊन (१९) वीरशैव माहेश्वराचें दर्शन घेणारा, त्यांना प्रत्युत्थान, अभ्यागम, (२०) सहसंचार प्रियवचन, आसनदान, आनंदहास, अन्नपान वगैरे समर्पण करून (२१) मुक्तीच्या या सात पायऱ्या तयार करून ठेवणारा, (२२) शिवधर्मविरुद्ध पदार्थांचा त्याग

सोडोन पंचसूतक ॥ जातिसूतक जननसूतक प्रेतसूतक ॥ उच्छिष्ट-सूतक ॥ रजःसूतक ह्मणिजे पंचसूतक ॥ सूतकाविरहित ॥२२॥ लिं-गाचार सदाचार ॥ भृत्याचार शिवाचार ॥ गणाचार ह्मणिजे पंचा-चार ॥ नैष्ठिक होऊनि ॥२३॥ दासत्व वीरदासत्व ॥ भृत्यत्व वीरभृ-त्यत्व ॥ समयाचारत्व ॥ सकळावस्थात्व ॥२४॥ ह्मणिजे इति ॥ षड्-विध सज्जनसंगति ॥ परि युक्त अति ॥ होऊनि असे ॥२५॥ देशकाळ कल्पितादिक ॥ आचार लंघून लौकिक ॥ शीलयुक्त होऊनि पृथक ॥ स्वतंत्र विचरे ॥२६॥ शिवात्मकासंयोगें यथार्थ होऊनि भेदभ्रांति-रहित ॥ जीवलिंग शिवलिंगांत ऐक्य करोनि मिरवत ॥ वीरशैव-धर्म होत ॥ त्यांनीं कृतकृत्य असे ॥२७॥ लिंगांगसंगाद्वैतभावनेनें ॥ भयवर्जित होऊन ॥ सर्वसमर्थ शिवाश्रयें करून ॥ अघटन घटना स-मर्थ ॥२८॥ धैर्यसंपन्न होऊन ॥ हर्षविषाद न मानून ॥ शांभवविद्यार-त होऊन ॥ महाशैव ह्मणवी ॥२९॥ तेणेंकरून ॥ तत्संज्ञायुक्त होऊन ॥ जगत्पूज्य होऊन ॥ असे तो वीरशैव ॥३०॥

## वीरशैवभेद.

आणि तया वीरशैवाचेनिं ॥ क्रियाभेदेकरूनि ॥ सामान्य वीरशै-

---

करणारा, जातिसूतक, जननसूतक, प्रेतसूतक, उच्छिष्टसूतक, रजःसूतक हीं पंच-सूतकें न मानणारा, (२३) लिंगाचार, सदाचार, भृत्याचार, शिवाचार, गणाचार असे पंचाचारनिष्ठा असणारा, (२४) दासत्व, वीरदासत्व, भृत्यत्व, वीरभृत्यत्व, समयाचारत्व, सकलावस्थात्व (२५) असा षड्विध सज्जन असणारा, (२६) देशकालकल्पित लौकिक आचारांचें अतिक्रमण करून स्वतंत्रशीलाचा होऊन (२७) शिवात्म्यांची भेदभ्रांति दूर करणारा असा होऊन जीवलिंग शिवलिंगांत ऐक्य करणारा ( समरस करणारा ), असा जो असेल तोच वीरशैव होय. वर सां-गितल्याप्रमाणें वीरशैवधर्मनिष्ठ व कृतार्थ होऊन (२८) लिंगांगसंगाद्वैत भावनेनें निर्भीत होऊन सर्वशक्तिमान शिवाच्या आश्रयानें अघटनघटनासमर्थ (२९) व धैर्यसंपन्न होऊन हर्षविषादाला वश न होतां शांभवीविद्येंत रत होत असल्या-मुळें त्यास महाशैव ह्मणतात. (३०) ह्या संज्ञेनें युक्त होऊन जगत्पूज्य होऊन वीर-शैव याप्रमाणें ह्मणवून घेतो.

## वीरशैव भेद.

(१) अशा वीरशैवामध्यें क्रियाभेदानें तीन प्रकार आहेत. सामान्य वीरशैव,

व ह्मणोनि ॥ असे तथा ॥१॥ विशेष वीरशैव ह्मणोनि ॥ निराभारि वीरशैव ह्मणोनि ॥ त्रिविध प्रकार होऊनि ॥ असे त्याचे ठायीं ॥२॥ श्रीगुरुचिया कृपालेशें ॥ हस्त मस्तक संयोगवशें ॥ विभूति पट्ट शिवमंत्रोपदेशें ॥ लिंगांगसंयोगी होऊनि ॥३॥ हस्त मस्तक कंठ कक्ष ॥ वक्षःस्थळादिक ॥ तयाठायीं शिवलिंगधारक ॥ होऊनिया ॥४॥ एककाल पूजन ॥ अथवा त्रिकाल पूजन ॥ करी शिवार्चन ॥ यथायुक्त ॥५॥ गुरुलिंग जंगम भसित ॥ यांचे ठायीं भक्तियुक्त ॥ होऊनि असे तो विख्यात ॥ सामान्य वीरशैव ह्मणवी ॥६॥

## दीक्षाक्रम.

यानंतर शांति दांत्यादि करूनि ॥ साधनसंपन्न होऊनि ॥ श्रीगुरुचरणीं ॥ साष्टांगी ते ॥१॥ गुरुशासनीय वर शिष्यें॥शुभकाळ देश ॥ परिक्षूनि विशेष ॥ शिष्य व्हावया ॥२॥ वरि आचार्य सांप्रदाय सिद्ध ॥ सकळ सद्गुणयुक्त विबुध ॥ तया श्रीगुरूचे पाद ॥ सन्निधीं जाऊनि ॥३॥ मग तया श्रीगुरुचिया ॥ अनुमतें करूनिया ॥ शिवलिंग पूजावया ॥ तत्परायण झाला ॥४॥ कीर्तिमय जे चतुर्विध ऋत्विक्‌गण ॥ तया स्नान धवलांबर आभरण ॥ गंधपुष्पादिकें करून ॥ आ-

---

(२) विशेष वीरशैव, निराभारि वीरशैव असे तीन भेद होत. यांमध्यें (३) श्रीगुरूच्या हस्ताचा संयोग निजमस्तकाला करून लावून घेतलेल्या विभूतिपट्टाच्या योगानें, शिवमंत्रोपदेशाच्या योगानें लिंगांगसंगीं होऊन (४) हस्त, मस्तक, कंठ, कक्ष, वक्षस्थल वगैरे स्थानांवर शिवलिंग धारण करून (५) एक वेळ किंवा त्रिकाल लिंगार्चनासक्त होऊन (६) गुरु, लिंग, जंगम, भसित यांवर भक्ति ठेवून वागणारा तो सामान्य वीरशैव होय.

## दीक्षाक्रम.

(१) यानंतर शांति, दांति इत्यादि गुणांनीं साधनसंपन्न होऊन श्रीगुरुचरणीं साष्टांग नमस्कार करून (२) श्रीगुरूचें शासन पालन करावयाचें कर्तव्य असल्यामुळें शासनीय ह्मणवून घेणाऱ्या शिष्यानें शुभकाल देशाची परीक्षा करून शिष्य होण्याकरितां (३) आचार्य सांप्रदायसिद्ध सकल सद्गुणयुक्त होऊन श्रीगुरुजवळ शिष्यानें जावें. (४) नंतर श्रीगुरूच्या मतानें शिवपूजेंत तत्पर झालेले (५) कीर्तिसंपन्न असे चार ऋत्विज बोलावून त्यांना स्नान, धवल, वस्त्र, आभरण,

लंकृत ॥५॥ वरि तया गुरुआज्ञेवरून ॥ एकरात्रि क्षीराहारी असोन ॥ वरि प्रातः समयें करूनि ॥ दंतधावन ॥६॥ सारूनि मंगलस्नान ॥ करूनि धवलांबर परिधान ॥ भसितोध्दूलन ॥ अवधारून ॥७॥ त्रिपुंड्रधारण विस्तारूनि ॥ रुद्राक्षमालिका धरूनि ॥ भूषण करून ॥ सुवर्णअलंकार॥८॥ मग येऊनि आचार्याजवळिक॥ भयभक्ति अष्टमंत्रपूर्वक ॥ विनययुक्त भावें एक ॥ सुवर्णपुष्पादि ॥९॥ वित्तानुसार उपचार ॥ श्रीगुरूची सविस्तारें ॥ पूजा प्रेम प्रीतिभरें ॥ करूनिया॥१०॥ वरि गंधपुष्पादिकें ऋत्विज पुजूनि ॥ मग श्रीगुरुमुखें करूनि ॥ शिवमहेश्वर वंदनें समर्पूनि ॥ विभूतिविडा ॥११॥ आणिक खननदहन॥ शोधनसंप्रोक्षण ॥ मर्दनलेपन ॥ ह्मणिजे षट्कमैं ॥१२॥ सारणि कारणी ताटतोरण ॥ कुसुमपल्लव तोरण ॥ नानापुष्पसर करणें ॥ कदळीस्तंभ ॥१३॥ फलावळी दीक्षामंडप उभारूनि ॥ धूपधूम्र समर्पूनि ॥ परिशोभन करूनि ॥ त्या मनोहर मंडपांत॥१४॥गोचर्म मात्रभू चौक सविस्तार॥ भरूनि गोरोचन गोमय गोमूत्र गोघृत गोक्षीर ॥ गोदधि ह्मणिजे षट्प्रकार ॥ संमार्जना करूनि ॥१५॥ तया चौकामध्यें प्रवाळ मौक्तिक ॥ शुभ्रपाषाण सुवर्ण श्वेताभ्रक ॥ तंडुलादि चूर्णपूर्वक ॥ अष्टदळ कम-

---

गंध पुष्प इत्यादिकांनीं अलंकृत करावें. (६) नंतर गुरूच्या आज्ञेनें आपण त्या रात्रीं क्षीराहार करून नंतर प्रभातकालीं उठून दंतधावन करून (७) मंगलस्नान करून स्वच्छ पांढरें वस्त्र नेसून भसितोध्दूलन करून (८) त्रिपुंड्र धारण करून रुद्राक्षमाला धारण करून सुवर्णालंकार घालावेत. (९) नंतर आचार्याजवळ येऊन भयभक्ति बाळगून अष्टमंत्रपूर्वक विनययुक्त होऊन सुवर्णपुष्पादिकांनीं(१०) ऋत्विजांचें सेवन करून द्रव्यानुसार गुरुपूजा करून (११) पुनः गंधपुष्पादिकांनीं ऋत्विजांची सेवा करावी. नंतर गुरूच्या आज्ञेनें शिवमाहेश्वरांना वंदन करून विभूति विडा समर्पण करावा. (१२) नंतर खनन, दहन, शोधन, संप्रोक्षण मर्दन, अनुलेपन अशीं षट्कर्मैं (१३) व सारवणें, कारण, ताटतोरण, कुसुमपल्लव तोरण, नानाविध पुष्पांच्या माळा कदलीस्तंभ ( केळीचे खांब ) (१४) फलावलि धूप धूम्र इत्यादिकांनीं सुशोभित केलेल्या मनोहर मंडपांत (१५) गोचर्ममात्र चौकोन जमिनीवर गोरोचन, गोमय, गोमूत्र, गोदधि, गोघृत, गोक्षीर इत्यादिकांनीं षट्संमार्जन करावें. (१६) नंतर चौकामध्यें प्रवाळ, मौक्तिक, पांढरा दगड, सुवर्ण, श्वेताभ्रक, तंडुल, इत्यादिकांच्या चूर्णानें अष्टदल कमल लि-

ळ रचूनी ॥१६॥ तयासि आवरण शंखचक्र ॥ शूळ डमरु परशु घंटा छत्र ॥ चामर वृषभचरणादि विचित्र ॥ वर्णें भरिजे ॥ १७ ॥ तयावरि तीळ ॥ जिरे गोधुम तंडुळ ॥ माषादि पंच धान्यानें तंडुलें ॥ मात्र आ- णूनी ॥१८॥ बत्तीस अंगुळ प्रमाण ॥ चतुरस्त्र समान ॥ मागें पसरूनि॥ तयावरी ॥१९॥ आचार्यें स्थापून तीर्थांबुपूर्ण ॥ पंच कलशांसि भिन्न भिन्न ॥ वस्त्रादिकें नूतन ॥ वेष्टुनिया ॥२०॥ तीर्थांबू भरूनि पूर्ण ॥ सु- वर्णादि नूतन ॥ पंच कलश पूर्वदक्षिण ॥ पश्चिमोत्तर मध्यें क्रमें ॥२१॥ नूतन पंच तंतू करूनि ॥ कुशळ परि वेष्टुनी ॥ तयांत घालुनी ॥ सुव- र्णादिक ॥२२॥ आणिक चूतपल्लव तोमर ॥ पूग पुष्प दूर्वांकुर ॥ नाग- वल्ली दळें सविस्तार ॥ आलंकारूनि ॥२३॥ वरि पूर्वादि दिशा पंचक ॥ संस्थापित कलशादिक ॥ त्याचेठायीं विशेष ॥ अनुक्रमें ॥२४॥ स- द्योजात वामदेव ॥ अघोर तत्पुरुष ॥ ईशान्यादि पंच ब्रह्मात्मक ॥ ह्म- णोनि ऐसें पूर्वक ॥ परिभाऊनि ॥२५॥ त्या कलशांत परशिव भजोनि ॥ वरि अग्रासनीं पूर्वाभिमुख होऊनि ॥ परम शिवरूप आसनीं ॥ बै- सला आचार्य ॥२६॥ मध्यकलश एक सोडूनि ॥ वरि पूर्वादि करूनि॥ चतुर्थ कलशस्थानीं ॥ अनुक्रमें ॥२७॥ रेवणसिद्ध मरुळसिद्ध ॥ ए-

---

हावें. (१७) आणि शंख, चक्र, शूल, डमरु, परशु, घंटा, छत्र, चामर, वृषभ व- गैरे चित्रें काढावींत. (१८) नंतर तीळ, जिरे, गहूं, तांदूळ, उडीद हीं धान्यें किंवा नुसते तांदूळ घेऊन (१९) बत्तीस अंगुलापर्यंत चारी दिशेला चौकोन प- सरून त्यावर (२०–२१) तीर्थोदकानें भरलेले सुवर्णादिकांचे नवीन पांच क- लश पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर मध्य या क्रमानें आचार्यांनें स्थापावेत. नंतर कलशावर निरनिराळ्या रीतीनें नूतन वस्त्रें गुंडाळावींत (२२) नंतर नूतन पंच- तंतूंनीं वेष्टन करावें. नंतर सुवर्णादि रत्नें त्यांमध्यें टाकावींत. (२३) नंतर आं- ब्याचीं पानें, दूर्वांकुर, सुपारीचीं फुलें, विड्याचीं पानें इत्यादिकांनीं ते कलश अलंकृत करावेत. (२४) नंतर पूर्वादि दिशांमध्यें स्थापिलेल्या पांच कलशांमध्यें अनुक्रमें (२५) सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष, ईशान हे पंचब्रह्म आहेत, अशी भावना करून (२६) त्या कलशांत परशिवाची भावना करावी. नंतर व- रच्या अग्रासनावर असलेल्या परशिवसंज्ञक पूर्वाभिमुख बसलेल्या अशा आचा- र्यांचा (२७) मध्य कलश तेवढा सोडून पूर्वादि क्रमानें स्थापिलेल्या बाकीच्या चार कलशांमध्यें अनुक्रमानें (२८) रेवणसिद्ध, मरुळसिद्ध, एकोराम, पण्डिता-

श्रीराम पंडिताराध्य ॥ आचार्य संप्रदायसिद्ध ॥ तया लागूनि ॥ २८ ॥ भिन्न भिन्न ॥ मठ पीठ आसन ॥ लक्षण लक्षित ॥ तया ऋत्विक गणासि ॥२९॥ बैसवूनि अर्घ्य गंधादिक ॥ पुष्प अक्षतांनीं विशेष ॥ श्रीमत्पंचाक्षरीपूर्वक ॥ भजोनिया ॥३०॥ यानंतर देह अर्थ प्राण ॥ श्रीगुरूसि करूनि समर्पण ॥ साष्टांग प्रणित होऊन ॥ शिष्यगुरूचेनि आज्ञें ॥३१॥ होऊनि उत्तराभिमुख ॥ श्रीगुरूचे दक्षिणभागे चौक ॥ संनिधि स्वस्तिक ॥ मंडळावरि ॥३२॥ सरळ शरीरी होऊनि ॥ नासाग्रीं ध्यान धरूनि ॥ करकमळ जोडूनि ॥ पद्मासनीं ॥३३॥ शिवमंत्र उच्चारण ॥ शिवध्यान धारण ॥ लक्षणयुक्त होऊन ॥ बैसला तो शिष्य ॥३४॥ मग तया श्रीगुरूनें॥ आपुलेंनि करणें ॥ कृपामय दृष्टीनें॥ अवलोकिलें॥३५॥ वरि सकळ महेश्वरांनीं ॥ आशीर्वाद करून ॥ मंगल वाद्य ध्वनी ॥ होत असतां करि ॥३६॥ वीरमाहेश्वरमंत्र भद्रसूक्तासह आचार्यासि मुख्य ॥ ऋत्विक गणीं कलशादिक ॥ आपापुले पृथक् ॥ अनुक्रमें उचलूनि ॥३७॥ दूर्वांकुर दर्भांकुराम्रपल्लवविल्वगुच्छें करून ॥ देवस्यत्वा निधनपतये शांतापृथिवी इमं मे गंगे मंत्रेंकरून ॥ आणिक पंचब्रह्मरुद्रसूक्त ब्रह्मशांति मंत्रेकरून ॥ आणिक पंचाक्षरी कलशाभिषेक मंत्रांनीं

---

राध्य या आचार्यांच्या सांप्रदायानें सिद्ध असलेले (२९) व निरनिराळे मठ, पीठ, आसन इत्यादि लक्षणांनीं युक्त असलेले त्या त्या ऋत्विजांची पूजा (३०) अर्घ्य, गंध, पुष्प इत्यादिकांनीं श्रीमत्पंचाक्षरमन्त्रपूर्वक करावी. (३१) नंतर तनु, मन, धन श्रीगुरूस समर्पण करून साष्टांग नमस्कार करावा. नंतर श्रीगुरूच्या आज्ञेनें (३२) उत्तराभिमुख होऊन श्रीगुरूच्या दक्षिणभागीं असलेल्या चौकाजवळ असलेल्या स्वस्तिक मण्डलावर (३३) पद्मासन घालून बसावें. सरळ शरीर ठेवून नाकाच्या अग्रावर दृष्टी ठेवून हात जोडून (३४) शिवमंत्रोच्चारण, शिवध्यान धारणा वगैरे करावींत. अशा रीतीनें बसलेल्या शिष्याकडे (३५) श्रीगुरूनें कृपादृष्टीनें पाहावें. (३६) नंतर सर्व माहेश्वरांनीं त्या शिष्याला आशीर्वाद द्यावा. त्या वेळेस मंगलवाद्यें वाजववयास सांगावें. (३७) व वीरमाहेश्वरांनीं मंत्रभद्र सूक्त ह्मणावें. नंतर आचार्यानें ऋत्विक्गणास आपापला कलश उचलावयास सांगावें. व आपणही आपला कलश उचलावा. (३८) नंतर. " देवस्यत्वा, निधनपतये, शांता पृथिवी, इमं मे गंगे, पंचब्रह्म, रुद्रसूक्त, ब्रह्मशांति, पंचाक्षर, कलशाभिषेक ह्या मंत्रांचा उच्चार करीत दूर्वांकुर, दर्भांकुर, आम्रपल्लव, बिल्वगच्छ यांनीं

॥३८॥ वरि तें कलशोदक ॥ गुरु आदि आचार्य चतुष्क ॥ सकळांनीं शिष्याचे मस्तक ॥ स्थानीं संप्रोक्षून ॥३९॥ शांभवव्रत पट्टाभिषेक करून ॥ उपरि मागुतेनि स्थानीं स्थानीं ॥ कलश स्थापूनि ॥ प्रथम ऐसें ॥४०॥ पुनः त्याचि क्रमें उचलूनि ॥ सकलशोदक दूर्वांकुरें करूनि ॥ प्रथम ऐसें शिंपोनि ॥ शिष्याचे मस्तकीं ॥४१॥ ऐसें तीन वेळ अघमर्षण ॥ पट्टाभिषेक करूनिया स्नान ॥ तया श्रीगुरूनें आपण ॥ तया शिष्याचे ॥४२॥ ललाटादि स्थानस्थानीं ॥ जपसिद्धश्रीमत्पंचाक्षरी महामंत्रानें शिवमंत्रें अभिमंत्रोनि ॥ श्रीमद्विभूति त्रिपुंड्र धारण धरूनि ॥ विधि दुर्लिखित परिहारिलें ॥४३॥ कायाशुद्धि आत्मशुद्धि करूनि॥ कलान्यास मंत्रन्यासादि विस्तारूनि ॥ आणवादि मलत्रय निरसूनि॥ निष्कल शुद्धात्मा केला ॥४४॥ वरि तो श्रीगुरुनाथ ॥ आपुला दक्षिण हस्त ॥ गंधपुष्प अक्षतासहित ॥ शिवमंत्रें अर्चूनि ॥४५॥ तेजोमय शिवहस्तक ॥ तया शिष्याचे मस्तक ॥ स्थानीं मूळमंत्रोच्चारपूर्वक॥ न्यस्त करूनि ॥४६॥ शिष्याचे मस्तकीं अधिष्ठेयस्वरूप ॥ क्रियाशक्त्यात्मक ॥ बिंदु ह्मणिजे पीठयुक्तपूर्वक ॥ लिंगलक्षण ॥ ४७ ॥ चिच्छक्ति ह्मणिजे कारण ॥ युक्त अधिष्ठातृ आपण ॥ तो परशिव आव्हानून ॥

(३९) गुर्वादि पंच आचार्यांनीं शिष्याच्या मस्तकावर कलशोदक संप्रोक्षण करावें (४०) नंतर शांभवव्रतपट्टाभिषेक करून पुनः ते कलश त्या त्या जागीं ठेवावेत. (४१) पुनः त्याच क्रमानें कलश उचलून दूर्वांकुरादिकांनीं कलशोदक घेऊन पहिल्याप्रमाणेंच शिष्यमस्तकावर प्रोक्षण करावें. (४२) याप्रमाणें तीन वेळ श्रीगुरूनें शिष्यास अघमर्षण स्नान घालावें. व पट्टाभिषेक करावा नंतर शिष्याच्या (४३) ललाटादि स्थानांवर जपसिद्धश्रीमत्पंचाक्षरी शिवमंत्रानें अभिमंत्रित विभूति तिर्यक्त्रिपुण्ड्राकार लावावी. या विभूतीच्या योगानें विधिदुर्लिखित पुसून जातें. (४४) नंतर गुरूनें शिष्याची कायशुद्धि, आत्मशुद्धि करावी. कलान्यास मंत्रन्यास करून आणवादि मलत्रय काढून लोकवासना दूर करून निष्कल शुद्धात्मा करावा. (४५) नंतर गुरूनें आपल्या उजव्या हातावर गंध, पुष्प, अक्षता वगैरे घालून त्याची पूजा शिवमंत्रपूर्वक करावी. (४६) नंतर तो तेजोमय शिवहस्त शिष्याच्या मस्तकावर मूलमंत्राचा उच्चार करीत ठेवावा. (४७) नंतर शिष्य मस्तकावरच अधिष्ठेय अशा क्रियाशक्त्यात्मक बिंदुरूप पीठासह लिंगलक्षण (४८) चिच्छक्तिरूप कारणयुक्त अधिष्ठाता अशा परशिवाचें आव्हान करावें.

संयोग करावा ॥४८॥ लिंगप्रतिष्ठायुक्त ॥ करूनि वरि पूर्वोक्त ॥ मानसपूजा यथार्थ ॥ विस्तारावी ॥४९॥ उपरि आचार्योस दोन्ही॥ आपुले करसंपुट जोडूनि ॥ शिष्याशीं सदा असावें संयोगें करूनि ॥ ऐसें आचार्यें ईश्वराशीं वदावें ॥५०॥ ईश्वरा करूं नये भिन्न ॥ कदा न ठेविजे अन्योन्य ॥ भावें राहिजे ह्मणोनि जें निरूपण ॥ तें वेधादीक्षा ह्मणवी ॥५१॥ आणिक प्रणवपंचाक्षरी ॥ मंत्र तया शिष्याचे श्रवणाभीतरीं ॥ संज्ञामात्रें उच्चारूनि वरि ॥ तया मंत्राचे ॥५२॥ ऋषिछंद आदि देवता अंगादिक ॥ सकळ विचारपूर्वक ॥ निरूपण सांगिक ॥ तें मंत्रदीक्षा ह्मणवी ॥५३॥

## क्रियादीक्षा.

आणिक मंत्रानुसंधानपूर्वक ॥ होऊनि असे तया शिष्याचे मस्तक॥ स्थानीं ज्ञानक्रियात्मक ॥ शिवलिंग ॥ १ ॥ तें श्रीगुरुनाथें ॥ आपुल्या भावें मनोदृष्टीतें ॥ यथाक्रमें निरुतें ॥ आकर्षूनि ॥२॥ दृष्टिगोचरासि पूर्वक ॥ आणिलें तें स्फटिक ॥ सुवर्ण शिळा रत्नादि मुख्य ॥ लिंगाचे ठायीं ॥३॥ लिंगाधिक्य रूप ॥ झालें तरी मृत्यु समीप ॥ शक्त्याधिक्य स्वरूप ॥ तरी दरिद्रता ॥४॥ लिंगशक्ति समानत्व ॥ भोग मोक्ष-

---

(४९) नंतर तेथेंच लिंगप्रतिष्ठा करून मानसपूजा करावी. (५०) नंतर आचार्यांस शिष्यानें हात जोडावा.नंतर आचार्यांनें प्रार्थना करावी कीं, हे ईश्वरा आपण येथेंच शिष्यसंनिहित होऊन रहा अशी प्रार्थना करावी. (५१)आणि ईश्वराशीं भिन्न रीतीनें कधींही राहूं नये सामरस्यानें राहावें अशा रीतीनें शिष्याच्या मस्तकावर हात ठेवून समजावून देण्यांत येणारी जी दीक्षा तिला वेधादीक्षा असें ह्मणतात. (५२) प्रणवपंचाक्षरीमंत्राचा उच्चार शिष्याच्या उजव्या कानांत करावा नंतर त्या मंत्राचा (५३) ऋषि, छंदस देवता, अंग वगैरे सर्व विचारपूर्वक शिष्याला समजावून देणें याला मांत्रीदीक्षा ह्मणतात.

## क्रियादीक्षा.

(१) नंतर मंत्रानुसंधानानें शुद्ध झालेल्या शिष्याच्या मस्तकांत असलेल्या ज्ञानक्रियात्मक शिवलिंगाला (२) श्रीगुरूनें आपल्या भावमनोदृष्टीकडे यथाक्रमानें आकर्षून घ्यावें. (३) नंतर तशा तऱ्हेच्या त्या दृष्टीनें स्फटिक, सुवर्ण, शिला, रत्न यांच्या केलेल्या लिंगाकडे पहावें. (४) लिंगाधिक्य झालें तर मरण येतें असें समजावें. शक्ति अधिक झाली तर दारिद्र्य येतें. (५) लिंगशक्ति समान असल्यास

त्व ॥ लाभे ह्मणोनि शुद्धत्व ॥ जाणावें लिंगाचे ठायीं ॥५॥ लिंगाचें वृत्त प्रदक्षिणाकार ॥ जंव तें नेमूनिया सूत्र ॥ तें सूत्र गोमुखाचें अग्र ॥ लिंगाचें मस्तक ॥६॥ पर्यंत नेमिता ॥ असली जरी समता ॥ तरी मागुतेनी तथा ॥ क्रमें सूत्रें ॥७॥ शक्ति अधः पीठ उभारुनी ॥ ऊर्ध्व अधः पीठ लिंगाचें मस्तक नेमूनि ॥ वरि सूत्रार्ध गोमुख प्रमाणूनि ॥ समान झालें तरी ॥८॥ तें पंच सूत्रात्मक ॥ कांतिमय जाति शिळादिक ॥ पीठलिंगांत ह्मणवी मुख्य ॥ तें लिंगस्थळ ॥ ९ ॥ तीर्थांबु पंचगव्य भसित ॥ करूनिया मिश्रित ॥ उदकें पूर्ण भरित ॥ त्रय कुम्भ भरूनि ॥१०॥ प्रत्येक एकएक रात्रि ॥ लिंग ठेवावें त्रिविध कुम्भाभीतरीं ॥ अष्टोत्तर शत जपोनि पंचाक्षरी ॥ वरि अभिमंत्रण करावें ॥ ११ ॥ वरि चौथे रात्रीं पंचकलश स्थापूनि ॥ तयाचे उत्तरदिशेसि धरणी ॥ परिशुद्धि करूनि ॥ अष्टदळ कमळ रचावें ॥१२॥ आणि सप्तहस्त सूक्ष्मवस्त्र आणूनि ॥ तया कमळावरी हस्त एक विस्तारूनि ॥ तयावरि श्यामाक पसरूनि ॥ ठेवावें जाणिजे ॥ १३ ॥ वरि अष्टदल पद्म लिहोनि ॥ वरि वस्त्र विस्तारूनि ॥ तयावरि पसरूनि ॥ तिळ समान ॥१४॥ वरि

---

भोगमोक्ष मिळतात, याप्रमाणें लिंगाचे ठिकाणीं शुद्धत्व जाणावें. (६–७–८) लिंगपिंडीचा सुतानें घेर मोजून त्या सूत्राच्या लांबी इतकेंच लिंगमस्तकापासून गोमुखापर्यंत अंतर असावें. व लिंगमस्तकापासून पीठाच्या मध्यापर्यंतचेंहि अंतर लिंगपिंडीच्या वर्तुलाएवढेंच असावें, तशीच गोमुखाची लांबी पिंडीच्या अर्ध वर्तुलाएवढी ठेवावी. व पीठाच्या अग्रापासून तलापर्यंतची लांबी पिंडीच्या वर्तुलाइतकीच असावी. असा मोजमाप बरोबर झाला असतां त्याला पंचसूत्रात्मकलिंग ह्मणतात. (९) अशा रीतीनें पंचसूत्रात्मक केलेल्या शिलादि अनेक लिंगांमध्यें जें लिंग तेजस्वी असेल तें लिंग घेऊन (१०) तीर्थोदक, पंचगव्य, भस्म, मंत्रोदक यांनीं पुनीत झालेल्या त्रिविध कुंभांमध्यें (११) एकेक रात्रपर्यंत ठेवून प्रत्येक कलशांत लिंग असतांना अष्टोत्तरशत जप पंचाक्षरमंत्राचा करावा. याप्रमाणें अभिमंत्रण करून (१२) चौथ्या रात्रीं त्या पंचकलशस्थानाच्या उत्तरेकडे असलेली जमीन सारवून शुद्ध करावी. नंतर अष्टदळ कमळ लिहून (१३) सात हातपर्यंत लांबीचें वस्त्र आणावें. तें वस्त्र हातभर त्यावर पसरून त्याच्यावर एक अंगुलप्रमाण साव्याचें धान्य पसरावें. (१४) त्यावर अष्टदळ कमळ लिहून त्यावर पुनः हातभर तेंच वस्त्र झांकावें. नंतर त्यावर तीळ एक अंगुलप्रमाण पसरावेत. (१५) त्या-

अष्टदल वारिज निर्मूनि ॥ वरि वस्त्र आच्छादूनि ॥ तयावरि पसरूनि ॥ गोधूम पूर्ण ॥१५॥ वरि अष्टदळ कमळ रचूनि ॥ वरि वस्त्र विस्तारूनि ॥ तयावरि व्रीहि पसरूनि ॥ एक अंगुल प्रमाण ॥१६॥ वरि अष्टदळ कमळ लिहूनि ॥ वरि वस्त्र आच्छादूनि ॥ त्यावरि तंडुल पसरूनि ॥ अष्टदळ कमळ लिहूनि ॥ १७ ॥ वरि वस्त्र आच्छादून तयावरि चूत विल्वादिक ॥ अपामार्ग आमलक ॥ कुश पंचपत्र विशेष विस्तारिजे ॥१८॥ वरि पसरूनिया वस्त्र ॥ ऐसें सप्त आंतर ॥ पूर्वक आधार ॥ परि कल्पिजे ॥१९॥ तरी तयावरि लिंगस्थापना करूनि ॥ गोमुख उत्तरमुखें ठेऊनि ॥ स क्रियेनें संस्कारूनि ॥ वरि यानंतर ॥२०॥ प्राणायाम करूनि सहस्र ॥ एक पूर्वक मूळमंत्र ॥ करूनि उच्चार ॥ वरि त्या लिंगस्थळासि ॥२१॥ मातृकान्यास ॥ कलान्यास ॥ मंत्रन्यास विधीनें विशेष ॥ प्राणप्रतिष्ठा करावी ॥ २२ ॥ वरि कलशोदकें करून ॥ करावें जलस्नान ॥ वरि अष्ट विधार्चन ॥ समर्पावें ॥ २३ ॥ या प्रकारें शुद्धमय ॥ झालिया लिंगासि आचार्य ॥ वामकरीं आपुलिये ॥ घेऊनिया ॥२४॥ उपरि पूर्वोक्त ॥ अनुक्रम सृष्टिस्थित्यादि दृष्टिस्थित ॥ शिवकळा प्रतिष्ठित ॥ करूनि निकी ॥२५॥ वरि तया शिष्या लागूनि ॥ अयं मे हस्तो भगवान् ह्मणोनि ॥ श्रुतिसिद्ध वचनीं ॥ वामकर स्थळांत

---

वर अष्टदळ कमळ लिहून वस्त्राचें आच्छादन करावें. नंतर त्यावर गहूं पसरावेत. (१६) त्यावर अष्टदळ कमळ लिहून वस्त्राचें आच्छादन घालावें. त्यावर व्रीहि पसरावेत. (१७) त्यावर अष्टदळ कमळ लिहून वस्त्र अंथरावें. त्यावर तांदूळ पसरून त्यावर अष्टदळ कमळ लिहून (१८) त्यावर वस्त्र अंथरावें. त्यावर आंबा, बिल्व, अघाडा, आंवळा, कुश असे पंचपत्र विशेष घालावेत. (१९) नंतर त्यावर वस्त्र अंथरावें. याप्रमाणें सप्त अंतराची कल्पना करावी. (२०) तें लिंगस्थळ गोमुखाच्या उत्तर भागास स्थापना करून नंतर त्याचा संस्कार करावा. नंतर (२१) प्राणायाम करून एक सहस्र जप मूलमंत्राचा करावा. नंतर त्या लिंगस्थळास (२२) मातृकान्यास, कलान्यास, मंत्रन्यास वगैरे न्यासादिकांनीं प्राणप्रतिष्ठा करावी. (२३) नंतर कलशोदकानें स्नान घालून अष्टविधार्चन समर्पण करावें. (२४) याप्रमाणें परिशुद्ध झालेलें लिंग आचार्यानें आपल्या डाव्या हातांत घेऊन त्या पूर्वक्रमानें (२५) सृष्टिस्थित्यादि दृष्टिस्थित शिवकलेची प्रतिष्ठा करावी. (२६) नंतर अयं मे

॥२६॥ गोमुख वामभाग ॥ करूनि शिवलिंग ॥ स्थापूनि करणें संयोग ॥ क्रियादीक्षा ह्मणवी ॥२७॥

## सप्तविधदीक्षा.

आणिक तो श्रीगुरुनाथ ॥ स्वशिष्यासि वैसवूनि समीपस्थ ॥ अरे पुत्रा तुझें प्राणलिंग सत्य ॥ हेंचि आपण ॥१॥ तत्वातीत परवस्तु समान ॥ हरि ब्रह्मादिकांलागून ॥ अभेद्य निजतत्वघन ॥ तें हेंचि आपण ॥२॥ तुझिया सोहंभावनेंत ॥ स्वरूपबिंब प्रकाशत ॥ तें हेंचि जाण ॥ निःसंदेहें ॥३॥ तें तुवां निमिषार्धं कदाचित ॥ तुझीया शरीरा पासाव निश्चित ॥ वियोग नव्हे तैसें अखंडित ॥ सावधान धरावें ॥ ४ ॥ त्रिकाल अर्चन ॥ न चुके तैसें कीजे निपुण ॥ लिंगार्पित विलक्षण ॥ एक ही न स्वीकारी ॥५॥ भोगादिक समस्त ॥ वर मोक्षासहित ॥ तुज वंदीजन सत्य ॥ ह्मणोनि विश्वासावें ॥६॥ सकल क्लेश त्यजूनि ॥ नित्य सुखी होऊनि ॥ सत्य हेंचि ह्मणोनि ॥ दृढ धरावें ॥७॥ इति सकलादि शैवस्तोम ॥ क्रियेंत उपदेशिला उत्तम ॥ हा वीरशैव दीक्षाक्रम ॥ ह्मणोनि जाणावें ॥८॥ आणिक आज्ञादीक्षा ॥ उपमादीक्षा ॥ स्वस्तिकारोहण कलशाभिषेक ॥ विभूतिपट्ट ॥९॥ लिंगायत ॥ लिंगस्वायत

---

हस्तो भगवान् या श्रुतीनें त्या शिष्याच्या सिद्ध अशा वामहस्तपीठावर (२७) गोमुख वामभागीं करून शिवलिंग द्यावें. याला क्रियादीक्षा ह्मणतात.

## सप्तविधदीक्षा.

(१) नंतर आचार्यांनें शिष्यास बोलावून सांगावें कीं, हे पुत्रा, हें प्राणलिंग तुझें आहे. हेंच (२) तत्वातीत परवस्तु होय. हरिब्रह्मास न कळलेलें तत्व हेंच होय. अभेद्य निजतत्व हेंच होय. (३) सोहंभावनेमध्यें चमकणारें स्वरूपबिंब हेंच होय. (४) असें हें प्राणलिंग निमिषार्धं देखील तुझ्या शरीरापासून वियुक्त करूं नकोस. तसें सावधानपणें अखंड धारण कर. (५) न चुकतां याची त्रिकालीं पूजा कर, लिंगार्पित नसलेली कोणतीही वस्तु घेऊं नको. (६) सकल भोगमोक्ष तुझ्या हातांतच आहेत असें समज. (७) कोणतींही दुःखें मनांत आणूं नको सुखी होऊन राहा. नित्य हेंच असें समजून दृढपणें धारण कर. (८) शिवक्रियासह उपदेश करून शिष्यावर अनुग्रह करावयाची वीरशैवदीक्षा हीच होय. (९) यानंतर आज्ञादीक्षा, उपमादीक्षा, स्वस्तिकारोहण, कलशाभिषेक, विभूतिपट्ट, (१०) लिंगा-

॥ ह्मणिजे सप्त ॥ विध होऊनि असे ॥१०॥ त्याचे ठायीं ॥ श्रीगुरु तो आपण ॥ आपुली आज्ञा शिष्यालागून ॥ करी प्रतिपादन ॥ ते आज्ञा-दीक्षा ह्मणवी ॥११॥ पुरातनाचेनि अनुमतें ॥ समयाचार सन्मतें ॥ स-दृश होऊनि करणें तें ॥ उपमादीक्षा ह्मणवी ॥१२॥ स्वस्तिका ह्मणिजे मण्डळावरी ॥ शिष्य वैसवूनि उपरी ॥ मंत्रन्यासादिकें करणें मंत्र शा-रीरीं ॥ तें स्वस्तिकारोहण ह्मणवी ॥१३॥ पंचकलशोदकें करून ॥ त-या शिष्या लागून ॥ करविजे स्नान ॥ तो कलशाभिषेक ह्मणवी ॥१४॥ आगमोक्त स्थान स्थान ॥ ते ते मंत्र उच्चारून ॥ करणें विभूतिधारण ॥ तें विभूतिपट्ट ह्मणवी ॥१५॥ आचार्यानें आपण शिष्यातें ॥ द्यावया योग्य शिवलिंगातें॥ अर्चुनि शिष्यासि दाखविणें ॥ तें लिंगायत ह्मणवी ॥१६॥ तया श्रीगुरुनाथानें ॥ दिधलें लिंग तें शिष्य सावधानें ॥ उत्त-मांगादिस्थानीं धरणें ॥ तें लिंगस्वायत ह्मणवी ॥१७॥ इति शास्त्रो-क्तक्रमानें ॥ सांगिक शिवदीक्षा विधानें ॥ लिंगांगसंबंधी झाला आप-णे ॥ विशेष वीरशैव॥१८॥ तो शिवलिंगपूजा करी ॥ तें कैसें ह्मणतिलें तरी ॥ सांगिजेल परी ॥ क्रमेंकरून ॥१९॥

---

यत, लिंगस्वायत अशा या सप्तविध दीक्षा होत. (११) यांमध्यें गुरूची जी आज्ञा असेल ती आज्ञा शिष्यानें पाळिली असतां तिला आज्ञादीक्षा असें ह्मणतात.(१२) पुरातनांच्या समयाचाराप्रमाणें वागणें याला उपमादीक्षा ह्मणतात. (१३) स्वस्ति-कमंडलावर शिष्याला बसवून मंत्रन्यास वगैरे करणें याला स्वस्तिकारोहणदीक्षा असें ह्मणतात. (१४) पंचकलशोदकानें शिष्यास अभिषेक घालणें याला कलशाभिषेक-दीक्षा ह्मणतात. (१५) आगमोक्तस्थानांमध्यें त्या त्या मंत्रांनीं विभूतिधारण करणें याला विभूतिपट्ट ह्मणतात. (१६) आचार्यानें शिष्यास द्यावयाच्या लिंगाची पूजा करावी. नंतर त्या लिंगाकडे शिष्याला पाहावयास सांगावें याला लिंगायतदीक्षा ह्म-णतात. (१७) तेंच लिंग मस्तक वगैरे स्थानांवर धारण करणें याला लिंगस्वायत-दीक्षा ह्मणतात. (१८) याप्रमाणें शास्त्रोक्तक्रमानें सांगशिवदीक्षेनें लिंगांगसामरस्य करणारा तो विशेषवीरशैव होय. (१९) असा हा वीरशैव शिवलिंगपूजा कशी क-रतो त्याचा प्रकार क्रमानें सांगतात.

## वीरशैवशिवपूजाकर्मानुष्ठान.

जगच्छ्रेष्ठवीरशैवगुरु जे विधि आचरती ॥ तेचि आपण इतर करिती ॥ ह्मणोनि जगासीं हितोपदेशाप्रति ॥ फळावया निमित्त ॥१॥ आपण असे कृतार्थ नित्य निर्मळ ॥ वीरशैव सत्सांप्रदाय सकळ सर्व ॥ परि मन्त्रन्यासादि केवळ ॥ करी सांगिक शिवलिंगार्चन ॥ २ ॥ लिंगार्चनविधि ॥ त्याचे ठायीं ॥ ॐ हः अनंतशक्तिधाम्ने ज्योतीरूपाय शिवास्त्राय फट् ॥ ह्मणोनिया मन्त्रे मनःशुद्धि कीजे ॥ आणिक ॐ आपोवा इद ९ सर्वं विश्वाभूतान्यापः प्राणा वा आपः पशव आपोऽन्नमापोऽमृतमापः संम्राडापो विराडापः स्वराडापः छंदा ९स्यापो ज्योति ९ ष्यापो यजू ९ ष्यापः सत्यमापः सर्वा देवता आपो ॐ भूर्भुवः सुवरापः ॐ आपः पुनंतु पृथिवीं ॥ हिरण्यवर्णाः शुचयः पावकाः ॥ या तीन मंत्रांनीं मन्त्रूनिया जीवन ॥ करचरण मुखसंप्रक्षालन ॥ करूनि वारि ॥३॥ सर्वज्ञाय नमः ह्मणोनि ॥ हा मंत्र उच्चारीत वदनीं ॥ पूजागृहस्थानीं ॥ प्रवेशावें ॥४॥ आणिक ॐ ऱ्हां पृथिव्यात्मने नमः या मंत्रानें पार्थिव देहगत गंधलिंग स्मरोनि ॥ निवृत्तिकलायै नमः ह्मणोनि या मन्त्रें उत्तम संसारपाशनिवृत्त्यर्थ शरीर स्थानशुद्धि कीजे ॥५॥ वरि श्रियै नमः हा मन्त्रोच्चार

---

## वीरशैवशिवपूजाकर्मानुष्ठान.

(१) वीरशैवच जगांत श्रेष्ठ असल्यामुळें श्रेष्ठांच्या आचरणांवर इतरांचें आचरण अवलंबून असतें ह्मणूनच जगाच्या हिताकरितां व त्यास फल मिळविण्याकरितां (२) आपण जरी कृतार्थ व निर्मल आहे, तथापि लोकांच्या हातून आचरण जसें होईल त्याप्रमाणें आपलें आचरण वीरशैवसांप्रदायाला अनुसरून ठेवावें ह्मणजे मंत्रन्यास वगैरे करून नित्य शिवलिंगार्चन करावें. (३) पूजा करतांना प्रथम "ॐ हः अनंतशक्तिधाम्ने ज्योतीरूपाय शिवास्त्राय फट्" या मंत्रानें मनःशुद्धि करावी. नंतर "ॐ आपोवा इद ९ सर्वं" "आपः पुनंतु पृथिवीं" "हिरण्य वर्णाः शुचयः पावकाः" या तीन मंत्रांनीं करचरण प्रक्षालन, मुखप्रक्षालन करून (४) "सर्वज्ञाय नमः" या मंत्राचा उच्चार करीत पूजागृहांत प्रवेश करावा. (५) नंतर "ॐ ऱ्हां पृथिव्यात्मने नमः" या मंत्रानें पार्थिवदेहगत गंधलिंगस्मरण करावें. नंतर "निवृत्तिकलायै नमः" या मंत्रानें संसारांतील ताप दूर होतील. त्याप्रमाणें शरीर स्थानाची शुद्धि करावी. (६) नंतर "श्रियै नमः"

करूनि ॥ पूर्वोत्तर मुख होऊन ॥ शंभुलिंगाभिमुख सुखमुख होऊन ॥ सुखासनीं बैसावें ॥६॥

## वीरशैवभस्मधारण.

वरि ॐ ऱ्हीं ईशानाय नमः ह्मणोनि ॥ या मन्त्रें करूनि ॥ दक्षिणकराचेनि ॥ मध्यमांगुली ॥१॥ अनामिकांगुष्ठाचेनि ॥ त्रितीया संयोगें करूनि श्रीमद्विभूति आधारीतूंनि ॥ घेऊनिया ॥२॥ वरि वामहस्तांत ॥ अंगुष्ठादि अंगुलीनें यकारादि नकारांत ॥ पंचाक्षरी उच्चारूनि युक्त ॥ ते विभूति ठेवावी ॥३॥ यावरि ॐ ऱ्हां सदाशिवाय नमः ॥ पुनाति यज्जगत्सर्वं त्रिपुण्ड्रात्मा सदाशिवः ॥ ऐश्वर्यप्राप्तिबीजाय तस्मै श्रीभस्मने नमः ॥४॥ ह्मणोनिया मन्त्रेंकरूनिया ॥ नमस्कारूनिया ॥ भसितासि ॥५॥ वरि दक्षिणकरें आच्छादूनि ॥ दक्षिणमांडीवरी ठेवूनि ॥ ॐ नमःशिवाय ह्मणोनि ॥ या मन्त्रें मंत्रूनि एकादश वेळ ॥६॥ आणिक ॐ अग्निरितिभस्म वायुरितिभस्म जलमिति भस्म स्थलमिति भस्म व्योमेति भस्म सर्वं ँ हवा इदं भस्म मन एतानि चक्षूंँपि भस्म ॥७॥ इति ह्मणोनि ॥ कालाग्निरुद्रोपनिषत् या मन्त्रें करूनि ॥ अभिमन्त्रूनि मन्त्रोत्तरीं ॥८॥ आणि ॥ ॐ मानस्तोके तनये मान आयुषि मानो गोषु मानो अश्वेषु रीरिषः ॥ वीरान्मानो रुद्रभामितो वधीर्हविष्मन्तो नमसा विधेमते ॥ त्रियायुषं त्रियंबकं ह्या मन्त्रानें उ-

---

या मंत्राचा उच्चार करून पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख होऊन बसावें. शिवलिंगाभिमुख होऊन सुखासनावर बसून

## वीरशैव भस्मधारण.

(१–२) नंतर " ॐ ऱ्हीं ईशानाय नमः " या मंत्राचा उच्चार करून उजव्या हाताच्या मध्यमानामिकांगुष्ठांगुलींनीं आधारपात्रांतून विभूति काढून घ्यावी. (३) नंतर ती विभूति यकरादि नकारांत पंचाक्षरी मंत्राचा उच्चार करीत डाव्या हातांत ठेवावी. (४) नंतर "ॐ ऱ्हां सदाशिवाय नमः ॥ पुनाति यज्जगत्सर्वं त्रिपुण्ड्रात्मा सदाशिवः ॥ ऐश्वर्यप्राप्तिबीजाय तस्मै श्रीभस्मने नमः ॥ " (५) या मंत्रानें विभूतीला नमस्कार करावा. (६) नंतर त्यावर उजवा हात आच्छादून उजव्या मांडीवर ठेवून " ॐ नमः शिवाय " या मूलमंत्रानें अकरा वेळ अभिमंत्रण करावें. (७–८) " अग्निरिति भस्म " हें भस्म सूक्त किंवा कालाग्निरुद्रोपनिषत ॥ (९) मानस्तोके० ॥ त्रियायुषं० ॥ त्रियंबकं० ॥ या मंत्रांनीं भस्म

चलोनि ॥९॥ मग ते विभूति ओं न्हः यं ईशानाय नमः ॥ ह्मणोनि मस्तकीं ॥ ॐ न्हौं वां तत्पुरुषाय नमः ॥ ह्मणोनि मुखस्थानीं ॥ ओं न्हैं शिं अघोराय नमः ॥ ह्मणोनि हृदयस्थानीं ॥ ॐ न्हूं मं वामदेवाय नमः ॥ ह्मणोनि गुह्यस्थानीं ॐ न्हीं नं सद्योजाताय नमः ॥ ह्मणोनि पादस्थानीं ॥ ॐ न्हां ॐ सदाशिवाय नमः ॥ ह्मणोनि सर्वांगावरी संप्रोक्षावें ॥१०॥ इति भस्मस्नानं ॥ आणिक आचमन करूनि ॥ पुनः विभूति घेऊनि ॥ मूळमन्त्रें एकादश वेळां मंत्रूनि ॥ तया भासितानें ॥११॥ ॐ न्हः यं ईशानाय नमः ॥ ह्मणोनि पांच वेळां शिरसिं ॥ न्हौं वां तत्पुरुषाय नमः ॥ ह्मणोनि चार वेळां मुखीं ॥ ओं न्हैं शिं अघोराय नमः ॥ ह्मणोनि अष्टवेळां हृदयीं ॥ ॐ न्हूं मं वामदेवाय नमः ॥ ह्मणूनि त्रयोदशवेळां गुह्यप्रदेशीं ॥ ॐ न्हीं नं सद्योजाताय नमः ॥ ह्मणोनि अष्ट वेळां पादादि सर्वांग स्थानीं उध्दूलन करावें ॥१२॥ इति भस्मोध्दूलन ॥ आणिक भसित जलमिश्रित करूनि ॥ पूर्वोक्त मूर्ध्नललाटादि स्थानीं धरावया योग्य ॥१३॥ ॐ त्रियायुषं जमदग्नेः कश्यपस्य त्रियायुषं अगस्त्यस्य त्रियायुषं यद्देवानां त्रियायुषं तन्मे अस्तु त्रियायुषं ह्मणोनि त्रियायुषमंत्र ॥१४॥ ॐ त्रियंबकं यजामहे सुगंधिं पुष्टिवर्धनं ॥ उर्वारुकमिव बन्धनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ॥१५॥

---

घेऊन (१०) " ॐ न्हः यं ईशानाय नमः " या मंत्रानें शिरावर भस्म संप्रोक्षण करावें. " ॐ न्हौं वां तत्पुरुषाय नमः " या मंत्रानें मुखावर, " ॐ न्हैं शिं अघोराय नमः " या मंत्रानें हृदयावर, " ॐ न्हूं मं वामदेवाय नमः " या मंत्रानें गुह्यस्थानीं, " ॐ न्हीं नं सद्योजाताय नमः " या मंत्रानें पादावर, " ॐ न्हां ॐ सदाशिवाय नमः " या मंत्रानें सर्वांगावर भस्म संप्रोक्षण करावें. (११) याप्रमाणें भस्मस्नान करून आचमन करावें पुनः विभूति घेऊन मूलमंत्रानें अकरा वेळ अभिमंत्रण करून तें भस्म घेऊन (१२) " ॐ न्हः यं ईशानाय नमः " या मंत्रानें पांच वेळां शिरावर उध्दूलन करावें. " ॐ न्हौं वां तत्पुरुषाय नमः " या मंत्रानें चार वेळां मुखावर, " ॐ न्है शिं० अघोराय नमः " या मंत्रानें आठ वेळ हृदयावर, " ॐ न्हूं मं वामदेवाय नमः " या मंत्रानें तेरा वेळ गुह्यस्थानीं, " ॐ न्हीं नं सद्योजाताय नमः " या मंत्रानें आठ वेळ पायापासून सर्वांगावर उध्दूलन करावें. (१३–१४–१५–१६) पुनः तें भस्म जलमिश्रित क-

ह्मणोनि त्रियंबकं ॥ मंत्रोच्चारणपूर्वक ॥ विभूतिधारणादिक करावें य-थार्थ ॥१६॥

## वीरशैवकलान्यास.

आणिक ओं ईशानः सर्वविद्यानां पतिस्तस्मै शशिन्यै च नमः ॥ मूर्ध्नि ॥ ओं ईश्वरः सर्वभूतानां पतिस्तस्मै अंगदायै नमः ॥ पूर्वमूर्ध्नि ॥ ओं ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोऽधिपतिस्तस्मै ज्येष्ठायै च नमः ॥ दक्षिणमूर्ध्नि ॥ ओं ब्रह्मा शिवो मेअस्तु तस्मै मरीच्यै च नमः ॥ वामूर्ध्नि ॥ ओं सदाशिवों तस्मै ज्वलिन्यै च नमः ॥ पश्चिममूर्ध्नि ॥ ओं तत्पुरुषाय विद्महे तस्मै शांत्यै च नमः ॥ पूर्ववक्त्रे ॥ ओं महादेवाय धीमहि तस्मै विद्यायै च नमः ॥ दक्षिणवक्त्रे ॥ ओं तन्नो रुद्रः तस्मै प्रतिष्ठायै च नमः ॥ वामवक्त्रे ॥ ओं प्रचोदयात् तस्मै निवृत्यै च नमः॥ पश्चिमवक्त्रे ॥ ओं ईशानवक्त्राय नमः ऊर्ध्ववक्त्रे ॥ ओं अघोरेभ्यः तमस्यै नमः ॥ हृदये ॥ ओं अथ घोरेभ्यो मोहिन्यै नमः कण्ठे ॥ ओं

---

रून पूर्वोक्त मस्तक ललाटादि स्थानांवर " त्रियायुषं, त्रियंबकं " या मंत्रांनीं तिर्यक्त्रिपुण्ड्र धारण करावें.

## वीरशैवकलान्यास.

(१) " ॐ ईशानः सर्वविद्यानां, पतिस्तस्मै शशिन्यै च नमः " मस्तकावर न्यास करावा. " ईश्वरः सर्वभूतानां पतिस्तस्मै अंगदायै च नमः " या मन्त्रानें पूर्व मस्तकावर कलान्यास करावा. " ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोधिपतिस्तस्मै ज्येष्ठायै च नमः" या मंत्रानें दक्षिणमस्तकावर कलान्यास करावा, " ब्रह्माशिवोमे अस्तु०" तस्मै मरीचये च नमः या मंत्रानें डाव्या मस्तकावर न्यास करावा. " सदाशिवों तस्मै० " ज्वलिन्यै च नमः या मंत्रानें पश्चिममस्तकावर न्यास करावा. " ॐ तत्पुरुषाय विद्महे तस्मै शांत्यै च नमः " या मंत्रानें पूर्व मुखावर न्यास करावा. "ॐ महादेवाय धीमहि०" तस्मै विद्यायै च नमः यानें दक्षिणमुखावर न्यास करावा. "ॐ तन्नो रुद्रस्तस्मै प्रतिष्ठायै च नमः" या मंत्रानें वाममुखावर न्यास करावा. " ॐ प्रचोदयात्तस्मै० निवृत्यै च नमः " या मंत्रानें पश्चिम मुखावर न्यास करावा. " ॐ ईशानवक्त्राय नमः " या मंत्रानें ऊर्ध्व मुखावर न्यास करावा. " ॐ अघोरेभ्यस्तमस्यै नमः " या मंत्रानें हृदयावर न्यास करावा. " ओं अथ घोरेभ्यो मोहिन्यै नमः " या मंत्रानें कंठावर न्यास करावा. " ओं

घोर अक्षयायै नमः दक्षिणांसे ॥ ओँ घोरघोरतरेभ्यः कनिष्ठायै नमः वामांसे ॥ ओँ सर्वेभ्यः सर्वमृत्यवे नमः नाभौ ॥ ओँ सर्वशर्वेभ्यो मायायै नमः जठरे ॥ ओँ नमस्ते अस्तु रुद्र अभयायै नमः पृष्ठे ॥ ओँ रूपेभ्यः शिवेभ्यो ज्वरायै नमः वक्षसि ॥ ओँ वामदेवाय नमः रजायै नमः गुह्ये ॥ ओँ जेष्ठाय नमो रक्षायै नमः लिंगे ॥ ओँ श्रेष्ठाय नमो बीजिन्यै नमः मुष्के ॥ ओँ रुद्राय नमो रत्यै नमः ॥ दक्षिणोरसि ॥ कालाय नमः पाल्यायै नमः वामोरसि ॥ ओँ कलविकरणाय नमो बुध्द्यै नमः वामजंघे ॥ ओँ बलाय नमः कारयित्र्यै नमः दक्षिणजंघे ओँ बलप्रमथनाय नमो धात्र्यै नमः उरसि ॥ ओँ सर्वभूतदमनाय नमो ग्रामण्यै नमः दक्षिणपार्श्वे ॥ ओँ मनोन्मनाय नमस्तमोमोहायै नमः वामपार्श्वे ॥ ओँ सद्योजातं प्रपद्यामि सिध्द्यै नमः दक्षिणपादे ॥ ओँ सद्योजाताय वै नमो नमो बुध्द्यै नमः वाम-

---

घोर अक्षयायै नमः " या मंत्रानें दक्षिण स्कंधावर न्यास करावा. " ओँ घोरघोरतरेभ्यः कनिष्ठायै च नमः " या मंत्रानें डाव्या खांद्यावर न्यास करावा. " ओँ सर्वेभ्यः सर्वमृत्यवे नमः " नाभीवर न्यास करावा. " ओँ सर्वशर्वेभ्यः मायायै नमः " उदरावर न्यास करावा. " ओँ नमस्ते अस्तु रुद्र अभयायै नमः " या मंत्रानें पृष्ठावर न्यास करावा. " ओँ रूपेभ्यो शिवेभ्यः ज्वरायै नमः " या मंत्रानें वक्षःस्थलावर न्यास करावा. " ओँ वामदेवाय नमो रजायै नमः " या मंत्रानें गुह्यस्थानावर न्यास करावा. " ओँ ज्येष्ठाय नमो " रक्षायै नमः या मंत्रानें लिंगावर न्यास करावा. " ओँ श्रेष्ठाय नमो " बीजिन्यै नमः या मंत्रानें मुखावर न्यास करावा. " ओँ रुद्राय नमो " रत्यै नमः या मंत्रानें दक्षिण वक्षःस्थलावर न्यास करावा. "कालाय नमः पाल्यायै नमः" या मंत्रानें डाव्या उरावर न्यास करावा. "ओँ कलविकरणाय नमो" बुध्द्यै नमः या मंत्रानें वामजंघावर न्यास करावा. "ओँ बलाय नमः कारयित्र्यै नमः " या मंत्रानें दक्षिण जंघेवर न्यास करावा. " ओँ बलप्रमथनाय नमो धात्र्यै नमः " या मंत्रानें उरावर न्यास करावा. " ओँ सर्वभूतदमनाय नमो ग्रामण्यै नमः " या मंत्रानं दक्षिणपार्श्वावर न्यास करावा. " ओँ मनोन्मनाय नमस्तमोमोहायै नमः " या मंत्रानें वामपार्श्वावर न्यास करावा. " ओँ सद्योजातं प्रपद्यामि सिध्द्यै नमः " या मंत्रानें दक्षिणपादावर न्यास करावा. " ओँ

पादे ॥ ओं भवे दूत्यै नमः दक्षिणकरे ॥ ओं अभवे लक्ष्म्यै नमः वामकरे ॥ ओं अनातिभवं मेधायै नमः घ्राणे ॥ ओं भवस्व मां कांत्यै नमः शिरसि ॥ ओं भव स्वधायै नमः दक्षिणबाहौ ॥ ओं उद्भवाय नमो धृत्यै नमः वामबाहौ ॥ ह्मणोनि इति कलान्यास विस्ताकृति ॥

## वीरशैवषडंगन्यास.

आणिक ओं न्हां सर्वज्ञशक्तिधाम्ने हृदयाय नमः ॥ ओं न्हीं तृप्तिशक्तिधाम्ने शिरसे स्वाहा ॥ ओं न्हूं अनादिबोधशक्तिधाम्ने शिखायै वषट् ॥ ओं न्हैं स्वतंत्रशक्तिधाम्ने कवचाय हुं ॥ ओं न्हौं अलुप्तशक्तिधाम्ने नेत्रत्रयाय वौषट् ॥ ओं न्हः अनंतशक्तिधाम्ने अस्त्राय फट् ॥ ह्मणोनि षडंगन्यास करावा ॥१॥

## पंचब्रह्मन्यास रुद्राक्षधारणादि.

आणिक ओं यं न्हः ओं फट् ईशानाय नमः ॥ शिरसि ॥ ओं वां न्हौं एं वौषट् तत्पुरुषाय नमः मुखे ॥ ओं शिं न्हैं उं हुं अघोराय नमः

---

सद्योजाताय वै नमो नमो बुध्यै नमः''या मंत्रानें डाव्या पायावर न्यास करावा. "ओं भवे दूत्यै नमः ''या मंत्रानें दक्षिण हस्तावर न्यास करावा. "ओं अभवं लक्ष्म्यै नमः" या मंत्रानें डाव्या हातावर न्यास करावा. " ओं अनातिभवे मेधायै नमः " या मंत्रानें घ्राणेंद्रियावर न्यास करावा. " ओं भवस्व मां कांत्यै नमः" या मंत्रानें शिरावर न्यास करावा. " ओं भव स्वधायै नमः " या मंत्रानें दक्षिण बाहूवर न्यास करावा. " उद्भवाय नमो धृत्यै नमः " या मंत्रानें वामबाहूवर न्यास करावा. याप्रमाणें कलान्यास करावा.

## वीरशैव षडंगन्यास.

(१) नंतर ओं न्हां सर्वज्ञशक्तिधाम्ने हृदयाय नमः ओं न्हीं तृप्तिशक्तिधाम्ने शिरसे स्वाहा ओं न्हूं अनादिबोधशक्तिधाम्ने शिखायै वषट् ओं न्हैं स्वतंत्रशक्तिधाम्ने कवचाय हुं ओं न्हौं अलुप्तशक्तिधाम्ने नेत्रत्रयाय वौषट् ओं न्हः अनंतशक्तिधाम्ने अस्त्राय फट् याप्रमाणें षडंगन्यास करावा.

## पंचब्रह्मन्यासरुद्राक्षधारणादि.

नंतर " ओं यं न्हः ओं फट् ईशानाय नमः " या मंत्रानें शिरावर न्यास करावा. "ओं वां न्हौं एं वौषट् तत्पुरुषाय नमः" या मंत्रानें मुखावर न्यास करावा. " ओं शिं न्हैं उं हुं अघोराय नमः" हृदयावर न्यास करावा. " ओं मः

घोर अक्षयायै नमः दक्षिणांसे ॥ ओं घोरघोरतरेभ्यः कनिष्ठायै नमः वामांसे ॥ ओं सर्वेभ्यः सर्वमृत्यवे नमः नाभौ ॥ ओं सर्वशर्वेभ्यो मायायै नमः जठरे ॥ ओं नमस्ते अस्तु रुद्र अभयायै नमः पृष्ठे ॥ ओं रूपेभ्यः शिवेभ्यो ज्वरायै नमः वक्षसि ॥ ओं वामदेवाय नमः रजायै नमः गुह्ये ॥ ओं जेष्ठाय नमो रक्षायै नमः लिंगे ॥ ओं श्रेष्ठाय नमो बीजिन्यै नमः मुष्के ॥ ओं रुद्राय नमो रत्यै नमः ॥ दक्षिणोरसि ॥ कालाय नमः पाल्यायै नमः वामोरसि ॥ ओं कलविकरणाय नमो बुध्यै नमः वामजंघे ॥ ओं बलाय नमः कारयित्र्यै नमः दक्षिणजंघे ओं बलप्रमथनाय नमो धात्र्यै नमः उरसि ॥ ओं सर्वभूतदमनाय नमो ग्रामण्यै नमः दक्षिणपार्श्वे ॥ ओं मनोन्मनाय नमस्तमोमोहायै नमः वामपार्श्वे ॥ ओं सद्योजातं प्रपद्यामि सिध्यै नमः दक्षिणपादे ॥ ओं सद्योजाताय वै नमो नमो बुध्यै नमः वाम-

---

घोर अक्षयायै नमः " या मंत्रानें दक्षिण स्कंधावर न्यास करावा. " ओं घोरघोरतरेभ्यः कनिष्ठायै च नमः " या मंत्रानें डाव्या खांद्यावर न्यास करावा. " ओं सर्वेभ्यः सर्वमृत्यवे नमः " नाभीवर न्यास करावा. " ओं सर्वशर्वेभ्यः मायायै नमः " उदरावर न्यास करावा. " ओं नमस्ते अस्तु रुद्र अभयायै नमः " या मंत्रानें पृष्ठावर न्यास करावा. " ओं रूपेभ्यो शिवेभ्यः ज्वरायै नमः " या मंत्रानें वक्षःस्थलावर न्यास करावा. " ओं वामदेवाय नमो रजायै नमः " या मंत्रानें गुह्यस्थानावर न्यास करावा. " ओं ज्येष्ठाय नमो " रक्षायै नमः या मंत्रानें लिंगावर न्यास करावा. " ओं श्रेष्ठाय नमो " बीजिन्यै नमः या मंत्रानें मुखावर न्यास करावा. " ओं रुद्राय नमो " रत्यै नमः या मंत्रानें दक्षिण वक्षःस्थलावर न्यास करावा. "कालाय नमः पाल्यायै नमः" या मंत्रानें डाव्या उरावर न्यास करावा. "ओं कलविकरणाय नमो" बुध्यै नमः या मंत्रानें वामजंघावर न्यास करावा. "ओं बलाय नमः कारयित्र्यै नमः " या मंत्रानें दक्षिण जंघेवर न्यास करावा. " ओं बलप्रमथनाय नमो धात्र्यै नमः " या मंत्रानें उरावर न्यास करावा. " ओं सर्वभूतदमनाय नमो ग्रामण्यै नमः " या मंत्रानें दक्षिणपार्श्वावर न्यास करावा. " ओं मनोन्मनाय नमस्तमोमोहायै नमः " या मंत्रानें वामपार्श्वावर न्यास करावा. " ओं सद्योजातं प्रपद्यामि सिध्यै नमः " या मंत्रानें दक्षिणपादावर न्यास करावा. " ओं

पादे ॥ ओं भवे दूत्यै नमः दक्षिणकरे ॥ ओं अभवे लक्ष्म्यै नमः वामकरे ॥ ओं अनातिभवं मेधायै नमः घ्राणे ॥ ओं भवस्व मां कांत्यै नमः शिरसि ॥ ओं भव स्वधायै नमः दक्षिणबाहौ ॥ ओं उद्भवाय नमो धृत्यै नमः वामबाहौ ॥ ह्मणोनि इति कलान्यास विस्तारनि ॥

## वीरशैवषडंगन्यास.

आणिक ओं न्हां सर्वज्ञशाक्तिधाम्ने हृदयाय नमः ॥ ओं न्हीं तृप्तिशक्तिधाम्ने शिरसे स्वाहा ॥ ओं न्हूं अनादिबोधशक्तिधाम्ने शिखायै वषट् ॥ ओं न्हैं स्वतंत्रशक्तिधाम्ने कवचाय हुं ॥ ओं न्हौं अलुप्तशक्तिधाम्ने नेत्रत्रयाय वौषट् ॥ ओं न्हः अनंतशक्तिधाम्ने अस्त्राय फट् ॥ ह्मणोनि षडंगन्यास करावा ॥१॥

## पंचब्रह्मन्यास रुद्राक्षधारणादि.

आणिक ओं यं न्हः ओं फट् ईशानाय नमः ॥ शिरसि ॥ ओं वां न्हौं एं वौषट् तत्पुरुषाय नमः मुखे ॥ ओं शिं न्हैं उं हुं अघोराय नमः

---

सद्योजाताय वैं नमो नमो बुध्यै नमः''या मंत्रानें डाव्या पायावर न्यास करावा. "ओं भवे दूत्यै नमः ''या मंत्रानें दक्षिण हस्तावर न्यास करावा. "ओं अभवं लक्ष्म्यै नमः" या मंत्रानें डाव्या हातावर न्यास करावा. " ओं अनातिभवे मेधायै नमः " या मंत्रानें घ्राणेंद्रियावर न्यास करावा. " ओं भवस्व मां कांत्यै नमः" या मंत्रानें शिरावर न्यास करावा. " ओं भव स्वधायै नमः " या मंत्रानें दक्षिण बाहूवर न्यास करावा. " उद्भवाय नमो धृत्यै नमः " या मंत्रानें वामबाहूवर न्यास करावा. याप्रमाणें कलान्यास करावा.

### वीरशैव षडंगन्यास.

(१) नंतर ओं न्हां सर्वज्ञशक्तिधाम्ने हृदयाय नमः ओं न्हीं तृप्तिशक्तिधाम्ने शिरसे स्वाहा ओं न्हूं अनादिबोधशक्तिधाम्ने शिखायै वषट् ओं न्हैं स्वतंत्रशक्तिधाम्ने कवचाय हुं ओं न्हौं अलुप्तशक्तिधाम्ने नेत्रत्रयाय वौषट् ओं न्हः अनंतशक्तिधाम्ने अस्त्राय फट् याप्रमाणें षडंगन्यास करावा.

### पंचब्रह्मन्यासरुद्राक्षधारणादि.

नंतर " ओं यं न्हः ओं फट् ईशानाय नमः " या मंत्रानें शिरावर न्यास करावा. "ओं वां न्हौं एं वौषट् तत्पुरुषाय नमः'' या मंत्रानें मुखावर न्यास करावा. " ओं शिं न्हैं उं हुं अघोराय नमः" हृदयावर न्यास करावा. " ओं मः

हृदये ॥ ओं मः न्हूं इं वषट् वामदेवाय नमः गुह्ये ॥ ओं नं न्हीं अं स्वाहा सद्योजाताय नमः पादयोः ॥ असा पंचब्रह्मन्यास करून पुनः मस्तक ॥ ललाट ॥ कण्ठ ॥ हृदय ॥ नाभि यां स्थानांवर क्रमानें यकारादि नकारांत पंचाक्षर न्यास करून नंतर रुद्राक्षपुंज वस्त्रांत ठेवून ओं न्हूं स्त्रूं रूं ज्रूं प्रां रूमपि श्रीमं क्षां क्षमपि क्रां क्षां न्हूं नमः ॥ या मंत्रानीं अभिमंत्रण करावें ॥ पुनः॥ "रुद्राक्षवृक्षबीजाय भूतिसंभूतिहेतवे ॥ नेत्रत्रयाय रुद्राय नमो लोकहितार्थिने" ॥ या मंत्रानें नमस्कार करावा ॥ नंतर शिखा मस्तक मूर्ध कर्णद्वय कण्ठ वक्षस्थल बाहुद्वय मणिबंधद्वय यज्ञसूत्रस्थान उदर या स्थानांवर क्रमानें ओं सदाशिवाय नमः ॥ ओं वन्हिसूर्यसोमाधिपाय श्रीशिवाय नमः ॥ ओं षट्त्रिंशत्तत्वात्मकाय श्रीपरशिवाय नमः॥ ओं सोमाय नमः॥ओं त्रियंबकाय कालात्मने श्रीकण्ठाय नमः ॥ ओं श्रीकण्ठादिमूर्त्यात्मकाय श्रीसर्वज्ञाय नमः ॥ ओं सुखासनादिमूर्त्यात्मकाय श्रीकण्ठाय नमः ॥ ओं सोमकलात्मकाय श्रीसोमनाथाय नमः ॥ ओं द्वादशादित्याधिष्ठानाय श्रीमहादेवाय नमः ॥ ओं केशवादिमूर्त्यधिष्ठानाय श्रीउमापतये नमः ॥ ओं शतरुद्रविद्येश्वरात्मकाय श्रीविश्वेशाय नमः ॥ ओं चतुःषष्ठिकला-

---

न्हूं इं वषट् वामदेवाय नमः" या मंत्रानें गुह्यस्थानावर न्यास करावा. "ओं नं न्हीं अं स्वाहा सद्योजाताय नमः" या मंत्रानें पायावर न्यास करावा. याप्रमाणें पंचब्रह्म न्यास करून पुनः मस्तक, ललाट, कंठ, हृदय, नाभि यांवर क्रमानें यकारादि नकारांत पंचाक्षरांचा न्यास करावा. नंतर रुद्राक्षपुंज वस्त्रांत ठेवून ओं न्हूं स्त्रूं रूं ज्रूं प्रां रूमपि श्रीमं क्षां क्षमपि क्रां क्षां न्हूं नमः या मंत्रांनीं अभिमंत्रण करून पुनः "रुद्राक्षवृक्षबीजाय भूतिसंभूतिहेतवे ॥ नेत्रत्रयाय रुद्राय नमो लोकहितार्थिने" ॥ या मंत्रानें नमस्कार करावा. नंतर शिखा, शिर, मूर्ध, कर्णद्वय, कंठ, उर, बाहुद्वय, मणिबंधद्वय, यज्ञसूत्रस्थान, उदर या स्थानांवर अनुक्रमानें "ओं सदाशिवाय नमः "ओं वन्हिसूर्यसोमाधिपाय श्रीशिवाय नमः" "ओं षट्त्रिंशत्तत्वात्मकाय श्रीपरशिवाय नमः" ओं सोमाय नमः । ओं त्रियंबकाय कालात्मने श्रीकंठाय नमः । श्रीकंठादिमूर्त्यात्मकाय श्रीसर्वज्ञाय नमः । ओं सुखासनादिमूर्त्यात्मकाय श्रीकंठाय नमः । ओं सोमकलात्मकाय श्रीसोमनाथाय नमः । ओं द्वादशादित्याधिष्ठानाय श्रीमहादेवाय नमः । ओं केशवादिमूर्त्यधिष्ठानाय श्रीउमापतये नमः । ओं शतरुद्रविद्येश्वरात्मकाय श्रीविश्वेशाय नमः । ओं चतुःषष्ठिकलावि-

धिपाय ओं न्हीं जननस्थानभूतये सर्वात्मने सर्वकलारूपाय श्रीउमापतये नमः ॥ या मंत्रांनीं पूर्वोक्त संख्याक्रमानें रुद्राक्षमाला धारण करावी ॥नंतर आणिक ॥ शिवाय नमः ॥ रुद्राय नमः ॥ पशुपतये नमः ॥ नीलकण्ठाय नमः ॥ महेश्वराय नमः ॥ हरिकेशाय नमः ॥ विरूपाक्षाय नमः ॥ पिनाकिने नमः ॥ त्रिपुरांतकाय नमः ॥ शंभवे नमः ॥ शूलिने नमः ॥ महादेवाय नमः ॥या द्वादशमन्त्रैंकरून पुष्पांजलि देऊन॥

## वीरशैवशिवसमर्चना.

आणिक परशिव तों आपण ॥ नित्यनिष्काम निर्गुण ॥ झाला तरी भक्तहितार्थालागून ॥ घृतकाठिण्यन्यायें ॥१॥ मूर्तिरूपें उपचार भोग ॥ घ्यावयालागीं योग्य ॥ तयाकारणें लिंग ॥ मूलस्थानीं पाद कल्पिजे ॥२॥ लिंग अग्रस्थानीं मुख ॥ पार्श्व भुजादिक ॥ मागें पृष्ठ ह्मणोनि मुखें ॥ परिभाऊनि ॥३॥ आणिक ॥ ओं न्हौं तत्पुरुषाय नमः ॥ या मंत्रें स्वाभिमुख करून ॥ वरि तया लिंगासि ओं न्हां सद्योजाताय नमः ॥ पाद्यं स्वाहा ॥ ओं न्हीं वामदेवाय नमः ॥ आचमनीयं स्वाहा ॥ ओं न्हुं अघोराय नमः ॥ अर्घ्यं स्वाहा ॥ या मंत्रें पाद्यादि देऊन ॥ ओं न्हां

---

पाय ओं न्हीं जननस्थानभूतये सर्वात्मने सर्वकलारूपाय श्रीउमापतये नमः । या मंत्रांनीं पूर्वी सांगितलेल्या संख्येच्या क्रमानें रुद्राक्षमाला धारण करून शिवाय नमः। रुद्राय नमः । पशुपतये नमः । नीलकंठाय नमः । महेश्वराय नमः । हरिकेशाय नमः । विरूपाक्षाय नमः । पिनाकिने नमः । त्रिपुरांतकाय नमः । शंभवे नमः । शूलिने नमः। महादेवाय नमः या द्वादशमंत्रांचा उच्चार करून पुष्पांजलि द्यावा.

## वीरशैव शिवसमर्चना.

(१) तो परशिव नित्य निरपेक्ष निर्गुण जरी आहे, तथापि भक्तांच्या हिताकरितां घृतकाठिण्य न्यायानें (२) मूर्तिरूपानें भक्तांकडून उपचार करून घेतो आणि तें योग्य असल्यामुळें लिंगमूलस्थानीं पादांची कल्पना करावी. (३) लिंगाच्या अग्रभागीं मुखाची कल्पना करावी. लिंगाच्या पार्श्वभागीं भुजद्वयाची कल्पना करावी. लिंगाच्या मागच्या बाजूला पृष्ठाची कल्पना करावी. (४) " ओं न्हौं तत्पुरुषाय नमः " या मंत्रानें आपल्याकडे लिंगाचें मुख करून घ्यावें. नंतर पुढें सांगितल्याप्रमाणें त्या लिंगास ते ते उपचार त्या त्या मंत्रानें द्यावेत. ओं न्हां सद्योजाताय नमः पाद्यं स्वाहा । ओं न्हीं वामदेवाय नमः आचमनीयं स्वाहा । ओं न्हूं अघोराय नमः अर्घ्यं स्वाहा । या मंत्रांनीं पाद्यादिक द्यावेत. नंतर पुनः ओं न्हां सद्यो-

सद्योजाताय नमः ॥ गोमूत्रं स्वाहा ॥ ओं ऱ्हीं वामदेवाय नमः ॥ गोमयं स्वाहा ॥ ओं ऱ्हूं अघोराय नमः क्षीरं स्वाहा ॥ ओं ऱ्हैं तत्पुरुषाय नमः ॥ गोदधि स्वाहा ॥ ओं ऱ्हौं ईशानाय नमः ॥ गोघृतं स्वाहा ॥ ओं ऱ्हः सदाशिवाय नमः ॥ पंचगव्यं स्वाहा॥या मंत्रें लिंगासि पंचगव्य अभिषेक करूनि ॥ वरि ॥ ओं आप्याय स्वसमे तु ते विश्वतः सोमवृष्णियं भवा वाजस्य संगथे ॥ ओं क्षीरेण स्नापयामि ह्मणोनि क्षीरस्नान घालूनि ॥ वरि सद्योजात मंत्रें जलस्नान घालावें ॥ आणिक ॥ दधिक्राव्णो अकारिषं जिष्णोरश्वस्य वाजिनः सुरभिनो मुखा करत्प्राण आयूँषि तारिषत् ॥ ओं दध्ना स्नापयामि ॥ ह्मणोनि दधिस्नान घालूनि ॥ वामदेवमंत्रें जलस्नान घालावें ॥ ओं शुक्रमसि ज्योतिरसि तेजोसि देवो वः सविता पुनात्वच्छिद्रेण पवित्रेण वसोः सूर्यस्य रश्मिभिः ॥ ओं घृतेन स्नापयामि ॥ ह्मणोनि घृतस्नान घालूनि ॥ अघोर मंत्रें जलस्नान घालावें॥मधुवाता ऋतायते मधुक्षरंति सिंधवः माध्वीनः संत्वोषधीर्मधुनक्तमुतोषसि मधुमत्पार्थिवꣳ रजः॥ मधुद्यौरस्तु नः पिता मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाꣳ अस्तु सूर्यः ॥माध्वीर्गावो भवंतु नः ॥ ओं मधुना स्नापयामि ॥ ह्मणूनि मधुस्नान घालून ॥ वरि तत्पुरुष मंत्रें जलस्नान घालावें ॥ आणिक ॥ ओं भूर्भुवः स्वः तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ॥ धियो यो नः प्रचोदयात् ॥ ओं शर्करया स्नापयामि ॥ ह्मणोनि शर्करास्नान घालून ॥ वरि ईशानमंत्रें जलस्ना-

---

जाताय नमः गोमूत्रं स्वाहा । ओं ऱ्हीं वामदेवाय नमः गोमयं स्वाहा । ओं ऱ्हूं अघोराय नमः क्षीरं स्वाहा । ओं ऱ्हैं तत्पुरुषाय नमः गोदधि स्वाहा । ओं ऱ्हौं ईशानाय नमः गोघृतं स्वाहा । ओं ऱ्हः सदाशिवाय नमः पंचगव्यं स्वाहा। या मंत्रांनीं लिंगाला पंचगव्याभिषेक घालावा नंतर " आप्यायस्व " मंत्रानें क्षीरस्नान घालावें. नंतर सद्योजात मंत्रानें जलस्नान घालावें. या नंतर "दधिक्राव्णो" या मंत्रानें दधिस्नान घालावें. त्यानंतर वामदेवमंत्रानें जलस्नान घालावें. त्यानंतर "शुक्रमसि ज्योतिरसि " या मंत्रानें तुपानें अभिषेक घालावा. नंतर अघोरमंत्रानें जलस्नान घालावें. मग " मधुवाता ' या मंत्रानें मधाचा अभिषेक घालून तत्पुरुष मंत्रानें जलस्नान घालावें. नंतर ओं भूर्भुवः स्वः " मंत्रानें साखरेचा अभिषेक घालवा. नंतर ईशान मंत्रानें जलस्नान घालावें. याप्रमाणें पंचामृताभिषेक करून

न घालावें ॥ पंचामृताभिषेकानंतरें ॥ गोधूमचूर्णे उद्वर्तन करूनि ॥ लिंगासि मंदोष्णोदकें स्नान घालूनि ॥ ओं ह्नः ईशानाय नमः ॥ येणें गंधोदक देऊन ॥ ओं ह्नौं तत्पुरुषाय नमः पुष्पोदक घालूनि ॥ ओं ह्नूं अघोराय नमः ॥ सुवर्णोदक समर्पून ॥ ओं ह्नीं वामदेवाय नमः ॥ रत्नोदक घालून ॥ ओं ह्नां सद्योजाताय नमः ॥ मूलमंत्रोदक समर्पून ॥ ओं ह्नां ह्नीं ह्नूं ह्नैं ह्नौं ह्नः ह्मणोनि शिवागम मंत्रानें ॥ तिलोदकें अभिषेक करून वरि तीर्थोदक घालिजे ॥ तया तीर्थोदकें ॥ पुरुषसूक्त पंचरुद्र मांडूक्य श्रीरुद्रपंचब्रह्ममूळ मंत्रादिकें रुद्रहृदयानें महास्नान कीजे ॥ ओं ह्नां हृदयाय नमः ह्या मन्त्रें पाद्य आचमन अर्घ्य देऊनि ॥ अंगुष्ठानामिकायोगें विभूति काढूनि ॥ मंत्रोदकें कालवूनि ॥ ओं ह्नीं तत्पुरुषाय नमः ह्या मन्त्रें विभूति लिंगास धारूनि ॥ वरि ओं ह्नां हृदयाय नमः ॥ वस्त्रं स्वाहा ओं ह्नैं कवचाय हुं ॥ उपवीतं स्वाहा ॥ ओं ह्नीं वामदेवाय नमः ॥ गंधं स्वाहा ॥ ओं ह्नः अस्त्राय फट् ॥ अक्षतान् स्वाहा ॥ ओं नमः शिवाय ॥ पुष्पं स्वाहा ॥ ह्मणोनि त्या त्या मंत्रें तें तें द्रव्य समर्पूनि ॥ आणिक पुष्पाचेनि ॥ अंगुष्ठ मध्य-

---

गव्हाचें चूर्ण वगैरे चूर्णांनीं लिंगाचें उद्वर्तन ( घासणें ) करावें. नंतर मंदोष्ण पाण्यानें स्नान घालावें. नंतर " ओं ह्नः ईशानाय नमः " मंत्रानें गंधोदक समर्पण करावें. " ओं ह्नौं तत्पुरुषाय नमः " या मंत्रानें पुष्पोदक द्यावें. ओं ह्नूं अघोराय नमः " या मंत्रानें स्वर्णोदक द्यावें. " ओं ह्नीं वामदेवाय नमः " या मंत्रानें रत्नोदक समर्पण करावें. " ओं ह्नां सद्योजाताय नमः " या मंत्रानें मूलमंत्रोदक समर्पण करावें. ओं ह्नां ह्नीं ह्नूं ह्नैं ह्नौं ह्नः या शिवागम मंत्रांनीं तिलोदकाभिषेक करावा. त्यावर तीर्थोदकाभिषेक करावा. पुनः त्या तीर्थोदकानें श्रीरुद्र, पंचब्रह्म, पुरुषसूक्त, पंचरुद्र, मांडूक्य, रुद्रहृदय, मूलमंत्र वगैरे मंत्रांनीं महास्नान घालावें. नंतर ओं ह्नां हृदयाय नमः " या मंत्रांनीं पाद्यादिक द्यावेत. नंतर अंगुष्ठानामिकांगुलींनीं भस्म काढून मंत्रोदकानें तें कालवून ओं ह्नीं तत्पुरुषाय नमः या मंत्रानें लिंगास समर्पण करावें. नंतर पुढील त्या त्या मंत्रानें ते ते उपचार समर्पण करावेत. ओं ह्नां हृदयाय नमः वस्त्रं स्वाहा । ओं ह्नैं कवचाय हुं उपवीतं स्वाहा। ओं ह्नीं वामदेवाय नमः गंधं स्वाहा । ओं ह्नः अस्त्राय फट् अक्षतान् स्वाहा। ओं नमः शिवाय पुष्पं स्वाहा । या मंत्रांनीं तीं तीं द्रव्यें समर्पण करून अंगुष्ठम-

मानामिकेचेनियोगें धरूनि ॥ ओं हराय नमः पादौ पूजयामि ॥ ओं शंभवे नमः गुल्फौ पूजयामि ॥ ओं शुभाय नमः जानुनी पूजयामि ॥ ओं सर्वनिवासाय नमः ऊरू पूजयामि ॥ ओं सर्वाश्रयाय नमः कटिं पूजयामि ॥ ओं सर्वरक्षाय नमः जघनं पूजयामि ॥ ओं दिग्वाससे नमः मध्यं पूजयामि ॥ ओं नक्षत्रमालिने नमः नाभिं पूजयामि ॥ ओं सर्वेश्वराय नमः कुक्षिं पूजयामि ॥ ओं उमाकांताय नमः वक्षःस्थलं पूजयामि ॥ ओं नीलकंठाय नमः कंठं पूजयामि ॥ ओं त्रिपुरसंहर्त्रे नमः बाहू पूजयामि ॥ ओं शंकराय नमः करान् पूजयामि ॥ ओं वृषाय नमः बहिः कंठं पूजयामि ॥ ओं ऋतुफलदायिने नमः मुखं पूजयामि ॥ ओं नागहाराय नमः नासिकां पूजयामि ॥ ओं इंद्वर्कवन्हिनयनाय नमः नेत्राणि पूजयामि ॥ ओं कपालिने नमः ललाटं पूजयामि ॥ ओं फणिकुंडलाय नमः कर्णौ पूजयामि ॥ ओं गंगाधराय नमः जटां पूजयामि ॥ ओं सोमभूषणाय नमः कपर्दं पूजयामि ॥ ओं शुभदायिने नमः सर्वांगं पूजयामि ॥ ह्मणोनि लिंगाची अवयवपूजा विस्तारूनि ॥ यानंतर

## मातृकाक्षरन्यास.

ओं ऱ्हां हृदयाय नमः ॥ ओं ऱ्हीं शिरसे स्वाहा ॥ ओं ऱ्हूं शिखायै

---

ध्यमानामिका ह्या बोटांनीं फुलें घेऊन पुढील मंत्रोच्चार करून वाहावीत. ओं हराय नमः पादौ पूजयामि । ओं शंभवे नमः गुल्फौ पूजयामि । ओं शुभाय नमः जानुनी पूजयामि । ओं सर्वनिवासाय नमः ऊरू पूजयामि । ओं सर्वाश्रयाय नमः कटिं पूजयामि । ओं सर्वरक्षाय नमः जघनं पूजयामि । ओं दिग्वाससे नमः मध्यं पूजयामि । ओं नक्षत्रमालिने नमः नाभिं पूजयामि । ओं सर्वेश्वराय नमः कुक्षिं पूजयामि । ओं उमाकांताय नमः वक्षः पूजयामि । ओं नीलकंठाय नमः कंठं पूजयामि । ओं त्रिपुरसंहर्त्रे नमः बाहू पूजयामि । ओं शंकराय नमः करान्पूजयामि ओं वृषाय नमः बहिः कंठं पूजयामि । ओं ऋतुफलदायिने नमः मुखं पूजयामि । ओं नागहाराय नमः नासिकां पूजयामि । ओं इंद्वर्कवन्हिनेत्राय नमः नेत्राणि पूजयामि । ओं कपालिने नमः ललाटं पूजयामि । ओं फणिकुंडलाय नमः कर्णौ पूजयामि । ओं गंगाधराय नमः जटां पूजयामि । ओं सोमभूषणाय नमः कपर्दं पूजयामि । ओं शुभदायिने नमः सर्वांगं पूजयामि । याप्रमाणें लिंगावयवाची पूजा करावी.

## मातृकाक्षराविन्यास.

यापुढें सांगितल्याप्रमाणें त्या त्या अवयवांवर न्यास करावा ओं ऱ्हां हृदयाय

वषट् ॥ ओं ऱ्हैं कवचाय हुं ॥ ओं ऱ्हौं नेत्रत्रयाय वौषट् ॥ ओं ऱ्हः अ-स्त्राय फट् ॥ ह्मणोनि षडांगन्यासमंत्र ॥ ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हौं ऱ्हः॥ ह्मणोनि शिवागम मंत्र ॥ ओं ऱ्हं ऱ्हां हं हां ल्हां ॥ सं ह्मणोनि पंचप्रसाद मंत्र ॥ नमः शिवाय ह्मणोनि ॥ पंचाक्षरमंत्र ॥ ओं नमः शिवाय ह्मणोनि मूळ पंचाक्षरमंत्र ॥ ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं नमः शिवाय ह्मणोनि स्थूल पंचाक्षरमंत्र ॥ ओं ऱ्हीं शिवाय नमः ॥ ह्मणिजे सूक्ष्म पंचाक्षरमंत्र ॥ ओं ऱ्हीं नमः शिवाय ह्मणिजे मायाख्य पंचाक्षरमंत्र ॥ ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हौं नमः शिवाय ह्मणिजे प्रसादपंचाक्षरमंत्र ॥ ओं ऱ्हः ॥ अनंतशक्तिधाम्ने ज्योतीरूपाय शिवास्त्राय फट् ॥ ह्मणिजे शिवास्त्रमंत्र ॥ ओं ई ऊं व्योमव्यापिने व्योमास्त्राय फट् ॥ ह्मणिजे व्योमास्त्रमंत्र ॥ ओं श्लि पशु हुं फट् ॥ ह्मणिजे पाशुपतास्त्रमंत्र ॥ ओं चिच्छिद चिच्छिद क्षुंकृत क्षुरिकास्त्राय फट् ॥ ह्मणिजे क्षुरिकास्त्रमंत्र ॥ ओं प्रस्फुर प्रस्फुर घोरघोर तमतनुरूप चट चट प्रचट प्रचट कह कह वम वम बंधबंध घातय घातय हुं फट् ॥ ह्मणिजे अघोरास्त्र मंत्र ॥ लिंगमध्यांत अनुसंधानूनि ॥ आणिक ॥ अकार आकार उभय ॥ क्रमानें मूर्ध्नि ललाट ॥ इकार ईकार उभय दक्षिणवामनेत्र उकार ऊकार उभय दक्षिण-

---

नमः । ओं ऱ्हीं शिरसे स्वाहा । ओं ऱ्हूं शिखायै वषट् । ओं ऱ्हैं कवचाय हुं । ओं ऱ्हौं नेत्रत्रयाय वौषट् । ओं ऱ्हः अस्त्राय फट् । हा षडंग मंत्र,ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हौं ऱ्हः हा शिवागममंत्र, । ओं ऱ्हं ऱ्हां हं हां ल्हां सं हा पंचप्रसादमंत्र, नमः शिवाय हा पंचाक्षरीमंत्र, ओं नमः शिवाय हा मूलपंचाक्षरमंत्र, ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं नमः शिवाय हा स्थूलपंचाक्षरीमंत्र, ओं ऱ्हीं शिवाय नमः हा सूक्ष्मपंचाक्षरीमंत्र,ओं ऱ्हीं नमः शिवाय हा मायाख्यपंचाक्षरीमंत्र, ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हौं नमः शिवाय हा प्रसादपंचाक्षरी मंत्र, ॐ हः अनंतशक्तिधाम्ने ज्योतीरूपाय शिवास्त्राय फट् हा शिवास्त्रमंत्र, ॐ ई ऊं व्योमव्यापिने व्योमास्त्राय फट् हा व्योमास्त्रमंत्र, ॐ श्लि पशुहुं फट् हा पाशुपतास्त्रमंत्र, ॐ चिच्छिद चिच्छिद क्षुंकृतक्षुरिकास्त्राय फट् क्षुरिकास्त्रमंत्र, ॐ प्रस्फुर प्रस्फुर घोर घोर तम तनुरूप चट चट प्रचट प्रचट कह कह वम वम बंध बंध घातय घातय हुं फट् हा अघोरास्त्रमंत्र या मंत्रांचें अनुसंधान लिंगामध्यें करावें. अकार आकार हे क्रमानें मस्तक ललाट आहेत असें समजावें इकार ईकार हेच दक्षिणवामनेत्र आहेत. उकार ऊकार हेच दक्षिण

वामश्रोत्र ॥ ऋकार ॠकार उभय दक्षिण वाम कपोल ॥ ऌकार ॡकार उभय दक्षिण वामनासापुट ॥ एकार ऐकार उभय ऊर्ध्वाधरोष्ठ ॥ ओकार औकार उभय ऊर्ध्व अधोदंतपंक्ति ॥ अंकार अःकार उभय दंतहिरडिया ॥ कादि पंचाक्षरें ॥ ते दक्षिण पंचहस्त ॥ चादि पंचाक्षरें ते वामपंचहस्त ॥ टादि पंचाक्षरें ॥ तादि पंचाक्षरें ते दक्षिणवामपाद॥ पकार तें उदर ॥ फकार बकार उभय दक्षिण वामपार्श्व ॥ भकार ते स्कंध ॥ मकार तें हृदय ॥ यकारादि सकारांत सप्त अक्षरें तीं त्वगादि सप्त धातु ॥ हकार तो आत्मा ॥ क्षकार तो पूजकाचे जन्मादिरिपुविषय क्रोध ॥ ह्मणोनि लिंगध्यानीं मातृकाक्षर रहस्य समस्त स्मरोनि॥

## कलान्यासपूजावगैरे.

आणिक ॥ तें लिंगमध्यस्थानीं ॥ कलान्यास ब्रह्मन्यास ध्यान करूनि ॥ उपरि ॐ ऱ्हौं नेत्रत्रयाय वौषट् धूपं स्वाहा ॥ यामंत्रें धूपसमर्पण करोनि ॥ ॐ ऱ्हैं कवचाय हुं दीपं स्वाहा ह्या मंत्रानें नीराजनार्पण करोनि ॥ ॐ शिवाय नमः या मूलमंत्रें परमान्नादि नैवेद्य पताकमुद्रेनें समर्पून ॥ वरि ॐ नमः शिवाय पानीयं स्वाहा ॥ ॐ ऱ्हां हृदयाय न-

---

वामश्रोत्र जाणावें. ऋकार ॠकार हेच दक्षिण वामगाल जाणावेत. ऌकार ॡकार हेंच दक्षिण वामनासापुट जाणावेत. एकार ऐकार हेच ऊर्ध्वाधरोष्ठ जाणावेत. ओकार औकार हेच वरची खालची दंतपंक्ति जाणाव्यात. अंकार अःकार हेच दाताचे हिरडे जाणावेत. कादि पंचाक्षरेंच उजवे पांच हात समजावेत. चादि पंचाक्षरेंच डावे पांच हात समजावेत. टादि पंचाक्षरें तादि पंचाक्षरें दक्षिण वामपाद जाणावेत. पकार उदर समजावें. फकार बकारच दक्षिण वामपार्श्व जाणावेत. थकार स्कंध जाणावा. मकार हृदय जाणावें. यकारादि सकारांत अक्षरें त्वगादि सप्त धातु समजावेत. हकार आत्मा जाणावा. क्षकारच पूजकांचा जन्मादि रिपुविषय असा क्रोध आहे असें जाणावें. याप्रमाणें लिंगामध्यें मातृकाक्षरांचा न्यास स्मरून

## कलान्यास पूजा वगैरे.

पुनः त्या लिंगामध्यें कलान्यासब्रह्मन्यासांचें स्मरण करून पुनः पुनः औं ऱ्हौं नेत्रत्रयाय वौषट् धूपं स्वाहा " या मंत्रानें धूप समर्पण करावा. " औं ऱ्हैं कवचाय हुं दीपं स्वाहा " ह्या मंत्रानें नीराजन समर्पण करावें. " औं शिवाय नमः " या मूल मंत्रानें परमान्नादि नैवेद्य समर्पण पताकमुद्रेनें करावें. नंतर औं नमः शिवाय पानीयं स्वाहा " औं ऱ्हां हृदयाय नमः आचमनीयं स्वाहा, औं-

यः आचमनीयं स्वाहा ॥ ॐ नमः शिवाय अनुलेपनं स्वाहा ॥ ॐ ऱ्हीं तत्पुरुषाय नमः ॥ तांबूलं स्वाहा ॥ ॐ ह ऱ्हां हं ऱ्हां हुं सः आभरणं स्वाहा ॥ ह्मणोनि त्या त्या मंत्रें ती ती वस्तु समर्पून ॥ वरि ॐ नमः शिवाय दर्पणं स्वाहा ॥ दर्पणादि छत्रचामरव्यजनादि समर्पून ॥ आणिक लौकिक वैदिक स्तोत्र करूनि ॥ भवाय देवाय नमः ॥ शर्वाय देवाय नमः ईशानाय देवाय नमः ॥ पशुपतये देवाय नमः ॥ रुद्राय देवाय नमः ॥ उग्राय देवाय नमः ॥ भीमाय देवाय नमः ॥ महते देवाय नमः ॥ या अष्टमंत्रें अष्टपुष्प समर्पून ॥ नंतर शांभवमंत्रांनीं ॥ पुष्पांजलि देऊन ॥ नमो हिरण्यवाहवे ॥ आवो राजानं ॥ त्वमग्ने रुद्रो ॥ पंचब्रह्म वेदपादस्तव ॥ इत्यादिकांनीं प्रदक्षिणा नमस्कार करूनि ॥ दक्षिण करांजलिनें पुष्पोदक घेऊनि ॥ त्या चतुरंगुलींनीं ॥ आकुंचन करावें ॥ पूजां तर्पयामि ह्मणून ॥ पुष्पोदक निजपाद मूलस्थानीं ॥ कनिष्ठांगुलीस घालूनि ॥ पूजा समाप्त करावी ॥

## विशेषवीरशैवषट्स्थलविषय.

आणिक तो विशेषवीरशैव ॥ तया श्रीगुरु पासाव ॥ उपदेश अनु-

---

नमः शिवाय अनुलेपनं स्वाहा, ओं ऱ्हीं तत्पुरुषाय नमः तांबूलं स्वाहा, ओं ह ऱ्हां हं ऱ्हां हुं सः आभरणं स्वाहा, याप्रमाणें त्या त्या मंत्रानें ते ते पदार्थ समर्पण करावेत. नंतर ओं नमः शिवाय दर्पणं स्वाहा, या मंत्रानें दर्पण, छत्र, चामर, व्यजन वगैरे समर्पण करावींत. नंतर लौकिक वैदिक स्तोत्रें करून नंतर भवाय देवाय नमः। शर्वाय देवाय नमः। ईशानाय देवाय नमः। पशुपतये देवाय नमः। रुद्राय देवाय नमः। उग्राय देवाय नमः। भीमाय देवाय नमः। महते देवाय नमः। या आठ मंत्रांनीं अष्टविध पुष्पसमर्पण करावें. नंतर शांभव मंत्रांनीं पुष्पांजलि देऊन नमो हिरण्यबाहवे। आवोराजानां। त्वमग्ने रुद्रो। पंचब्रह्म। वेदपादस्तव इत्यादि मंत्रांनीं प्रदक्षिणा नमस्कार घालावेत. नंतर उजव्या करांगुळीनें पुष्पोदक घेऊन त्या चतुरंगुळींनीं आकुंचन करावें. नंतर " पूजां तर्पयामि " असें ह्मणून पुष्पोदक आपल्या पायांच्या मुळाजवळ कनिष्ठांगुलीवर घालावें. पूजा-समाप्त झाली.

## विशेषवीरशैवषट्स्थलविषय.

(१) आणिक त्या विशेष वीरशैवानें श्रीगुरूनें आपल्या उपदेश केलेल्या

भव ॥ सिद्ध झाला ॥१॥ निगम पुराण ॥ आगम पुरातन ॥ मार्ग सर्वोत्कृष्ट कारण ॥ षट्स्थळांत ॥२॥ भक्ति कर्मक्षय ॥ निर्मळमति विचार दर्पसंक्षय ॥ सम्यक्ज्ञान ह्मणोनि इति हे ॥ षट्फलक्रमयुक्त ॥३॥ भक्त माहेश्वर प्रसादिक ॥ प्राणलिंगी, शरण, ऐक्य ॥ ह्मणिजे मुख्य ॥ षट्स्थळें ॥४॥ पृथ्वी जल हुताशन ॥ मरुत गगन ॥ आत्मा ह्मणोन षडंग ॥५॥ चित्त मन ॥ बुद्धि अहंकार ज्ञान ॥ भाव ह्मणोन ॥ षट् हस्त ॥६॥ कर्मसादाख्य कर्तृसादाख्य ॥ मूर्तिसादाख्य अमूर्तिसादाख्य ॥ शिवसादाख्य महासादाख्य ॥ ह्मणिजे षट् सादाख्यें ॥७॥ क्रियाशक्ति इच्छाशक्ति ॥ ज्ञानशक्ति आदिशक्ति ॥ पराशक्ति चिच्छक्ति ॥ ह्मणिजे षट् शक्ति ॥८॥ आचारलिंग गुरुलिंग ॥ शिवलिंग जंगमलिंग ॥ प्रसादलिंग महालिंग ॥ ह्मणिजे षड्लिंग ॥९॥ निवृत्तिकळा प्रतिष्ठाकळा ॥ विद्याकळा शांतिकळा ॥ शांत्यतीतकळा शांत्यतीतोत्तरकळा ॥ ह्मणिजे षड्विधकळा ॥१०॥ घ्राण जिव्हा नेत्र ॥ त्वक् श्रोत्र ॥ हृदय ह्मणिजे षट्प्रकार ॥ मुखादिक ॥ ११ ॥ गंध । रस । रूप । स्पर्श । शब्द परिणाम ह्मणिजे षट्पदार्थ ॥१२॥ श्रद्धाभक्ति निष्ठाभक्ति ॥ अवधानभक्ति अनुभवभक्ति ॥ आनंदभक्ति समरसभक्ति ॥ ह्मणिजे षड्विधभक्ति ॥१३॥

---

(२)वेदपुराणागमांतील सार, पुरातन मार्ग, सर्वोत्कर्ष अशा षट्स्थलांमध्यें (३) भक्ति, कर्मक्षय,निर्मलमति,विचार,दर्पसंक्षय, सम्यग्ज्ञान, अशीं सहा फळें असलेलीं (४) भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण, ऐक्य अशीं षट्स्थलें जाणावीत. (५) पृथिवी, जल, अग्नि, वायु, आकाश, आत्मा अशीं हीं षडंगें होत. (६) चित्त, मन, बुद्धि, अहंकार, ज्ञान, भाव असे सहा हात जाणावेत. (७) कर्मसादाख्य, कर्तृसादाख्य, मूर्तिसादाख्य, अमूर्तिसादाख्य, शिवसादाख्य, महासादाख्य हे सहा सादाख्य जाणावेत. (८) क्रियाशक्ति, इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति, आदिशक्ति, पराशक्ति, चिच्छक्ति अशा सहा शक्ति जाणाव्यात. (९) आचारलिंग गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग, प्रसादलिंग, महालिंग अशीं षड्विधलिंगें जाणावीत. (१०) निवृत्ति, प्रतिष्ठा, विद्या, शांति, शांत्यतीता, शांत्यतीतोत्तरा या सहा कला होत. (११) घ्राण, जिव्हा, नेत्र, त्वक्, श्रोत्र, हृदय अशीं सहा मुखें होत. (१२) गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द, परिणाम असे सहा पदार्थ होत. (१३) श्रद्धाभक्ति, निष्ठाभक्ति, अवधानभक्ति, अनुभवभक्ति, आनंदभक्ति, समरसभक्ति अशा सहा

या परि असे आचरण विख्यात ॥ त्याचे ठायीं प्रथम भक्तिस्थळांत ॥ आचारादि षड्विधलिंग ॥ एकक्रियाभेदें ॥ १४ ॥ त्रयत्रय होऊनि विशेष ॥ अष्टादश होऊनि असे ॥ ते कवण प्रकार कैसे ॥ ह्मणतिलें तरी ॥ १५ ॥

## आचारत्रय.

सदाचार नियताचार ॥ गणाचार ॥ ह्मणोनि आचार ॥ लिंगत्रिविधभेद ॥१॥ त्याचे ठायीं ॥ कोणी एक स्वसन्मार्गींचीये ॥ ठायीं सकळ शरणासि संतोष होय ॥ तैशी रहाणी निश्चळ होय ॥ तो सदाचार ह्मणवी ॥२॥ भक्तीनें आपण ॥ धरिलें आचरण ॥ प्राणांत चालवी निपुण ॥ तो नियताचार ह्मणवी ॥३॥ शिवमाहेश्वराचे जे निंदक ॥ तयासि शिक्षा करीन ऐसा धारक ॥ ऐसा निश्चय प्रतिज्ञापूर्वक कटाक्ष ॥ त्याचा तो गणाचार ह्मणवी ॥ ४ ॥

## त्रिविधगुरुलिंग.

आणिक दीक्षा ह्मणोनि ॥ शिक्षा ह्मणोनि ॥ अनुभव ह्मणोनि ॥ गुरुलिंग त्रिविध ॥१॥ त्याचे ठायीं ॥ आगमोक्त विधानें ॥ कुंडमंडळादि रचनेनें ॥ षडध्वशुद्धि करणें ॥ ते दीक्षा ह्मणवी ॥२॥ जंगम तेचि आ-

---

भक्ति होत. (१४) याप्रमाणें नानातऱ्हेचे आचार आहेत त्यांत भक्तिस्थलांत आचारादि षड्विध लिंगांमध्यें क्रियाभेदानें (१५) तीन तीन तऱ्हा होऊन अठरा भेद झाले आहेत.

### आचारत्रय.

(१) सदाचार, नियताचार, गणाचार यां त्रिविध आचारलिंगांमध्यें (२) जो आचार आपल्या सन्मार्गानें सर्व शरणांला संतोषदायक होतो त्याला सदाचार असें ह्मणतात. (३) भक्तीनें आपण धरलेला आचार प्राणांतपर्यंत न सोडतां त्या आचारानें चालणें याला नियताचार असें ह्मणतात. (४) शिवमाहेश्वरांची निंदा जे करतात त्यांना मी शिक्षा करतों अशा प्रतिज्ञेनें जे चालतात त्यांच्या आचाराला गणाचार असें ह्मणतात.

### त्रिविधगुरुलिंग.

(१) दीक्षा, शिक्षा, स्वानुभव असे तीन भेद गुरुलिंगांमध्यें आहेत. (२) त्यांमध्यें आगमोक्त विधानानें कुंडमंडलादिकांची रचना करून त्यानें षडध्वशुध्यादिक करणें याला दीक्षा ह्मणतात. (३-४) जंगमच लिंग आहे अशा निश्चयानें विश्वास

पण ॥ लिंग सत्य ह्मणोन ॥ विश्वासें धारण ॥ निश्चयेसि ॥ ३ ॥ प्रथम सम्यक् ज्ञान ॥ सत्पुरुषापासून ॥ वस्तुगति जाणणें निपुण ॥ ते शिक्षा ह्मणवी ॥४॥ पूर्वजन्मसंस्कार बळ विशेष ॥ वैराग्यें भक्ति ज्ञानादिक ॥ आपाप दिसे प्रत्यक्ष ॥ ते स्वानुभव ह्मणवी ॥५॥

## त्रिविध शिवलिंग.

आणिक इष्टलिंग ॥ प्राणलिंग तृप्तिलिंग ॥ ह्मणोनि शिवलिंग ॥ त्रिविध भेद ॥१॥ त्याचे ठायीं ॥ श्रीगुरूनें आपण ॥ शिवदीक्षा विधानें ॥ दिधलें कृपेनें ॥ तें इष्टलिंग ह्मणवी ॥ २ ॥ देहगुणव्याप्ति त्यजूनि समस्त ॥ शिवलिंगस्वरूपांत ॥ मन मग्न होऊनि अखंडित ॥ तें प्राणलिंग ह्मणवी ॥३॥ सकळ अवस्थाचिये ॥ ठायीं शिवलिंगयुक्तमय ॥ अन्योन्यभावना निःसंशय ॥ तें तृप्तिलिंग ह्मणवी ॥४॥

## जंगमलिंगत्रैविध्य.

आणिक स्वयलिंग ॥ चरलिंग परलिंग ॥ ह्मणोनि जंगमलिंग ॥ त्रिविध त्याचे ठायीं ॥१॥ शिवलांच्छन धरूनि ॥ आपणचि लिंग ह्मणोनि ॥ निश्चयें जाणोनि ॥ बाह्यकर्म ॥२॥ परित्याग साक्षेपें ॥ सदासर्वदा आनंदरूपें ॥ असणें आपणापें ॥ तें स्वयलिंग ह्मणवी ॥ ३ ॥ शिवलिंगयुक्त समस्त ॥ इंद्रियमग्न होऊनि अखंडित ॥ भेदभ्रांति किंचि-

---

धरणें वगैरे उत्तम ज्ञान सत्पुरुषांकडून मिळविणें याला शिक्षा असें ह्मणतात. (५) पूर्वजन्मसंस्कार बलानें भक्तिज्ञानादिक आपोआप होणें याला स्वानुभव ह्मणतात.

### त्रिविध शिवलिंग.

(१) इष्टलिंग प्राणलिंग, तृप्तिलिंग असे तीन भेद शिवलिंगामध्यें आहेत. (२) त्यांमध्यें शिवदीक्षा देऊन श्रीगुरु जें लिंग शिष्याला देतो, त्याला इष्टलिंग असें ह्मणतात. (३) देहगुणव्याप्ति सोडून शिवलिंगस्वरूपामध्यें मन पोंचविणें याला प्राणलिंग असें ह्मणतात. (४) सकल अवस्थेमध्यें (कोणत्याही स्थितींत) शिवलिंगालाच अनन्यभावानें भजणें याला तृप्तिलिंग ह्मणतात.

### जंगमलिंगत्रैविध्य.

(१) स्वयलिंग, चरलिंग, परलिंग असे तीन भेद जंगमलिंगामध्यें आहेत. (२) त्यांमध्यें शिवचिन्ह धारण केलेला मानवच लिंग आहे असें जाणून बाह्यकर्में (३) सोडून नेहमीं आनंदांत राहणें याला स्वयलिंग ह्मणतात. (४) शिवलिंगाशीं सग-

त्र ॥ न उपजतां ॥४॥ निजानंदें भरित बाह्यांतरें ॥ आपुलेनि इच्छामात्रें ॥ स्वतंत्र विचरे ॥ तें चरलिंग ह्मणवी ॥५॥ स्थावरजंगमादि ॥ अखिल उपाधि ॥ आपण अधिष्ठातृ उपलब्धी ॥ झाला तो परलिंग ॥६॥

### त्रिविधप्रसादलिंग.

आणिक शुद्ध ॥ सिद्ध प्रसिद्ध ॥ ह्मणोनि प्रसाद ॥ लिंगत्रिविध ॥१॥ त्याचे ठायीं ॥ गुरुभुक्त शेष तें ह्मणवी शुद्ध ॥ लिंगभुक्तशेष तें ह्मणवी सिद्ध ॥ जंगमभुक्तशेष तें प्रसिद्ध ॥ प्रसाद ह्मणवी ॥ २ ॥ आणिक एक प्रसंग ॥ पूर्वसकळ कर्मगुण परित्याग ॥ कामादिरहित वसे अकल्पित भोग ॥ लिंगधारण करून तो शुद्ध ह्मणवी ॥३॥ शिवज्ञानोदयानें ॥ प्रकाशत्वें पूर्णपणें ॥ तृप्तिरूपें असणें ॥ तें सिद्ध ह्मणवी ॥४॥ सोहंभाव अखंडित ॥ सकल कल्पनेविरहित ॥ असणें निश्चलीकृत ॥ तो प्रसिद्ध ह्मणवी ॥५॥

### त्रिविधमहालिंग.

आणिक पिंडजलिंग ॥ अंडजलिंग बिंद्वाकाशलिंग ॥ ह्मणोनि महालिंग ॥ त्रिविध त्याचे ठायीं ॥ १ ॥ देह तेंचि देऊळ ॥ आत्मा तें लिंग केवळ ॥ ह्मणोनि भाव निश्चळ ॥ तें पिंडजलिंग ह्मणवी ॥ २ ॥ भूतेंचि

---

त्या इंद्रियांचें ऐक्य करून भेदभ्रांति पुनः न येऊं देतां (५) निजानंदांत स्वेच्छेनें विहार करणें याला चरलिंग ह्मणतात. (६) स्थावर जंगम सर्व पदार्थांचा अधिष्ठाता मीच आहे असें मानणें याला परलिंग असें ह्मणतात.

### त्रिविधप्रसादलिंग.

(१) शुद्ध, सिद्ध, प्रसिद्ध असे तीन भेद प्रसादलिंगामध्यें आहेत. (२) त्यांमध्यें गुरूनें भोजन करून राहिलेल्या पदार्थाला शुद्ध ह्मणतात. लिंगभुक्त शेषाला सिद्ध असें ह्मणतात. जंगमभुक्त शेषच प्रसिद्ध होय. (३) अथवा पूर्वी असलेले सर्व गुण सोडून कामादिक सर्व सोडून शिवलिंगासक्त होऊन राहणें याला शुद्ध ह्मणतात. (४) शिवज्ञानोदयानें पूर्णपणें तृप्त होऊन राहणें याला सिद्ध ह्मणतात. (५) शिवोहंभावानें निश्चल होऊन राहणें याला प्रसिद्ध ह्मणतात.

### त्रिविधमहालिंग.

(१) पिंडजलिंग, अंडजलिंग, बिंद्वाकाशलिंग, असे तीन भेद महालिंगामध्यें आहेत. (२) त्यांत देहच देऊळ असून आत्माच लिंग आहे असा जो निश्चय आहे त्याला पिंडजलिंग ह्मणतात. (३) पृथ्वीच पीठ असून आकाशच लिंग आहे.

पीठ आकाश तें लिंग ॥ ह्मणोनि विकल्पविरहित ॥ दृढभावना अखंडित ॥ तें अंडजलिंग ह्मणवी ॥३॥ आकाश तें आपणांत आपण ॥ आपणांत आकाश अन्योन्य ॥ व्याप्त होऊनि समाधान ॥ तें बिंद्वाकाशलिंग ह्मणवी ॥४॥

## आचारलिंगषड्भक्त.

आणिक भक्तचि विशेष ॥ आचारादि षड्विध ॥ लिंगाचे ठायीं विविध ॥ वर्तनाभेदें ॥१॥ षट्षट् होऊनि विशेषें ॥ छत्तीस प्रकार होऊनि असे ॥ ते कवण कैसे ह्मणतिलें तरी ॥२॥ आचारलिंग मोही ॥ आचारलिंगभक्त ॥ आचारलिंग पूजक पै ॥३॥ आचारलिंग वीरआचारलिंगप्रसादि ॥ आचारलिंगप्राणी ह्मणोनि इत्यादि ॥ आचारलिंग संबंधि ॥ षट्प्रकार ॥४॥ त्यांचे ठायीं ॥ आचारहीन पूर्वाश्रित ॥ स्त्रीपुत्रादि त्यजूनि समस्त ॥ निर्मोहि होऊनि संतत ॥ तो आचारलिंगमोही ॥५॥ शिवाचारासी विरोध ॥ झाला आपला पूर्वाचार संबंध ॥ तो त्यजूनि असे तो शुद्ध ॥ आचारलिंग भक्त ॥६॥ अन्य दैवतभजन ॥ त्यजूनिया निपुण ॥ लिंगार्चनीं अवधान ॥ तो आचारलिंगपूजक ॥ ७ ॥ आपण धरिला आचार ॥ प्राणांत झालिया साचार ॥ तरी न सोडी

---

अशी जी विकल्परहित भावना आहे, तिला अंडजलिंग ह्मणतात. (४) आकाश आपल्या बरोबर आहे आणि आकाशाबरोबर आपण आहों अशी जी अन्योन्यव्याप्ति आहे तिच्या अनुसंधानाला बिंद्वाकाशलिंग ह्मणतात.

## आचारलिंगषड्भक्त.

(१) भक्तच आचारादि षड्विधलिंगांमध्यें वर्तनभेदानें (२) प्रथम षड्विध षड्विध होऊन नंतर छत्तीस तऱ्हेचा झाला आहे.ते प्रकार असे कीं, (३) आचारलिंगमोही, आचारलिंगभक्त, आचारलिंगपूजक, (४) आचारलिंगवीर, आचारलिंगप्रसादी, आचारलिंगप्राणी असे आचारलिंगाचे सहा प्रकार होत. (५) त्यांमध्यें आचारहीन अशा बायकापोरांना सोडून मोह सोडून राहणारा तो आचारलिंगमोही जाणावा. (६) शिवाचाराविरुद्ध पूर्वजांची वागणूक परंपरेनें चालत आलेली असेल तर ते आचार सोडून वागणारा तोच आचार लिंगभक्त जाणावा. (७) अन्यदेवता भजन सोडून केवळ लिंगार्चनतत्पर जो असेल तोच आचारलिंगपूजक जाणावा. (८) एकदा पत्करलेला आचार प्राण असेपर्यंत जो सोडील

निर्धार ॥ तो आचारलिंगवीर ॥८॥ शुचित्व अशुचित्वादि समस्त ॥ संकल्पविकल्पादि रहित ॥ होऊनि असे कृतार्थ ॥ तो आचारलिंगप्रसादी ॥९॥ शिवमाहेश्वर ॥ तयाची निंदा लेशमात्र ॥ न साहे तो आचारलिंग प्राणी ह्मणवी ॥१०॥

## गुरुलिंगषड्भक्त.

गुरुलिंगमोही गुरुलिंगभक्त ॥ गुरुलिंगपूजक गुरुलिंगवीर ॥ गुरुलिंगप्रसादी गुरुलिंगप्राणी ॥ त्यांचे ठायीं ॥१॥ आणिक मातृपितृयांचे ॥ मोहादिक सोडूनि गुरूचे ॥ ठायीं अतिप्रीति साचे ॥ तो गुरुलिंगमोही ॥२॥ बंधुजनाचे उपचार सकळ ॥ त्यजूनि गुरुसंगें अनुकूळ ॥ होऊनि असे सर्वकाळ ॥ तो गुरुलिंगभक्त ॥ ३ ॥ भिन्न एकही पूजा न करी ॥ गुरुभजनीं निरंतरी ॥ असे सर्व प्रकारीं ॥ तो गुरुलिंगपूजक ॥४॥ अन्यमार्ग उपरति ॥ करूनि गुरूची उक्ति ॥ सन्मार्गें वर्ती ॥ तो गुरुलिंगवीर ॥ ५ ॥ गुर्वाज्ञानुसंधानीं ॥ सदासर्वदा होऊनि ॥ असे राहणी ॥ तो गुरुलिंगप्रसादी ह्मणवी॥६॥अन्यसेवा उपचार ॥ परित्यागूनि सद्गुरूसेवा तत्पर ॥होऊनि असे निरंतर॥तो गुरुलिंगप्राणी ॥७॥

---

नाहीं तोच आचारलिंगवीर जाणावा. (९) शुचित्व आणि अशुचित्व इत्यादिकांचा संकल्प ज्याच्या मनांत येत नाहीं तोच आचारलिंगप्रसादी जाणावा.(१०) शिवमाहेश्वरांची निंदा थोडी देखील सहन जो करीत नाहीं तोच आचारलिंगप्राणी जाणावा.

## गुरुलिंगषड्भक्त.

(१) गुरुलिंगमोही, गुरुलिंगभक्त, गुरुलिंगपूजक, गुरुलिंगवीर, गुरुलिंगप्रसादी, गुरुलिंगप्राणी, असे गुरुलिंगामध्यें सहा भेद आहेत. (२) त्यांमध्यें मातापितरांचा मोह सोडून गुरूच्या ठिकाणीं प्रेम करणारा तोच गुरुलिंगमोही होय. (३) बंधुबांधवांच्या उपचारांकडे दुर्लक्ष करून गुरूच्या ठिकाणीं अनुराग ठेवणारा तोच गुरुलिंगभक्त होय. (४) इतर पूजा सर्व सोडून केवळ गुरूचीच पूजा करणारा तोच गुरुलिंगपूजक होय. (५) इतर मार्ग सोडून गुरूनें सांगितलेल्या मार्गाचें अवलंबनच जो करतो तोच गुरुलिंगवीर जाणावा. (६) नेहमीं गुरूच्या आज्ञेंत राहणारा तोच गुरुलिंगप्रसादी जाणावा. (७) अन्यसेवा व अन्य उपचार सोडून जो गुरुसेवेंत तत्पर असतो तोच गुरुलिंगप्राणी समजावा.

## शिवलिंगषड्भक्त.

शिवलिंगमोही शिवलिंगभक्त ॥ शिवलिंगवीर शिवलिंगपूजक ॥ शिवलिंगप्रसादी शिवलिंगप्राणी इति षट्कप्रकार त्यांचेठायीं ॥१॥ आणिक अन्य समस्त ॥ साकार साभास पदार्थ ॥ मोहादि रहित ॥ तो शिवलिंगमोही ॥२॥ अन्यत्र सकळ ॥ देवतादिक समेळ ॥ निरसूनि निश्चळ ॥ तो शिवलिंगभक्त ॥३॥ आणि एक देवता अन्य ॥ होऊनिया आपण ॥ न करी कदा भजन ॥ तो शिवलिंगपूजक ॥४॥ भिन्न पुण्यक्षेत्र तीर्थयात्रा ॥ पर्वकाळीं समस्त ॥ आपण न प्रवर्तें तेथ ॥ तो शिवलिंगवीर ॥५॥ अकल्पित गुण ॥ दोषादिक बंधन ॥ सुखदुःख सैरण ॥ तो शिवलिंग प्रसादी ॥ ६ ॥ लावण्यगुणयुक्त ॥ यौवनस्त्रियादि संघात ॥ संभोग विरहित ॥ तो शिवलिंगप्राणी ह्मणवी ॥७॥

## जंगमलिंगषड्भक्त.

जंगमलिंगमोही जंगमलिंगभक्त ॥ जंगमलिंगवीर जंगमलिंगपूजक ॥ जंगमलिंगप्रसादी जंगमलिंगप्राणी ॥ इति षट्प्रकार ॥१॥ त्यांचे ठायीं आणिक जेणें आपुला ॥ पूर्वाश्रित पहिला ॥ आचार निषेधिला ॥ तो

---

### शिवलिंगषड्भक्त.

(१) शिवलिंगमोही, शिवलिंगभक्त, शिवलिंगपूजक, शिवलिंगवीर, शिवलिंगप्रसादी, शिवलिंगप्राणी असे सहा भेद शिवलिंगामध्यें आहेत. (२) त्यांत साकार साभास सर्व इतर मोह नसणारा तोच शिवलिंगमोही होय. (३) अन्य देवतांचें निराकरण करून केवळ शिवलिंगभजन करणारा तोच शिवलिंगभक्त होय. (४) अन्यदेवतांची सेवा न करणारा तोच शिवलिंगपूजक होय. (५) इतर पुण्यक्षेत्रयात्रा न करणारा तोच शिवलिंगवीर होय. (६) सुखदुःखादि द्वंद्वें सहन करणारा तोच शिवलिंगप्रसादी होय.(७)स्त्रीसंभोगादिक सोडलेला तोच शिवलिंगप्राणी होय.

### जंगमलिंगषड्भक्त.

(१) जंगमलिंगमोही, जंगमलिंगभक्त, जंगमलिंगपूजक, जंगमलिंगवीर, जंगमलिंगप्रसादी, जंगमलिंगप्राणी असे सहा भेद जंगमलिंगाचे होत. (२) त्यांमध्यें आपल्या पूर्वाचाराचा निषेध ज्यानें केला आहे, त्याला जंगमलिंगमोही ह्मणतात.

जंगमलिंगमोही ॥ २ ॥ जातिकुलादिक ॥ अभिमान विशेख ॥ त्यजिला तो पूर्वक ॥ जंगमलिंगभक्त ॥ ३ ॥ अन्य एक पूजा आचार ॥ त्यावरि अनादर ॥ न करी अंगीकार ॥ तो जंगमलिंगपूजक ॥४॥ देह अर्थ प्राण जंगमासी समर्पण ॥ करूनि न मोहें आपण ॥ तो जंगमलिंग-वीर ॥५॥ जंगमासी समर्पण ॥ सकल द्रव्य केल्यावीण ॥ न स्वीकारी आपण ॥ तो जंगमलिंगप्रसादी ॥६॥ जंगम तोचि सर्वथैव ॥ साक्षात् आपण शिव ॥ ह्मणोनि विश्वास भाव ॥ तो जंगमलिंगप्राणी ह्मणवी ॥७॥

## प्रसादलिंगषड्भक्त.

प्रसादलिंगमोही प्रसादलिंगभक्त ॥ प्रसादलिंगपूजक प्रसादलिंग-वीर ॥ प्रसादलिंगप्रसादी प्रसादलिंगप्राणी ॥ इति षट्प्रकार ॥१॥ त्याचे ग्रर्थी ॥ आणिक भिन्न एक ॥ रुचि स्वादादिक ॥ नेणें तो पूर्वक ॥ प्रसादलिंगमोही ॥२॥ पूर्व आहार ॥ त्यजूनि निश्चलाकार ॥ झाला तो साचार ॥ प्रसादलिंगभक्त ॥ ३ ॥ आणिक अन्य जन ॥ संगें स्नेह सं-भाषण॥दानप्रतिग्रहादि विलक्षण॥तो प्रसादलिंगपूजक॥४॥अन्यद्रव्या-दिक ॥ न स्पर्शे हस्तें किंचिदेक ॥ तो आपण विशेख ॥ प्रसादलिंग-वीरह्मणवी॥५॥जीवहिंसादिक ॥ न करी आपण किंचिदेक ॥ अथवा न

---

(३)जात्यभिमान कुलाभिमान वगैरे सोडलेला तोच जंगमलिंगभक्त होय. (४)अ-न्यदेवतेच्या पूजेकडे ज्याचें मन धांवत नाहीं तोच जंगमलिंगपूजक होय. (५) अर्थ, प्राण यांचा अभिमान सोडून ते सर्व जंगमास देऊन पुनः त्यांकडे ढुंकून देखी-ल न पाहणारा तोच जंगमलिंगवीर होय. (६) जंगमास सर्व द्रव्य अर्पण केल्या-शिवाय आपण घेत नाहीं तोच जंगमलिंगप्रसादी होय. (७) जंगमच साक्षात् शिव आहे असा विश्वास ठेवणारा तोच जंगमलिंगप्राणी होय.

### प्रसादलिंगषड्भक्त.

(१) प्रसादलिंगमोही, प्रसादलिंगभक्त, प्रसादलिंगपूजक, प्रसादलिंगवीर, प्र-सादलिंगप्रसादी, प्रसादलिंगप्राणी असे सहा भेद प्रसादलिंगाचे होत. (२) त्यांम-ध्यें इतर पदार्थांची गोडी ज्याला नाहीं, तोच प्रसादलिंगमोही होय. (३) पूर्वा-हाराचा त्याग केलेला तोच प्रसादलिंगभक्त होय. (४) इतरांशीं स्नेह, संभाषण, दान, प्रतिग्रह वगैरे व्यवहार सोडलेला तोच प्रसादलिंगपूजक होय. (५) इतरांचें द्रव्य हातानें देखील शिवत नाहीं तोच प्रसादलिंगवीर होय. (६) जीवहिंसा व-

करवी मुख्य ॥ तो प्रसादलिंगप्रसादी ॥ ६ ॥ आत्मनिग्रहातें ॥ करूनि जो प्रवर्ते ॥ तो ह्मणवी निरुतें ॥ प्रसादलिंगप्राणी ॥७॥

## महालिंगषड्भक्त.

महालिंगमोही महालिंगभक्त ॥ महालिंगपूजक महालिंगवीर ॥ महालिंगप्रसादी महालिंगप्राणी ॥ इति षट्प्रकार त्याचे ठायीं ॥१॥ आणिक लोक समस्त ॥ तयांचा वृत्तान्त ॥ नाठवी कदाचित् ॥ तो महालिंगमोही ॥ २ ॥ पूर्वभक्त्यादि ॥ गुण कथानुसंधान ॥ न करी तो आपण ॥ महालिंगभक्त ॥३॥ अज्ञानी बहुजन ॥ संयोगें संभाषण॥ न करी तो आपण ॥ महालिंगपूजक ॥ ४ ॥ उत्पत्ति स्थिति ॥ संहार इति ॥ कदा न चिंती ॥ तो महालिंगवीर ॥५॥ पंक्तिसंयोग ॥ भोजनप्रयोग ॥ न करी तो महालिंग ॥ प्रसादी निरुत ॥६॥ बाह्यार्चन बाह्यार्पण ॥ न करितां आपण ॥ असे आंतरक्रियानिष्ठ होऊन ॥ तो महालिंगप्राणी ह्मणवी ॥७॥

## एकशेएकस्थलें.

आणिक इति षट्स्थळ ॥ भेदोपभेद सकळ ॥ विचारें जाणिजे केवळ ॥ वर्तणुकीचे ठायीं ॥१॥ पिंडादिज्ञान शून्यान्त ॥ एकोत्तरशत॥

---

गैरे आपण स्वतः कोठें करीत नसून इतरांकडूनहि न करविणारा तोच प्रसादलिंगप्रसादी होय. (७) आत्मनिग्रह करून राहणारा तोच प्रसादलिंगप्राणी होय.

### महालिंगषड्भक्त.

(१) महालिंगमोही, महालिंगभक्त, महालिंगपूजक, महालिंगवीर, महालिंगप्रसादी, महालिंगप्राणी असे सहा भेद महालिंगाचे होत. (२) त्यांमध्यें लोकवृत्तांत स्मरण न करणारा तोच महालिंगमोही होय. (३) पूर्वभक्ति गुणकथा वगैरेचें अनुसंधान जो करीत नाहीं तोच महालिंगभक्त होय. (४) अज्ञान्याबरोबर सहवास, संभाषण वगैरे न करणारा तोच महालिंगपूजक होय. (५) उत्पत्ति, स्थिति, लय यांचें चिंतन न करणारा तोच महालिंगवीर होय. (६) पंक्ति भोजनादिक सोडलेला तोच महालिंगप्रसादी होय. (७) बाह्यक्रिया, अर्चन, अर्पण सोडून अंतरंग पूजा वगैरे क्रिया करणारा तोच महालिंगप्राणी होय.

### एकशेएकस्थळें.

(१) एकूण षट्स्थलभेदोपभेदांची बेरीज केली असतां (२) पिंडादि ज्ञानशू-

स्थळें परिक्रमें निश्चित ॥ होऊनि असती ॥२॥ तया एकोत्तरशतस्थळ॥ अंतु प्रथम अंगस्थळें चव्वेचाळ ॥ ह्मणवी वरि लिंगस्थळ ॥ सत्तावन ह्मणवी ॥ ३॥ तयांत चव्वेचाळीस अंगस्थळें ॥ तीं भक्तादिऐक्यान्त अंगस्थळें ॥ तयासि परिक्रमें सकळ ॥ विभागि होऊन असती ॥४॥ आणिक जी लिंगस्थळें पन्नास वरिसप्त ॥ तीं आचारादि महालिंगान्त ॥ षड्लिंगस्थळासि क्रमें समस्त ॥ विभाग होऊनि असती ॥५॥ या अनुक्रमें भक्तादि ऐक्यान्त॥ षडंगस्थळें तीं तनुत्रयांतवर्तत॥ ते लिंगत्रयानुगुण्य होऊनि प्रवर्तत ॥ असतीं निरुते ॥६॥ ह्मणोनि इति ॥ लिंगांगस्थळ कुलादिपर्यंत ॥ सन्निध जाणोन समस्त ॥ विचारमुखें ॥७॥ गुरुलिंग जंगमीं तनुमनधन ॥ वंचनें विलक्षण होऊन ॥ सकळ सदाचार संपूर्ण ॥ प्रज्ञासहित ॥८॥ भक्तिस्थळ अंगीकार ॥ करूनि असे निरंतर ॥ तो विशेष वीरशैव ह्मणवी ॥९॥

## निराभारिवीरशैवविषय.

आणिक गृहादि मुख्य ॥ अखिल विभवादिक॥ संसारसुख॥ परिग्रह त्यजूनि ॥ १ ॥ विद्या ते सतीसहित ॥ संतोष तो सुत ॥ विराग तो बंधु संतत ॥ क्षमा ते परिचारिका ॥ २॥ शांति ते सखा भक्ति ते मा-

---

न्तापर्यंत एकशेएक स्थलें होतात. (३) त्यांमध्यें प्रथम अंगस्थलें चव्वेचाळीस असून लिंगस्थलें सत्तावन आहेत. (४) त्यांमध्यें जीं अंगस्थलें चव्वेचाळीस आहेत तीं भक्तादि ऐक्यान्त षट्स्थलांतच क्रमानें विस्तृत झालीं आहेत. (५--६) आणि तीं सत्तावन्न लिंगस्थलें आचारादि महालिंगान्त षट्स्थलास धरून विभक्त होऊन क्रमानें भक्तादि ऐक्यान्त सहा अंगस्थलांच्या तनुत्रयावर लिंगत्रयाला अनुसरून वर्ततात (७) अशा लिंगांगस्थल कुलसंबन्ध विचारमुखानें (८) गुरु लिंग जंगम यांस तनु मन धनांनीं वंचना न करितां सदाचारसंपन्न होऊन (९) भक्तिस्थलाचा अंगीकार करणारा तोच विशेष वीरशैव होय.

## निराभारिवीरशैवविषय.

(१) त्यां वीरशैवांमध्यें गृह वगैरे सर्व संसाराचें सुख सोडून (२) विद्याच बायको करून संतोषाला मुलगा मानून विरागाला बंधु समजून क्षमा ही परिचारिका समजतो. (३) आणि शांतिच मित्र आहे असें मानून भक्तीलाच मातोश्री स-

ता ॥ आचार तो पिता॥ सत्य ते सुता ॥ पुत्र वनिता ॥ ते श्रद्धा जाणा- वी ॥३॥ मैत्र्यादिसद्गुण ते पौत्र ॥ ज्ञान तें देह विचार तें क्षेत्र ॥ अ- हिंसा ते साचार ॥ दासादिक ॥४॥ अस्तेय तें सेवकजन धर्म तें वा- हन ॥ दम तो आचार्याकारण ॥ मुक्ति तो देश ॥ ५॥ इत्यादि पारमा- र्थिक ॥ कुटुंबधारी होऊन पूर्वक ॥ संचारी कंथादंडकमंडल्वादि- क ॥ भिक्षापात्र भस्मघुटिका ॥६॥ ह्मणिजे पंचप्रकार ॥ मुद्रा बाहेर॥ तया तया निरंतर ॥ मंत्र पूर्वकें धरूनि ॥७॥ यानंतरें अंतरीं समता॥ते कंथा ज्ञान तो दंडदया ॥ तो कमंडलु वैराग्य ते भिक्षापात्र क्षमा॥ ते भ- स्मघुटिका सहित ॥८॥ शिखाजटामुंडिताकार ॥ अजिन वल्कलदिगं- बर ॥ इत्यादि स्वेच्छा विचित्र ॥ शिववेष स्वीकारूनि ॥९॥ यथायो- ग्य भिक्षाहार घेऊन ॥ भस्मोध्दूलन त्रिपुंड्रधारण ॥ शिवलिंगार्चन शिवध्यान ॥ शिवमंत्र जप ॥१०॥ शिवस्थळ कुळविचारण ॥ लिंगांग- संयोगादिज्ञान ॥ क्रियादिकसंपन्न ॥ होऊनिया ॥ ११ ॥ रसरसायन वादवश्य ॥ ज्योतिष गारुडादि क्रिया बहुवस ॥ लौकिकव्यवहार क्र- यविक्रय निःशेष ॥ त्यजूनिया ॥१२॥ वनितादि समस्त ॥ विषयपदा-

---

भजून आचाराला बाप मानून सत्याला मुलगी समजतो आणि श्रद्धेला सून मानून (४) मैत्र्यादि सद्गुणांलाच नातु पणतु समजतो; ज्ञान तें देह असून विचारच क्षेत्र आहे, अहिंसाच दासी असून (५) अस्तेयच दास आहे, धर्मच वाहन अ- सून दमच आचार्य आहे, मुक्तिच देश आहे, (६) अशा रीतीनें मानून या पार- मार्थ कुटुंबानें युक्त होऊन कंथा, कमंडलु, दंड, भिक्षापात्र, भस्मघुटिका (७)अशा पांच तऱ्हेच्या बाह्यमुद्रा तत्तन्मंत्रपूर्वक धारण करतो (८) व अंतरंगांत समतारूप कंथा, ज्ञानरूप तो दंड, दयारूप कमंडलु, वैराग्यरूप भिक्षापात्र, क्षमारूप भस्म- घुटि अशा पांच मुद्रा धारण करतो. (९) शिखी असतो, किंवा जटी असतो, किंवा मुंडी असतो, कृष्णाजिन धारण करतो, अथवा वल्कल धारण करतो किंवा दिगंबर असतो. याप्रमाणें स्वेच्छानुसार विचित्र शिववेष धारण करून हिंडतो. (१०) नियमित भिक्षाहार घेतो, भस्मोध्दूलन, त्रिपुंड् धारण, शिवलिंगार्चन, शि- वध्यान, शिवमंत्रजप (११) शिवस्थलकुलविचार, लिंगांगसंयोगज्ञान इत्यादि क्रि- यासंपन्न होऊन (१२) रस, रसायन, वाद, वश्य, ज्योतिष, क्रयविक्रय गारुड व- गैरे लौकिक व्यवहार सोडून (१३) स्त्री वगैरे विषयांचे ठिकाणीं विरक्त असून

र्थ ॥ तयासि विरक्त ॥ होऊनि असे ॥१३॥ या भवारण्यांतूनि सर्वथा ॥ लोभ ह्मणिजे पंकांत न रिघतां ॥ इंद्रियें ह्मणिजे रिपूंसि न गणना करितां ॥ मोह ह्मणिजे ॥ १४ ॥ पिशाच भय न धरितां ॥ क्रोध ह्मणिजे व्याघ्रासि न गवसतां ॥ ममता ह्मणिजे सर्पास न भितां ॥ मन्मथ ह्मणिजे ॥१५॥ चोरासि न वश होतां ॥ मद ह्मणिजे अंधकारीं न भुलतां तापत्रयें ह्मणिजे खड्डे रानां न पडतां ॥ विषय ह्मणिजे ॥१६॥ कंटकावरि पाद न ठेवितां ॥ असूया ह्मणिजे विषलतेंत न गुंतता ॥ अहंकार ह्मणिजे डोहीं न बुडतां ॥ सर्वावधान होऊन ॥ १७ ॥ जंगमस्थळ अंगीकारी ॥ शिवज्ञानारूढ होऊनि जगाभीतरीं ॥ विचरत असे तो निराभारी ॥ वीरशैव ह्मणवी ॥१८॥

## प्राण्यांचें तारतम्य.

आणिक तो षट्स्थळ ॥ ज्ञानी झाला निष्कळ ॥ वीरशैव तो सर्वोत्कर्ष केवळ ॥ ह्मणोनि जाणावें येथें ॥ १ ॥ क्रीमिकीटकपतंगजात्यादिक ॥ तयाहून पशु अधिक ॥ पशूंपरील विशेख ॥ मनुष्य जाति॥२॥ मनुष्यांहूनि द्विज अधिक ॥ द्विजा परीस विप्र विशेख॥ विप्राहूनि क्रतुबुध्यादिक ॥ अधिक ह्मणवी ॥ ३ ॥ क्रतुबुद्धींपरीस ॥ कर्ता आणि

---

(१४) या भवरूप अरण्यामध्यें असलेल्या लोभरूप चिखलांत न जातां, इंद्रियरूप शत्रूंस न जुमानतां, मोहरूप (१५) पिशाचाची भीति मनांत मुळींच न बाळगतां, क्रोधरूप वाघाच्या तावडींत न सांपडतां, ममतारूप सर्पिणीला लक्षांत न आणतां, मन्मथरूप (१६) चोराच्या तावडींत न सांपडतां, मदरूप अंधारांत न जातां, तापत्रयरूप खड्ड्यांत न पडतां, विषयरूप (१७) कंटक न तुडवितां, असूयारूप विषलतेच्या जाळ्यांत न अडकतां, अहंकाररूप डोहांत न बुडतां, सर्वावधान होऊन (१८) जंगमस्थलाचा अंगीकार करून शिवज्ञानारूढ होऊन संचार करणारा तोच निरामारि वीरशैव होय.

## प्राण्यांचें तारतम्य.

(१) षट्स्थलज्ञानी हा वीरशैवच सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे. (२) तेच सांगतात कीं क्रिमिकीटपतंग जातीपेक्षां पशु अधिक आहेत, पशूंपेक्षां मनुष्य श्रेष्ठ आहेत, (३) मानवांमध्यें द्विज श्रेष्ठ आहेत, द्विजांपेक्षां विप्र श्रेष्ठ आहेत, विप्रांपेक्षां क्रतुबुद्धि श्रेष्ठ आहेत. (४) क्रतुबुद्धींपेक्षां कर्ते श्रेष्ठ आहेत, कर्त्यांपेक्षां सं-

विशेष ॥ कर्त्याहूनि सन्यास ॥ अधिक ह्मणवी ॥ ४ ॥ सन्यासीयाहूनि ॥ अधिक जाणिजे ज्ञानी ॥ ज्ञानीयाहूनि ॥ शिवार्चक अधिक ॥५॥ तया शिवार्चकापरीस ॥ लिंगांगसंयोगी विशेष ॥ तयापरि सकळ उत्कर्ष ॥ षट्स्थलज्ञानी ॥६॥ षट्स्थलज्ञानियासमान ॥ त्रैलोक्यांत आणिक कवण ॥ एकही नाहीं ह्मणोन ॥ तयाकारणें ॥७॥ मुमुक्षुत्वें षट्स्थळ ॥ असम ज्ञानी केवळ ॥ झाला वीरशैव तो सकळ ॥ वंद्य पूज्य योग्य ॥८॥ ह्मणूनि जाणावें निभ्रांत ॥ इत्यादि हें समस्त ॥ क्रिया पादांत ॥ प्रतिपादिलें जाणावें ॥९॥

## इति क्रियापादः समाप्तः

---

न्यासी श्रेष्ठ आहेत, (५) संन्यास्यांपेक्षां ज्ञानी श्रेष्ठ आहेत, ज्ञान्यांपेक्षां शिवपूजक श्रेष्ठ आहेत, (६) शिवार्चकांपेक्षां लिंगांगसंगी श्रेष्ठ आहेत, लिंगांगसंगींपेक्षां षट्स्थलज्ञानी श्रेष्ठ होत. (७) षट्स्थल ज्ञान्यासमान तीन लोकांत कोणी श्रेष्ठ नाहीं. (८) मुमुक्षु लोक षट्स्थलज्ञानी वीरशैवांस वंदन करतात, त्यांची पूजा करतात. (९) इत्यादि विषय या क्रियापदांत सांगितले आहेत.

## येथें क्रियापाद समाप्त झाला.



## चर्यापादप्रारंभ.

आणिक परिख्यात ॥ चर्यापादांत ॥ प्रायश्चित्त ॥ पवित्रारोपण ॥१॥ उमामहेश्वरलक्षण ॥ स्कंदनंद्यादि गणेश्वरलक्षण ॥ जपमालादि स· र्वाश्रमादिलक्षण ॥ प्रतिपाद्य ॥२॥ तयांत आश्रमधर्म पद्धति ॥ पुराण आगमोक्ति ॥ प्रतिपादीन यथास्थिति ॥ तें कैसें ह्मणितलें तरी ॥३॥

## आश्रमचतुष्टय.

दधीचि गौतम अगस्त्य ॥ दुर्वास ह्मणिजे चतुर्थ ॥ तयाचेनि अनु- क्रमें संमत ॥ होय तैसे ॥१॥ ब्रह्माविष्णुसूर्यमहेश्वराधिदेवताक ॥ ब्र- ह्मचारी गृहस्थ आणि वानप्रस्थ ॥ यति ह्मणिजे चतुर्थ ॥ आश्रम त्याचे ठायीं ॥ २ ॥

## ब्रह्मचर्याश्रम.

उपनीत होऊन ॥ शिखा यज्ञोपवीत कटिसूत्र कौपीन ॥ धवलांवर घेऊन ॥ कृष्णाजिन ॥१॥ पालाशादि दंड ॥ भस्मरुद्राक्षधारण त्रिपुंड्र ॥ सूत्रोक्तमंत्रानें दृढ ॥ धरूनिया ॥२॥ एककाळ स्नान ॥ उदयमध्य अस्त- मान ॥ संध्यावंदन ॥ पितृमातृसेवा ॥ ३ ॥ इंद्रियनिग्रह वंधुवांधवप्री·

---

## चर्यापाद प्रारंभ.

(१) या चर्यापादांत प्रायश्चित्त, पवित्रारोपण (२) उमामहेश्वरलक्षण, स्कंदनं- दी गणेश्वरलक्षण, जपमालालक्षण, वगैरे सर्व आश्रमांचीं लक्षणें प्रतिपाद्य आहेत. (३) त्यांत आश्रमधर्मपद्धति पुराणांत आगमांत सांगितल्याप्रमाणें येथेंही सांगितली आहे तीं अशी कीं,—

## आश्रमचतुष्टय.

(१) दधीचि, गौतम, अगस्त्य, दूर्वास या चौघां ऋषींस संमत चार आश्रम आहेत. (२) या आश्रमांचे ब्रह्मा, विष्णु, सूर्य, महेश्वर ह्या अधिदेवता होत. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, संन्यास हे चार आश्रम होत. त्यांमध्यें—

## ब्रह्मचर्याश्रम.

(१) उपनीत होऊन शिखा यज्ञोपवीत वगैरे धारण करून कटिसूत्र, कौपीन, शुभ्रवस्त्र, कृष्णाजिन (२) पालाशादि दंड, भस्म रुद्राक्षादिक त्या त्या मंत्रांनीं धा- रण करून (३) एक काल स्नान, उदयमध्यास्ताचेवेळीं संध्यावंदन, पितृमातृसेवा (४) बांधवमैत्री, गुरुकुलवास, वेदाध्ययन, इंद्रियनिग्रह, गुरुदैवतभक्ति, विद्वज्-

ति ॥ गुरुकुलवास वेदाध्ययन अर्ति ॥ गुरुदेवताभक्ति ॥ विद्वज्जन उपास्ति ॥४॥ आचार्यसेवा अग्निकार्य ॥ नित्यनैमित्त्यादिक ॥ कर्मारंभक ॥ सत्य शौचयुक्त ॥५॥ स्त्रक्चंदनवनिता परिधान॥ पादुका त्यागून काम क्रोध दंडन ॥ दुर्वासना लंघून ॥ आवरी आहार भक्षून ॥६॥ ब्राह्मणजाति ॥ अथवा क्षत्रिय जाति ॥ नातरी वैश्य जाति॥ तया गृहीं ॥७॥ क्रमानें सिद्धान्न ॥ घृतपक्वान्न ॥ क्षीरतंडुलफलसाधन ॥ पतिव्रता सुवासिनी हस्तें ॥८॥ भवति भिक्षां देहि ह्मणोन ॥ नातरी कर्मलोप रहित गृहस्थांकडून ॥ भवान् भिक्षां ददातु ह्मणोन ॥ याचना करावी ॥ ९ ॥ पंचाष्ट गेह यात्रा करून ॥ यथालाभासि तृप्त होऊन॥ हस्तपादादिक प्रक्षाळून ॥ द्विस्त्रिराचमन करून ॥ १० ॥ वरि भिक्षान्न आपुलिया ॥ सद्गुरूसि समर्पूनिया ॥ तयाचे आज्ञें करूनिया ॥ मग आपण ॥११॥ पूर्वोत्तराभिमुख होऊन ॥ शुचिभूमीवरि बैसोन ॥ प्रोक्षण परिसेचन करून ॥ चित्रबलिवर्जन करून ॥१२॥ प्राणाय स्वाहा ह्मणोन ॥ इत्यादि मंत्रोच्चारणें ॥ प्राणाहुति देऊन ॥ यथाशास्त्रें बैसावें ॥१३॥ केवळ गणनारहित यथेष्ट भोजन ॥ करून स्वशाखा वेदाध्ययन ॥ आगम मंत्रनियमाध्ययन ॥ दीक्षित होऊनि असे ॥ १४ ॥ इतर मंत्रानुष्ठानादिक ॥ उरलें न करितां पूर्वक ॥ लौकिक वैदिक ॥ अध्या-

---

नोपासना, (५) आचार्यपरिचर्या, अग्निकार्य, नित्यनैमित्तिककर्मानुष्ठान, सत्य, शौच इत्यादि गुणांनीं युक्त होऊन (६) माळ, चंदन, स्त्री, तांबूल, परिधान, पादुका वगैरे सोडून कामक्रोधादिकांचा त्याग करून, दुर्वासना सोडून नियमिताहार घेऊन (७–८–९–१०) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांचे घरीं जाऊन "भवति भिक्षां देहि" असें ह्मणून, सिद्धान्न, घृतपक्व, दूध, तांदूळ, फळें पतिव्रता स्त्रियाकडून किंवा भवान् भिक्षां ददातु, असें ह्मणून कर्मठ गृहस्थ यांच्याकडून घेऊन पांच किंवा आठ घरीं भिक्षान्न मागून यथालाभ तृप्त होऊन, नंतर करचरणप्रक्षालन करून द्विराचमन करून (११) तें अन्न श्रीगुरूस समर्पण करून मग त्यांच्या आज्ञेनें आपण (१२) पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख होऊन पवित्र जमिनीवर बसून प्रोक्षण परिषेचन वगैरे करून चित्रबलि न देतां (१३) "प्राणाय स्वाहा" वगैरे मंत्रांचा उच्चार करून पंच प्राणाहुति देऊन (१४) ग्रासांची गणना न करतां यथेष्ट भोजन करून स्वशाखा वेदवेदागम मंत्रनेमाध्ययनांत तत्पर होऊन (१५) इतर पंचानुष्ठान न करितां लौकिक वैदिक आध्यात्मिक इत्यादि शास्त्रांचा

त्रिकादि शास्त्राभ्यास संतत ॥१५॥ ज्ञानतपः संपत्तीनें ॥ ब्रह्मचर्य व्रतपोषण करून ॥ सद्गुणसंपन्न ॥ युक्त होऊनि असे ॥१६॥ गायित्रीजप निरत होऊन ॥ सूर्याग्नि गुरूंसि देवता मानून ॥ अशौचादिकें अशुचि न होऊन ॥ सांप्रदाय जाणूनि वर्तावें ॥ १७ ॥ गुरुसमान गुरुपत्नीपुत्रांसि सत्कारून ॥ उपाकर्मोत्सर्जनें करून ॥ वेद छंद सवीर्य करून ॥ प्राजापत्यादि व्रत योग्यतेनें ॥१८॥ गायित्री ब्रह्मचारी ॥ प्राजापत्य ब्रह्मचारी ॥ वैदिक ब्रह्मचारी ॥ नैष्ठिक ब्रह्मचारी ॥१९॥ यापरि चतुर्विध होऊन ॥ वेदपूर्वक ब्रह्मविद्याधिकारित्वपणें ॥ ब्रह्मलोकार्ह होऊन ॥ सुलभ सुखाश्रमीं वर्ते तो ब्रह्मचारी ॥२०॥

## गृहस्थाश्रम.

आणिक त्या ब्रह्मचारी ॥ आश्रमाभीतरीं ॥ वेदाध्ययनपरि ॥ पूर्ण झाल्यानंतर ॥ १ ॥ तया ब्रह्मचाऱ्यासि अत्यंत ॥ विराग उपजला तरी वानप्रस्थ ॥ आश्रम वा यत्याश्रम ॥ स्वीकारी ॥२॥ आचार्यासि ॥ प्रिय धन देऊनि परि ॥ आणिक प्रजातंतु विच्छेद न करी ॥ धर्मप्रजासंपत्यर्थ ॥ ३ ॥ पितृऋण मोचन व्हावया ॥ वेदानुशासन असे गृहस्था-

---

भ्यास नेहमीं करीत असून (१६) ज्ञानतपःसंपत्तीनें ब्रह्मचर्य व्रत पाळून सद्गुणसंपन्न असावें (१७) गायत्रीजप तत्पर होऊन सूर्य, अग्नि, गुरुच देवता आहेत, अशी भावना ठेवून अशौचादिकांनीं अशुचिपणाचा दोष न लावून घेतां सांप्रदाय जाणून वागणूक ठेवणारा (१८) गुरूप्रमाणें त्यांची पत्नी, त्यांचा मुलगा, यांचा सत्कार करून उपाकर्म उत्सर्जन यांनीं वेदछंदाला सवीर्य करून प्राजापत्यादि व्रत योग्यतेनें (१९) गायत्री ब्रह्मचारी, प्राजापत्य ब्रह्मचारी, वैदिक ब्रह्मचारी, नैष्ठिक ब्रह्मचारी (२०) असा चतुर्विध ब्रह्मचारी होऊन वेदपूर्वक ब्रह्मविद्याधिकारी झाल्यामुळें ब्रह्मलोकार्ह होऊन सुलभ सुखाश्रमी होऊन राहणारा तो ब्रह्मचारी होय.

## गृहस्थाश्रम.

(१) त्या ब्रह्मचर्यामध्यें वेदाध्ययन वगैरे चांगल्या तऱ्हेनें झाल्यानंतर (२) त्यास वैराग्य येऊन वानप्रस्थाश्रम स्वीकारावयाचा झाल्यास किंवा यत्याश्रम घ्यावयाचा झाल्यास (३) आचार्यास प्रियधन देऊन टाकावें. प्रजातंतु विच्छेद न होऊं देतां धर्मप्रजासंपत्तीकरितां (४) पितृऋणमोचनाकरितां गृहस्थाश्रमी झालें

श्रमी व्हावया ॥ प्रवृत्तिपर त्या त्या ॥ ब्रह्म कश्यप मनु ॥४॥ आणिक गौतमादि महर्षिमतें करून ॥ ब्रह्मचर्यानंतर गार्हस्थ्य हा विधि जाण॥ योग्य प्रापंचिक विषय साधन ॥ भोगावया रागयुक्त झाला तरी ॥५॥ आचार्याज्ञें करून ॥ व्रतसमावर्तन ॥ आणिक स्नातकादि करून ॥ ब्रह्मचर्य त्यागावें ॥६॥ शकुनादिक पाहून ॥ स्वजातींत शास्त्रोक्त लक्षणसंपन्न ॥ कन्यापरिग्रह यथाविधि करून ॥ नित्याग्निहोत्र ॥७॥ आणिक यज्ञदान ॥ तपः स्वाध्यायलोप न करितां जाण ॥ इतराश्रमींचें पोषण ॥ करूनिया ॥८॥ धर्मलोपन करून ॥ सदाचारसंपन्न होऊन॥ सकळ पुरुषार्थ साधन ॥ पावावया ॥९॥ योग्य होऊन ॥ असे तो गृहस्थ जाण ॥ ऐसे शास्त्रविधान ॥ सांगे निश्चयें ॥१०॥

## कन्यादुर्लक्षण.

विवाहार्थ कन्यावरण ॥ कन्यालक्षण ॥ विधिपूर्वक जाणून ॥ करावें लग्न ॥१॥ तें कैसें ह्मणितलें तरी ॥ वृक्षादि पक्षि जाती ॥ नदी उकरडा पद्धति ॥ ओढा गिरि नक्षत्र इति ॥२॥ पर्याय नामयुक्त कन्येस ॥ रेफ लकार उपान्त्य ॥ समाक्षर नामयुक्त ॥ ऐशा कन्येतें वर्जावें ॥३॥ अन्यास मनोदत्त ॥ आणिक वाग्दत्त ॥ धारादत्त ॥ कन्येसि ॥४॥

---

पाहिजे असा वेदाचा निर्बंध असल्यामुळें प्रवृत्तिमार्गपर, ब्रह्मा, कश्यप, मनु, (५) गौतम वगैरे महर्षींच्या मतानें ब्रह्मचर्याश्रमानंतर गार्हस्थ्याला जाणें हा विधि असल्यामुळें युक्त प्रापंचिक विषयभोग घ्यावयाकरितां अनुरागयुक्त झाला तर (६) आचार्यांच्या आज्ञेनें व्रतसमावर्तनस्नातक वगैरे करून ब्रह्मचर्य सोडून दुसऱ्या आश्रमांत जावें. (७) त्याकरितां प्रथम स्वजातींत शकुनादिक पाहून शास्त्रोक्तलक्षणयुक्त कन्या पाहावी. तिचा परिग्रह करावा. नंतर नित्याग्निहोत्र (८) यज्ञ दान तपःस्वाध्यायादिकांचा लोप न होऊं देतां इतराश्रमांचें पोषण करीत (९-१०) धर्मलोप न करतां सदाचारसंपन्न होऊन सकल पुरुषार्थास योग्य झालेला तोच गृहस्थाश्रमी होय.

## कन्यादुर्लक्षण.

(१) विवाह करून घेण्याकरितां कन्येचीं लक्षणें यथाशास्त्र पाहावींत (२) तो प्रकार असा कीं, वृक्ष, पक्षी, ओढा, यक्षजाति, उकरडा, पर्वत, नदी, नक्षत्र (३) यांचीं नांवें असलेल्या कन्येशीं विवाह करूं नये. रेफ लकारच उपांत्य अक्षरें जिच्या नांवाला आहेत व जिचें नांव समाक्षर आहे ती वर्ज करावी. (४) इतरांस म-

स्थूलांगी दीर्घकाय असोन ॥ कुब्जा केश ताम्रवर्ण ॥ कौंजी स्थूल नासिका जाण ॥ ग्रन्थियुक्त भिवया ॥ ५ ॥ नाना विकारयुक्त ॥ अधिकांगुलियुक्त ॥ अंगलोप अपसव्यावर्त ॥ उभे रोम ॥६॥ ऱ्हस्व कंठीं दुर्गंध स्वेदयुक्त कक्ष जाण ॥ लंबोष्ठी महोदरा असोन ॥ वक्रपाद आळशी जाण ॥ अपस्वरा धृष्ट ॥७॥ रुग्ण चालतां भूमि दणाणी ॥ पैंग कलहयुक्त असोन ॥ अत्याशा वैधव्य लक्षण ॥ युक्त कन्या वर्जावी ॥८॥ नक्षत्र गोत्रासि अनुकूल नसोन ॥ बंधुसंबंधीं अनिष्ट असोन ॥ दुःसंप्रदाय राहणी ॥ ऐशा कन्येसि वर्जावें ॥९॥ हृष्ट मन नसोन ॥ ऐशी कन्या जाण ॥ दुर्लक्षण परिपूर्ण ॥ ऐशा कन्येसि वर्जावें ॥१०॥

## कन्यासल्लक्षण.

अपरुष श्राव्य सदर्थयुक्त ॥ आणिक विषमाक्षरसहित ॥ अनिषिद्ध नामयुक्त ॥ निरोगी दृढ शरीर ॥ १ ॥ बंधुशीललक्षणसंपन्न ॥ सांप्रदायिक व्यवहरण ॥ नक्षत्रगोत्रसंबंधानुकूल्यसंपन्न ॥ अनसूया समाधान वृत्ति असे ॥२॥ सहनशील भयभक्तियुक्त ॥ मानी कार्यचातुर्ययु-

---

नोदत्त, वाग्दत्त, धारादत्त अशी कन्या वर्ज करावी. (५) स्थूलांगी, दीर्घ शरीर असलेली, कुब्जा, तांबड्या केशाची, खोल डोळ्यांची, (कौंजी) मोठें नाक असलेली, गांठी असलेल्या भिवयांची (६) नानाविकारांनीं युक्त असलेली, जुबळे बोटांची, अंगलुप्त झालेली, अपसव्य भोंवरे असलेली, खड्या लवाची (७) लहान गळा असलेली, दुर्गंध स्वेदयुक्त काखा असलेली, लोंबत ओंठ असलेली, मोठें पोट असलेली, वांकडे पाय असलेली, आळशी अपस्वर असलेली, भीति नसलेली, (८) शुभ्र केसांची, रोग असलेली, जमीन हदरून चालणारी, पैंगणारी, कलह करणारी, अतिशय आशा करणारी, (९–१०) नक्षत्रगोत्रासी अनुकूल नसलेली, वैधव्यलक्षणाची, बंधुसंबंधीयांना न आवडणारी, दुःसांप्रदायाची, मनाला संतोष नसलेली अशा कन्येशीं विवाह करूं नये.

## कन्यासल्लक्षण.

(१) कोमल, श्राव्य, उत्तम अर्थ, विषमाक्षर, अनिषिद्ध अशा नांवाची, निरोगी व सुदृढ (२) बंधुशील, लक्षणसंपन्न, सांप्रदायाला अनुसरून वागणूक असलेली, नक्षत्रगोत्राला अनुकूल असलेली, असूयारहित, समाधानगुणाची, (३) सहनशील, भयभक्ति असलेली, मानी असलेली, कार्यदक्ष, हुशार, मृदु मधुरस्वर असलेली,

क्त ॥ जागरूक मृदुमधुरस्वरयुक्त ॥ विशाल लोचन ॥३॥ समावर्त समदंतपंक्ति ॥ समकाय नील दीर्घ मृदु कुटिल केशजात ॥ स्वर्णकांति मृदुस्पर्श सौंदर्ययुक्त ॥ विशाल वक्षःस्थल ॥४॥ कृशमध्य कदलीसम ऊरुद्वय ॥ लघुमंदगमन सौमंगल्य ॥ लक्षणयुक्त पुत्ररेखा पातिव्रत्य ॥ चिन्ह अंकुश शंख ध्वज पद्मादि ॥५॥ सौभाग्य रेखा सूक्ष्मांगुलियुक्त ॥ रक्ताधरोष्ठ वृत्तजघनयुक्त ॥ अल्पाहार अल्प निद्रायुक्त ॥ समचातुर्य विधेयता ॥६॥ श्रद्धा अभिमान आवश्यकता ॥ इत्यादि शुभलक्षण समन्वित ॥ कन्या अष्टवर्षयुक्त ॥ नववर्ष रोहिणी ॥७॥ दशवर्षी गौरी ह्मणत ॥ ऐशा कन्येसी पाहोनि विधियुक्त ॥ स्वगृह्यसूत्रोक्त ॥ प्रकारें विवाह करावा ॥८॥

## गृहस्थसामग्री.

गृहस्थाश्रमप्रयुक्त ॥ स्मार्तश्रौताग्निहोत्र ॥ नित्यार्चन देवता ॥ पंचाग्नि ॥१॥ पंचातिथि धर्मपत्नी ॥ अरणि यज्ञोपकरणजात ॥ गृह गृहोपकरणसहित ॥ आतिथ्योपकरण ॥ २ ॥ जीवनसाधन ॥ यजनादि षट्कर्म प्रकरण ॥ वस्त्रद्वय उपवीतद्वय साधन ॥ वेणुदंड ॥३॥ छत्रोपा-

---

मोठे डोळे असलेली, (४) बरोबर भोंवरे असलेली, सारख्या दांतांची, सम शरीराची, लांब काळे व कुरळ केंस असलेली, सोन्याप्रमाणें अंगकांति असलेली, मृदुस्पर्शाची, सुंदर असलेली, विशाल उराची, (५) कमर कृश असलेली, केळीच्या खांबासारख्या मांड्या असलेली, हळू चालणारी, सौमंगल्य लक्षणाची, पुत्ररेखा असलेली, पतिव्रताचिन्ह असलेली, अंकुश, शंख ध्वज, पद्म, वगैरे (६) चिन्हें असलेली, सौभाग्य रेखांची, बारीक बोटांची, तांबड्या ओंठाची, वर्तुलाकार ढुंगणाची अल्पाहार असलेली, अल्प झोंप असलेली, चतुर, आज्ञेंत वागणारी, (७) श्रद्धा असलेली, अभिमान असलेली, आवश्यकता बाळगणारी, वगैरे शुभ लक्षणांनीं युक्त आठ वर्षांची कन्या, नऊ वर्षांची रोहिणी, (८) दहा वर्षांची गौरी अशा कन्येशीं विवाह स्वगृह्यसूत्रोक्तक्रमानें करून घ्यावा.

## गृहस्थसामग्री.

(१) गृहस्थाश्रमाला उपयुक्त स्मार्तश्रौताग्नि, नित्य पूजा करावयाची देवता, पंचाग्नि, (२) पंचतिथि, धर्मपत्नी, आणि यज्ञोपकरण (यज्ञसाधनद्रव्य), गृह, गृहसाधनद्रव्य, आतिथ्यसाधनद्रव्य, (३) जीवनसाधन, यजनादि षट्कर्में, वस्त्रद्वय, उपवीतद्वय, वेणुदंड, (४) छत्र, पादरक्ष, दर्पण, कुंडल, हार, गंध, काजळ,

नह दर्पण ॥ कुंडल हार गंध कज्जल साधन ॥ पुष्प तांबूल शयन ॥ पुस्तक धान्य संग्रह ॥४॥ लोकसंग्रहादि संपन्न ॥ गृहस्थानें शिवपूजा करोन ॥ नित्य कर्म न सांडोन ॥ नैमित्तिक काम्यकर्मे ॥५॥ व्यवहरतां त्यांत ॥ नित्य कर्म संग्रहजात ॥ ऐसें लोकविख्यात ॥ कैसें ह्मणतिलें तरी ॥ ६ ॥

## शैवनित्यकर्मविचार.

नंतर प्रभातकाळीं उठोन ॥ शुचिर्भूत होऊन ॥ शिव दिव्य मंगल नामस्मरण ॥ विधियुक्त करावें ॥ १ ॥ शिवलिंग मंगळमूर्तिध्यान ॥ करोनि अंतर्मळ विमोचन ॥ वहिरंगीं ग्रामाबाहेर जावोन ॥ निर्भयविरुद्ध निर्जन प्रदेश जाण ॥२॥ मौनादिविधियुक्त होवोन ॥ यथोक्त मलमूत्रविसर्जन ॥ करोन गुदगुह्यकरपादांसि जाण ॥ वालुका क्रिमिदूर्वादि मुक्त ॥३॥ मृत्तिका घेऊन ॥ गंधादि मलनिवृत्यर्थ जाण ॥ मनःशुद्धिपर्यंत लेपन ॥ करावें विध्युक्त ॥४॥ मग जलानें क्षालन ॥ करून शुचि होऊन ॥ पात्रादि शुद्धि करून ॥ शुध्दाचमन करावें ॥ ५ ॥ सूर्योदयापूर्वीं जाऊन ॥ अपामार्गादि काष्ठ आणोन ॥ विध्युक्त दंतधावन ॥ करावें सूज्ञें ॥६॥ नंतर द्विराचमन करोन ॥ वस्त्रद्वयें नद्यादिकीं जावोन ॥ अघमर्षण वारुणादि मलविमोचन स्नान ॥ करावें यथोक्त

---

पुष्प, तांबूल, शय्या, पुस्तक, धान्यसंग्रह, (५–६) लोकसंग्रह, इत्यादि सामग्रीसहित होऊन शिवपूजेनें गृहस्थानें नित्य कर्मांचा लोप न करितां नैमित्तिक काम्यकर्मे करावींत.

## शैवनित्यकर्मविचार.

(१) प्रातःकाळीं दोन घटका रात्र असतां उठून शुचिर्भूत होऊन शिवदिव्य मंगल नामस्मरण करावें. (२) शिवलिंगमंगलमूर्ति ध्यान करून अंतरंगांतील मलमोचन करून नंतर गांवाच्या वाहेरच्या अविरुद्ध निर्जन प्रदेशाला जाऊन (३) मौनपणें यथाविधीनें मलमूत्र विसर्जन करावें. गुद, गुह्य, कर, पाद यांना लावण्याकरितां वाळू किडे दूर्वा नसलेली (४) माती घेऊन गंधादिमल जाऊन आपल्या मनाची शुद्धि होईपर्यंत माती लावून पाण्यानें धुऊन शुद्ध व्हावें. (५) पात्रादिक शुद्ध करून शुध्दाचमन करून (६) सूर्योदयाच्या अगोदर आघाडा वगैरे लांकडांनीं विध्युक्त दंतधावन करावें. (७) पुनः द्विराचमन करून वस्त्रद्वययुक्त होऊन नदी वगैरेच्या ठिकाणीं अघमर्षण वारुणादि मलमोचन स्नानें करावीत

॥७॥ वरि धौत वस्त्र परिधान ॥ करोनिया शुद्धासनीं बैसोन ॥ मंत्रोक्त विधिस्नान करोन ॥ परिपूत व्हावें ॥८॥ त्रियंबकादि मंत्रांनीं जाण॥ यथोक्त भस्मोध्दूलन ॥ त्रिपुंड्रादि धारण ॥ करावें सूज्ञें ॥९॥ यानंतर रुद्राक्षमालादि धारण ॥ यथास्थान जाणोन ॥ संख्याक्रमें धारण ॥ करावें विध्युक्त ॥१०॥ पवित्रपाणि होऊन ॥ प्राणायाम करोन ॥ समंत्रक कुंभक धारण ॥ प्रदक्षिणांत करावें ॥११॥ स्वशाखोक्त संध्यावंदन ॥ अर्घ्यदान करोन ॥ प्रत्यहीं सहस्रादि गायित्री जपसाधन ॥ तें कैसें ह्मणतिलें तरी ॥१२॥

## गायत्रीजपविधान.

गायत्री मंत्रास गायत्री छंदस ॥ विश्वामित्र ऋषि निरुता सवितृ संज्ञक सदाशिव देवता ॥ होउनी असे ॥ १ ॥ अग्नि मुख त्यास ॥ ब्रह्मशिरस ॥ विष्णु हृदय तयास ॥ रुद्र शिखा जाणा ॥२॥ पृथिवी योनि असोन ॥ प्राणादि वायूच प्राण ॥ श्वेत वर्ण ॥ सांख्यायन गोत्र ॥ ३ ॥ चतुर्विंशत्यक्षरें असोन ॥ त्रिपद षट्कुक्षि जाण ॥ पंचशीर्ष दशभुज असोन ॥ शांभव शक्ति स्वरूप ॥४॥ मंत्रजप्य रविदेवता ॥ मंत्रलक्ष्य शिवदेवता ॥ प्रत्यक्षरास प्रणवयुक्त बिंदूसहित ॥ सप्त व्याहृति ॥५॥ न्या-

---

(८)नंतर धौतवस्त्र परिधान करून शुद्धासनावर बसावें. नंतर मंत्रोक्त विधीनें स्नान करून शुद्ध होऊन (९) त्रियंबकादि मंत्रांनीं विधिपूर्वक भस्मोध्दूलन त्रिपुंड्रधारण करावें. (१०) रुद्राक्षमाला त्या त्या स्थानांवर विधिपूर्वक संख्यानुसार यथाविधि धारण कराव्या. (११) पवित्रपाणी होऊन प्राणायाम करावेत. समंत्रक कुंभकधारण प्रदक्षिणा झाल्यावर (१२) स्वशाखोक्त संध्यावन्दन करावें. अर्घ्य दिल्यानंतर प्रति दिवशीं योग्यतेनुसार सहस्रादि गायत्री मंत्राचा जप करावा. तो प्रकार पुढें सांगतात कीं,—

## गायत्रीजपविधान.

(१) नंतर गायत्रीमंत्रास गायत्री छंदस असून विश्वामित्र ऋषि आहे. सवितृसंज्ञक सदाशिव देवता आहे. (२) न्यास अग्नि मुख, ब्रह्म शीर्ष, विष्णु हृदय, रुद्र शिखा, (३) पृथ्वी योनि, प्राणादि वायूच प्राण, श्वेत वर्ण, सांख्यायन गोत्र, (४) चोवीस अक्षरें, त्रिपाद, षट् कुक्षि, पंच शीर्षे, दश भुज, शांभवीशक्तिस्वरूप, (५) मंत्रजप्य, रवि देवता, मंत्रलक्ष्य शिवदेवता, प्रत्यक्षर प्रणवयुक्त बिंदूसह सप्तव्याहृति (६) न्यास वगैरे ध्यानांनीं फलें असल्यामुळें ऋषिदेवतादिकांचें कीर्तन

[?]ध्यान फल ऐसें समजोन ॥ ऋषि देवतादि कीर्तन करोन ॥ तुरीय [गा]यत्री वर्ज करोन ॥ यथाविधि ॥६॥ न्यास करोन ॥ सगर्भ उपचार [क]रोन ॥ प्रत्यक्षरमुद्रा ध्यानादिकें करोन ॥ गायत्रीतात्पर्य विषय॥७॥ [प]रमार्थपर शिवास उद्देशून॥अक्षरमालादिकें करून ॥ जप्तृलक्षणलो-[प] नसोन ॥ नित्य प्रातःकालीं ॥ ८ ॥ सहस्रजप क्रमें करोन ॥ चोवीस [ल]क्ष जप करोन ॥ दोन लक्ष चाळीस हजार क्षीरतर्पण ॥ करावें य-[थ]ाविधि ॥९॥ कल्पोक्त प्रकारें जाण ॥ चोवीस हजार आज्याहुति घा-[ल]ोन ॥ दोन हजार चारशे ब्राह्मणभोजन ॥ करवावें सूज्ञें ॥ १० ॥ ब्रा-[ह्म]णाभावीं चोवीस हजार गायी तृप्त करोन ॥ तदभावीं चोवीस लक्ष [भ]ूततृप्ति करोन ॥ पालाशकुसुम कुशाग्र कमल क्षीरादिकें करोन ॥ [ब]लिदान करावें ॥ ११ ॥ याप्रमाणें पंचावृत्ति जाण ॥ ब्रह्मचर्यव्रतें य-[थ]ाकल्प पुरश्चरण करोन ॥ वरि प्रणव व्याहृति वषट्कारादिकें करोन ॥ [स]ाधून सिद्धि पावावी ॥१२॥ वरि पृथक् पृथक् क्षीरादि होमसंख्या-[ने]॥ नियत जपसाधनें करोन ॥ सकल सिद्धिप्रद झालिया वरि जाण॥ [त]नंतर ॥ १३ ॥

---

[क]रावें. तुरीय गायत्री वर्ज्य करून विधिपूर्वक (७) न्यास करून सगर्भ उच्चार [क]रून प्रत्यक्षर मुद्राध्यानादिकानें गायत्री मंत्राचा अर्थ अशा (८) परमार्थ पर-[शि]वाला उद्देशून अक्षर मालादिकांनीं जप करणाऱ्यानें आपल्या लक्षणांचा लोप [न] करूं देतां निरंतर प्रातःकालीं (९) हजार जपापासून क्रमानें चोवीस लाख जप [क]रावेत. नंतर दोन लाख चाळीस हजार वेळां क्षीर (दूध) तर्पण करून (१०) [क]ल्पोक्तप्रकारानें चोवीस हजार आज्याहुति द्याव्या. नंतर दोन हजार चारशे ब्रा-[ह्म]णांला भोजन घालावें. (११) तितके ब्राह्मण मिळाले नाहींत तर चोवीस हजार [ग]ायी तृप्त कराव्या. गायींचा अलाभ झाला असतां चोवीस लाख भूतांची तृप्ति [क]रावी. नंतर पलाशपुष्प, कुशाचे अग्र, कमल, क्षीर वगैरेचा बलि द्यावा. (१२) [या]प्रमाणें पांच वेळां ब्रह्मचर्यव्रतानें कल्पानुसार पुरश्चरण करून नंतर प्रणव, व्या-[हृ]ति वषट्कार यांना साधून घेऊन मंत्रसिद्धि करून घ्यावी. (१३) नंतर निरनि-[रा]ळे क्षीरादि होम संख्यांनीं नियत झालेल्या जपांनीं सर्व सिद्धि झाल्यानंतर

## गायत्रीमूर्तिस्वरूप.

गायत्रीध्यानास ऋग्वेद ॥ यजुर्वेद सामवेद ॥ हे जाण त्रिपाद ॥ आणिक पूर्वदक्षिण ॥१॥ पश्चिमोत्तर ह्मणोनि ॥ ऊर्ध्वाधःप्रदेश ह्मणोनि ॥ सहा दिशाच जाण ॥ षट्कुक्षि ॥ २ ॥ आकाशकुक्षि समाविष्ट असोन ॥ अष्टादशपुराणतत्वें नाभिस्थान ॥ स्थावरजंगम प्रपंच सर्व शरीर जाण ॥ वेदांतशास्त्रचि सूक्ष्म शरीर ॥ ३ ॥ शिक्षादिक अंगें असोन ॥ स्मृत्यादि विद्या रोम जाण ॥ धर्मचि हृदय असोन ॥ अंतर्वाह्यकर्मबंधचि स्तन ॥४॥ सूर्याग्नि जठराग्नि ॥ वैदिकाग्नि लौकिकाग्नि ॥ आणिक ज्ञानाग्नि ॥ हे पंचाग्निच पंचमुख ॥ ५ ॥ नक्षत्रादि खचरज्योति ॥ दहनादि भौमज्योति ॥ प्रणवादि ज्ञानज्योति ॥ हेच नयनत्रय ॥६॥ वेदमातृ गायत्रीस ॥ मूर्ति जाण गायत्री छंदस ॥ व्याकरण, शिक्षा, कल्प, निरुक्त, ज्योतिष ॥ हेंचि पंचशीर्षें जाणा ॥७॥ ब्रह्मदेवताक मंत्र शिरस ॥ रुद्रदेवताक मंत्र शिखा तयेस ॥ विष्णु देवताक मंत्रचि आत्मा तयेस ॥ ईश्वर देवताक मंत्रचि अंतरात्मा ॥८॥ मीमांसाशास्त्रचि लक्षण ॥ अथर्वणचि चेष्टा जाण ॥ अधिकारिपक्ष्यगायत्री·

---

## गायत्रीमूर्ति स्वरूप.

(१) गायत्री ध्यानास ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद हे त्रिपाद आहेत असें जाणावें. पूर्व, दक्षिण, (२) पश्चिम, उत्तर, ऊर्ध्व, अधोभाग या सहा दिशाच सहा कुक्षि जाणाव्यात. (३) आकाश कुक्षीमध्येंच आहे. अष्टादश पुराणतत्वें नाभीच्या जागीं आहेत. स्थावरजंगम प्रपंच सर्व शरीर होऊन राहिलें आहे. वेदांतशास्त्र सूक्ष्म शरीर असून (४) शिक्षादिक हीं अंगें आहेत. स्मृत्यादि विद्या रोम असून धर्मच हृदय आहे. अंतरबाह्यकर्मच स्तनद्वय असून (५) सूर्याग्नि, जठराग्नि, वैदिकाग्नि, लौकिकाग्नि, ज्ञानाग्नि, हे पंचाग्नीच पांच मुखें होत. (६) नक्षत्रादि खचरज्योति, दहनादि भौमज्योति, प्रणवादि ज्ञानज्योति हे तीन नेत्र जाणावेत. (७) वेदमाता गायत्रीची मूर्ति गायत्री छंदासच होय. व्याकरण, शिक्षा, कल्प, निरुक्त, ज्योतिष हीं पांच मस्तकें होत. (८) ब्रह्मदेवतामंत्रहेंही शीर्ष जाणावें. रुद्रदेवताकमंत्र शिखेच्या ठिकाणीं समजावेत. विष्णुदेवताकमंत्र आत्म्याचे ठिकाणीं समजावेत. ईश्वरदेवताक मंत्र अंतरात्म्याचे ठिकाणीं समजावेत. (९) मीमांसा लक्षणाचे ठिकाणीं समजावी. अथर्वणवेद चेष्टेच्या ठिकाणीं समजावा. अ·

विद्येस ॥ समुपास्य गायत्री नामनिर्देश्य देवता ॥९॥ छांदोग्यादि उपनिषद्रांत ॥ भूतादि पादव्यपदेश निर्दिष्ट असत ॥ त्यायोगें तदनन्य साधारण मात्र ॥ परशिवचि निर्धारिला ॥१०॥

## उदयकालगायत्रीध्यान.

नंतर गायत्री मंत्र ॥ उदयकालांत ॥ नाभिस्थानांत ॥ रक्तपद्मासन ॥१॥ आणिक रक्तवर्ण ॥ रक्तवस्त्राभरण ॥ गंधमाल्यादिकें करोन ॥ अलंकृत असून ॥२॥ चतुर्मुखांनीं द्वादशाक्षरांनीं जाण ॥ दंड कमंडलव-क्षसूत्रचिन्मुद्रासाधन ॥ धृत वामदक्षिणाधःकरचतुष्टयें करोन ॥ कमलकलशवराभययुक्त वामदक्षिणोर्ध्व करचतुष्टयानें हंसवाहन असे ॥३॥ ऋग्वेदमय असोन ॥ रजोगुण बहिराधिक्यानें जाण ॥ ब्रह्मादि देवता ह्मणवून ॥ गायत्री ॥४॥ आणिक ब्राह्मीनाम पावलें ह्मणोन ॥ कर्मज्ञानार्थ जाण ॥ ध्यान करावें ह्मणोन ॥ अनुसंधान करावें ॥५॥

## मध्यान्हगायत्रीध्यान.

माध्यान्हकालीं हृदय स्थानीं ॥ श्वेत पद्मासनीं ॥ श्वेतवर्ण श्वेताभरण ॥ पुष्प गंधमाळा ॥१॥ अनुलेपनादिकें अलंकृत होऊनि ॥ एक मु-

---

शिकाऱ्याला पठन करावयास योग्य अशा गायत्री विद्येची उपास्य गायत्रीनामनिर्देश्य देवता (१०) छांदोग्यादि उपनिषदांमध्यें भूतादिपादव्यपदेश असल्यामुळें तदनन्य साधारण साक्षात परशिवच आहे असा निर्धार करावा.

## उदयकाल गायत्रीध्यान.

(१) नंतर प्रातःकालीं गायत्रीचें अनुसंधान करावें तो प्रकार असा कीं,— नाभिस्थानीं रक्तपद्मासनाची कल्पना करावी. (२) रक्तवर्ण, रक्तवस्त्राभरण, गंधमाला यांनीं अलंकृत झाली आहे (३) अशी कल्पना करून चार मुखांनीं, द्वादशाक्षरांनीं दंड, कमडलु, अक्षसूत्र, चिन्मुद्रा, हीं वामदक्षिणाधःकरचतुष्टयानें धरलेली अशी कल्पना करावी. कमल, कलश, वर, अभय, हीं वामदक्षिणोर्ध्वे हातांत आहेत अशी कल्पना करावी. हंसावर बसलेली आहे अशी कल्पना करावी. (४) ऋग्वेदमय असून रजोगुणबाहेर जास्त असल्यामुळें ब्रह्मा अधिदेवता आहे अशी कल्पना करावी. (५) ब्राह्मी असें नांव आहे, अशी कल्पना करावी. कर्मज्ञानाकरितां गायत्रीचें ध्यान करावयाचें आहे. असें अनुसंधान करावें.

## माध्यान्ह गायत्रीध्यान.

(१) नंतर माध्यान्हाचे वेळेस हृदयस्थानीं श्वेतपद्मासनाची कल्पना श्वेतवर्ण, श्वेत वस्त्राभरण; पुष्प गंध, माला (२) यांनीं अलंकृत असो अशी कल्पना करावी. एक

ख द्विलोचनीं ॥ शंख चक्र शोभित वाम दक्षिणोर्ध्वकरद्वयांनीं ॥ कमंडलुक्षमालाशोभित ॥२॥ वामदक्षिणाधःकरद्वयांनीं ॥ सुपर्ण वाहन होऊनी ॥ यजुर्वेदमय होऊनि ॥ सत्वाधिकबहिर्गुणाधिक्यानें ॥३॥ विष्णवधि देवता ह्मणवून ॥ सरस्वती वैष्णवीनाम पावोन ॥ कर्मज्ञानार्थ ध्यान ॥ करावया योग्य ह्मणोनि चिंतावें ॥४॥

## सायंकालगायत्रीध्यान.

नंतर सायंकालीं भ्रूमध्यस्थानीं ॥ आणिक कृष्णपद्मासनीं ॥ कृष्णवर्ण कृष्णवस्त्राभरण ॥ गंधमाल्यादिकांनीं ॥१॥ अलंकृत होऊनि ॥ पंचमुख पंचदश लोचनांनीं ॥ त्रिशूलाक्षमालादिकांनीं ॥ आणिक कमंडलु सुरभिचिन्मुद्रा ॥२॥ वराभय पाशांकुश चक्र धारण ॥ केलें वामदक्षिणकरदशकांनीं ॥ कार्यरुद्ररूप स्थानीं ॥ एक मुख त्रिलोचन ॥३॥ शूलाक्षमाला धारण ॥ आणिक कमंडलु सुरभि धारण ॥ केलें करचतुष्टयांनीं ॥ वृषभवाहन होऊन ॥४॥ सामवेदमय होऊन ॥ तमोगुण बहिराधिक्यानें ॥ कार्यरुद्राधि देवता होऊन ॥ सावित्री माहेश्वरी

---

मुख असून दोन डोळे आहेत असें जाणावे. शंख चक्र शोभित वामदक्षिणोर्ध्व करद्वयानें व अक्षमाला, कमंडलु, यानीं (३) वामदक्षिणाधः करद्वयानें सुशोभित झाली आहे असें जाणावें. व सुपर्णवाहन होऊन यजुर्वेदमय असून सत्वाधिक बहिर्गुणप्राचुर्य असल्यामुळें (४) व विष्णु अधिदेवता आहे अशी कल्पनां करावी. सरस्वती वैष्णवी असें नांव तिचें आहे असें जाणावें. कर्मज्ञानाकरितां गायत्रीचें ध्यान करतों, असें अनुसंधान करावें.

## सायंकाल गायत्रीध्यान.

(१) नंतर संध्याकाळीं भ्रूमध्यस्थानीं कृष्णपद्मासनाची कल्पना करावी. त्या आसनावर कृष्णवर्ण, कृष्णवस्त्र, आभरण, गंध, माळा यांनीं (२) अलंकृत होऊन बसली आहे अशी कल्पना करावी. पांच मुखें असून पंधरा डोळे आहेत अशी कल्पना करावी. त्रिशूल, अक्षमाला, कमंडलु, सुरभिचिन्मुद्रा या आयुधांनीं चार हात सुशोभित दिसत आहेत असें जाणावें. (३) वर, अभय पाश, अंकुश, चक्र हीं वामदक्षिण दहा हातांनीं धरलीं आहेत असें जाणावें. कार्यरुद्ररूपामध्यें एकमुख त्रिलोचन आहेत अशी कल्पना करावी. (४) शूल, अक्षमाला, कमंडलु सुरभी अशीं आयुधें घेऊन करचतुष्टयांनीं युक्त होऊन वृषभावर बसली आहे अशी कल्पना करावी. (५) सामवेदमय असून तमोगुण बहिःप्रचुर असल्यामुळें, कार्य

नाम ॥५॥ पावोन कर्मज्ञानार्थं ध्यान ॥ करावया योग्य असोन ॥ राहिलें ऐसें मनन ॥ करावें यथाविधि ॥६॥

## गायत्रीनिजस्वरूप.

नंतर गायत्री विद्या तात्विकपणें जाणोन ॥ परशिव शुद्ध ब्रह्मविद्यानंदैकरस घेवोन ॥ पंचब्रह्ममंत्र प्रतिपाद्य पंचमुखांनीं ॥ पंचकोशोपलक्षित ॥१॥ जीवसाक्षि शिवस्वरूप असोन ॥ आणिक पंचैक्य शिरःकूटांनीं पंचेंद्रिय वृत्ति भोगरूप जाण ॥ पंच वक्रांनीं ॥ दश दिग्दशेंद्रिय जाण ॥ दश विषयरूप दश भुजांनीं ॥२॥ पंच महाभूत त्रिवृत्करण होवोन ॥ चित्साक्षि चिच्चिदाभासन ॥ प्रकृतिविकृतिरूप पंच भेदांनीं ॥ पंचदश होवोन ॥३॥ प्रकाशमय गुणत्रय होवोन ॥ सूर्याग्निचंद्रात्मक जाण ॥ पंचदशनेत्रेंकरून ॥ कामादिषट्कयुक्त ॥४॥ सृष्टिस्थितिलयप्रज्ञारूप जाण ॥ वरदाभयांकुश कपाल असोन ॥ आणिक गदाशंखचक्रारविंदयुगल जाण ॥ दिव्यायुधांनीं प्रकाश तो ॥५॥ मुक्ताविद्रुमहेम जाण ॥ नीलधवलकांतीपरि कांति असोन ॥ प्रज्ञानचंद्रकलालंकृत असोन ॥ शांतिकिरीटमंडित ॥६॥ सर्व समुपास्य जगत्का-

---

द्ध अधिदेवता आहे असें समजावें. सावित्री, माहेश्वरी अशीं नांवें तिचीं असून (६) कर्मज्ञानाकरितां तिचें ध्यान करावयास योग्य आहे असें अनुसंधान करावें.

## गायत्रीनिजस्वरूप.

(१) नंतर गायत्रीविद्येचें ज्ञान तात्विकपणें करून घेऊन परशिव शुद्ध ब्रह्मविद्यानंदैक रसस्वरूप असल्यामुळें पंचब्रह्ममंत्रप्रतिपाद्य पंचमुखांनीं युक्त पंचकोशोपलक्षित(२)जीवसाक्षिभूत शिवस्वरूप जें आहे तेंच पंचैक्य शिरःकूट आहे त्यानें आणि पंचेंद्रियाचें व्यापार भोगस्वरूप पंचवक्रांनीं, आणि दहा दिशा, दहा इंद्रियें, दहा विषय एतत्स्वरूप दशभुजांनीं युक्त अशा गायत्रीचें ध्यान करावें. (३) आणि पंच महाभूत त्रिवृत्करणामुळें चित्साक्षी चित् चिदाभास प्रकृति व विकृति अशा पांच भेदांनीं तीं पंधरा भेदांचीं होते. (४) निर्मळपणें भासणाऱ्या गुणत्रयांनीं युक्त असून सूर्य अग्नि, चंद्र असें पंधरा डोळे तिला आहेत. कामादि षट्कांनीं युक्त असून (५) सृष्टि, स्थिति, लय, प्रज्ञा यांनीं युक्त आहे. वरद, अभय, अंकुश, कपाल, गदा, शंखचक्र, अरविंदयुग्म अशीं दिव्य आयुधें हातांत झळकत आहेत.(६) मोती, पोवळे सोनें, नीळ, धवळ, इत्यादिकांनीं जी मनोहर असून प्रज्ञान, चंद्रकला यांनीं अलंकृत, शांतिकिरीटानें शोभित झाली आहे. (७) सर्वांला उपासना करावयास योग्य

रण ॥ धर्मादि लक्षणें सवितृशब्दवाच्य असोन ॥ शुद्धसत्वप्रधान ॥ तुरीय परशिवस्वरूपता ॥७॥ तयें वेदमूलप्रणवात्मक होऊन ॥ तत्व-संज्ञिक चतुर्विंशत्यक्षरमय असोन ॥ कालोपाधि वर्ज करोन ॥ यज्ञो-पवीतधारी सर्व ॥ ८ ॥ कर्मांग असोन ॥ मुमुक्षु सर्व जाण ॥ ज्ञानांग होऊन ॥ गायत्री जप करिती ॥९॥ नंतर पंचाक्षरादि जपसाधन ॥ क-रावें ऐसें जाण ॥ जरि नाहीं गायित्र्युपासन ॥ केलेलीं सत्कर्मे सर्व जाण ॥१०॥ षट्कुक्षित्वें करी ग्रहण ॥ त्या गायत्रीचें जपसाधन ॥ क-रावया विधिवदुपनयनरहित असोन ॥ आणिक निर्बीजें अनधिकारी ॥११॥ तथापि मंत्रयोगें मुमुक्षु व्हावया ॥ पंचाक्षरसंस्कृत तया ॥ गायि-त्रीमंत्र साध्य व्हावया ॥ योग्य असे जाणा ॥१२॥ तदर्थ मात्रानुसंधानीं॥ विवेकें रत होऊनि ॥ गायत्री जपसाधन ॥ झालियावरि ॥१३॥ सूर्यो-पस्थान ॥ ब्रह्मयज्ञतर्पण ॥ इत्यादि कर्मे करोन ॥ शैवसिद्धांतसंमत ॥१४॥ शिवपूजा करोन ॥ पंचब्रह्मयज्ञसाधन ॥ करावया विधि ह्मणोन॥ कैसें ह्मणतिलें तरी ॥१५॥

## पंचब्रह्मयज्ञादि.

नंतर देवयज्ञ ॥ पितृयज्ञ मनुष्ययज्ञ ॥ भूतयज्ञ ब्रह्मयज्ञ ॥ इत्यादि

---

व जगत्कारणत्वादि लक्षणांनी युक्त आणि सवितृशब्दवाच्य, शुद्धसत्वप्रधान अशी तुरीय परशिवस्वरूपतेनें (८--९) वेदमूल प्रणवस्वरूप होऊन तत्वसंज्ञक चोवीस अक्षर स्वरूप असून कालोपाधिरहित आहे. अशा गायत्रीचा जप सर्व यज्ञोपवीत-धाऱ्यांनीं कर्मांगरूपानें करावा. आणि सर्व मुमुक्षूंनीं ज्ञानांगरूपानें जप करावा. (१०) नंतर पंचाक्षरीमंत्राचा जप करावा. गायत्री उपासना न केल्यास केलेलीं सत्कर्मे (११) षट्कुक्षीपणानें गायत्री ग्रहणकर्ते अशा गायत्रीचा जप करावयास विधिपूर्वक उपनयन झालें नसल्यानें निर्बीज अनधिकारी होतो असें जाणावें.(१२) तथापि मंत्रयोगानें मुमुक्षु व्हावयास पंचाक्षरीचा संस्कार असल्यामुळें गायत्री त्यास साध्य आहे असें जाणून (१३) गायत्रीच्या अर्थाचें अनुसंधान करण्यास विवे-कानें उद्युक्त व्हावें. गायत्रीचा जप झाल्यानंतर (१४) सूर्योपस्थान, ब्रह्मयज्ञ, तर्प-ण वगैरे कर्मे करावीत. नंतर शैवसिद्धांतसंमत (१५) शिवपूजा करून पंचब्रह्मयज्ञ साधन करावयाचा विधि कोणता ह्मणाल तर सांगतों ऐका—

## पंचब्रह्मयज्ञादिक.

(१) नंतर देवयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ, भूतयज्ञ, ब्रह्मयज्ञ इत्यादि यज्ञ करा-

यज्ञ करून ॥ १ ॥ सप्तपाकयज्ञ सप्तहविर्यज्ञ करून ॥ नंतर आधानें श्रौ॰ताग्नि पावून ॥ प्रकृतिविकृति यागलोप नसोन ॥ अग्निष्टोम ॥२॥ आ॰प्तोर्याम अतिरात्र ह्मणोन ॥ उक्थ्य षोडश ह्मणोन ॥ वाजपेय पौंडरी॰कादि ह्मणोन ॥ महाक्रतु जाणा ॥ ३ ॥ नित्येष्टि काम्येष्ट्यादि करून ॥ प्रतिवर्षी करावयाचे वर्षपश्वादिक जाण ॥ प्रायश्चित्तेष्ट्यादि ब्राह्मकर्मे जाण ॥ क्षत्रिय झाला तरी ॥४॥ अधिकारी होऊन ॥ सांगितलेले यज्ञ करून ॥ याहून राजसूय अश्वमेधादि ह्मणोन ॥ आयुष्टोमेष्टि ॥५॥ कुंड॰लेष्टि ह्मणोन ॥ पुत्रकामेष्टि नक्षत्रेष्ट्यादि जाण ॥ यथालाभ करावे ह्म॰णोन ॥ त्याचे ठायीं ॥६॥

## यज्ञप्रक्रिया.

यथाविहित करून ॥ मंत्रमंत्रार्थज्ञ नैष्ठिक ह्मणोन ॥ अध्वर्यु ब्रह्म होतृ प्रस्तोतृ असोन ॥ प्रतिहर्ता अच्छावाक् ॥१॥ आणिक मैत्रावरुण ॥ आ॰ग्नीध्रप्रमुख ऋत्विक्संपत्ति मिळवून ॥ उद्गातृदेयस्रज संपादून ॥ हो॰त्रदेय रुक्म मिळवावें ॥२॥ प्रस्तोतृप्रतिहर्तृदेय अश्व आणून ॥ मैत्राव॰रुणदेय वृषभ मिळवून ॥ इत्यादिक संपादून ॥ षष्ठिर्गावो दक्षिणा इ॰त्यादि ॥३॥ आधारें दक्षिणे करितां ॥ आणिक संभार संभरण ॥ ब्रा॰

---

वेत. (२) सप्तपाकयज्ञ, सप्तहविर्यज्ञानंतर आधानाच्या योगानें श्रौताग्नि संपादन करून प्रकृतीविकृतियागांचा लोप न होऊं देतां अग्निष्टोम, (३) आप्तोर्याम, अतिरात्र, उक्थ्य, षोडश, वाजपेय, पौंडरीक वगैरे महायज्ञ (४) आणि नित्येष्टि, काम्येष्टि, वगैरे यज्ञ प्रतिवर्षी करावयाचे वर्षपशु, प्रायश्चित्त, इत्यादिक वगैरे यज्ञ ब्राह्मणांनीं करावयाचीं कर्में होत. क्षत्रिय असेल तर (५) आपल्या अधिकाराला अनुसरून त्यानें कर्मे करावींत. शिवाय राजसूय, अश्वमेध, आयुष्टोमेष्टि, (६) कुंडलेष्टि, पुत्रकामेष्टि, नक्षत्रेष्टि वगैरे पात्रलाभानुसार करावेत.

### यज्ञप्रक्रिया.

(१) यथाविहित मंत्रमंत्रार्थ जाणणारे परमनैष्ठिक अध्वर्यु, ब्रह्म, होता, प्रस्तोता, प्रतिहर्ता, अच्छावाक् (२) मैत्रावरुण, आग्नीध्र, वगैरे ऋत्विक्जनांसह जमून उद्गात्याला स्रज देऊन होत्याला रुक्म ( सोनें ) द्यावें. (३) प्रस्तोतृ प्रतिहर्त्याला अश्व द्यावा. मैत्रावरुणाला वृषभ द्यावा. इत्यादि " षष्ठिर्गावो दक्षिणा " या मंत्रानें (४) सांगितल्याप्रमाणें दक्षिणार्थ संभारसंभरण, ब्राह्मणसंतर्पण, सोमप्रतिक्रयण

ह्मणसंतर्पण ॥ सोमप्रतिक्रयण ॥४॥ इत्याद्यर्थं पाहिजे ह्मणोन ॥ धार्मिकांनीं संतोषें करून ॥ दिलेल्या सद्द्रव्यसंपत्ति मिळवून ॥ कृष्णमृग संचारयुक्त आर्यावर्तादि ॥५॥ देशांतील पुण्यक्षेत्र ह्मणोनी ॥ आणिक तीर्थाराम नदी देवसंनिधानीं ॥ सुरक्षित विशाल रमणीय असोनी ॥ शालादि स्थलसंपत्ति ॥ ६ ॥ जातपुत्र कृष्णकेशी ह्मणोन ॥ इत्यादि शारीरसंपत्ती असोन ॥ आणिक वेद तदंगसाधन ॥ मीमांसा वेदभाष्य ॥७॥ कल्प सूत्राधानपंचक ह्मणोन ॥ सोमपंचकादि श्रौतविद्याधन ॥ प्रक्रिया जाणते विद्वत्संपत्ति असोन ॥ आणिक कृच्छ्र चांद्रायण ॥८॥ सांतपनोपवासादि क्षमायुक्त ॥ दार्ढ्यारोग्य संपत्ति ॥ आणिक श्रद्धाभक्ति ॥९॥ ज्ञानादि मानस संपत्ति मिळवून ॥ अनुकूल पत्नीपुत्रादि बांधव असोन ॥ यज्ञ दस्यूपहत न व्हावें ह्मणून ॥ संरक्षक राजादि पालकसंपत्ति ॥१०॥ सर्वांशांनीं निर्भंग यज्ञ करवून ॥ विष्णुरूपानें यज्ञमय होऊन ॥ यजमानरूपें आपणचि करून ॥ हविरादिरूपें आपणचि पावोन ॥११॥ अग्निमूर्तिरूपें आपणचि स्वीकारून ॥ पशुसंतृप्त होऊन ॥ यजमानास सद्गतिदायक असोन ॥ पशुपति नामयुक्त

---

(५)वगैरे करितां धार्मिक लोकांनीं संतोषानें दिलेल्या सद्द्रव्यसंपत्तीनें व कृष्णमृगादिकांचा संचार असलेल्या आर्यावर्तादि (६) देशांमधील पुण्यक्षेत्र, तीर्थ बागबगीचे, नदी, देवतासांनिध्य इत्यादि स्थळांत रमणीयपणें सुरक्षित विशाल बांधलेल्या शालादिस्थळ संपत्तीनें (७) आणि जातपुत्र, कृष्णकेशी वगैरे शारीरिक संपत्तीनें व वेद, वेदांगें, मीमांसा, वेदभाष्य, (८) कल्पसूत्र, आधानपंचक, सोमपंचक वगैरे जाणत असलेल्या श्रौतविद्याप्रक्रिया जाणणाऱ्या विद्वानांच्या सहायानें, आणि कृच्छ्र, चांद्रायण, (९) सांतपन उपवास वगैरे व्रतें करूनही क्षमायुक्त दृढ आणि निरोगी असलेल्या शरीरसंपत्तीनें व श्रद्धा, भक्ति (१०) ज्ञान वगैरे मानस संपत्तीनें आणि अनुकूल पत्नीपुत्रादि बांधव संपत्तीनें युक्त होऊन यजमानानें यज्ञ करावा. यज्ञामध्यें चोरांचा वगैरे उपद्रव होऊं नये ह्मणून राजे लोकांना संरक्षणाकरितां ठेविलेलें असावें. (११) सर्वतोपरि यज्ञभंग न होईल अशी तजवीज ठेवून यज्ञ करावा किंवा करवावा. विष्णुरूपानें यज्ञमय होतो, यजमानरूपानें आपणच यज्ञ करतो, हविरादिरूपानें आपणच प्रगट होतो, (१२) अग्निरूपानें आपणच हविष्य ग्रहण करतो, पशुसंतृप्त करून यजमानाला सद्गति देणारा असा पशुपति

परमेश्वर ॥१२॥ तयाचा प्रसादचि दैविक असोन ॥ पेशा मुख्य संपत्तियुक्त होवोन ॥ कूष्मांडगण होमसाधन ॥ विरजा दीक्षादिकांनीं ॥१३॥ परिशुद्ध गृहस्थ जाण ॥ शिवपूजाप्रभावें करून ॥ सद्ब्राह्मण व्हावया साधन ॥ पर्वादि सूक्तकालीं ॥१४॥ अरणि संपादून ॥ आधान ॥ करून ॥ नंतर शालाप्रवेश करून ॥१५॥ कुशादिरूप ब्रह्मदर्भ जाण ॥ तुरग वालादिरूप महादर्भ जाण ॥ मृदुललित योग्य काशादि विश्वामित्र दर्भ जाण ॥ तृणदूर्वादि तृणदर्भ ॥१६॥ यापरि चतुर्विध बर्हिरादि सामग्री साधन ॥ पालाश अश्वत्थ शमी ह्मणोन ॥ औदुंबरादि समित्पात्रपर्ण ॥ इत्यादि साधन करोन ॥१७॥ आणिक नीवारशामाक ह्मणोन ॥ यव गोधूम व्रीहि ह्मणोन ॥ तंडुल गुड क्षीरादि जाण ॥ चरु पुरोडाशादि संपादावें ॥१८॥ सर्पपादि रक्षाद्रव्य मिळवून ॥ कलशाद्युपकरण ठेवून ॥ विशसन्यादि यज्ञायुध मिळवून ॥ आणिक चमस दर्वी ॥ १९ ॥ आज्यस्थाली प्रोक्षिणीपात्र ॥ पूर्णपात्रप्रमुखपात्र ॥ विशेष साधन जात ॥ मिळवावें ॥ २०॥ संज्ञपनी स्फ्य इत्यादि साधन मिळवून ॥ आणिक हरिणशृंग कृष्णाजिन ॥ वल्कल मुसल आणोन ॥

---

परमेश्वर जो आहे, (१३) त्याचा प्रसाद हीच एक दैविक मुख्य संपत्ति आहे त्या संपत्तीनें युक्त होऊन कूष्मांडगणहोम, विरजादीक्षा यांनीं युक्त होऊन (१४) परिशुद्ध झालेल्या गृहस्थानें शिवपूजाप्रभावानें उत्तम ब्राह्मण होण्याकरितां पर्वादि शास्त्रोक्त योग्य अशा कालामध्यें (१५) अरणि संपादन करावा, नंतर आधान करावा, नंतर यज्ञशाळेंत प्रवेश करावा, (१६) नंतर कुशादिरूप ब्रह्मदर्भ, तुरगवालादिरूप महादर्भ, आणि मऊ सुंदर योग्य असे काशादि विश्वामित्रदर्भ, तृण दूर्वा वगैरे तृणदर्भ (१७) असे चतुर्विध बर्हिरादि सामग्री संपादन करावी. नंतर पालाश अश्वत्थ, शमी औदुंबर, समिधा संपादन कराव्या, नंतर पात्रपर्णें वगैरे मिळवावेत. (१८) नंतर नीवार ( तृणधान्य ) सावे, जव, गहूं, साळी, तांदूळ, गूळ, क्षीर वगैरे व चरु पुरोडाश वगैरे पदार्थ मिळवावेत. (१९) नंतर सर्पपादि रक्षाद्रव्य मिळवावें. नंतर कलशादि उपकरण पदार्थ मिळवावेत. नंतर विशसन्यादि यज्ञायुधें मिळवावींत. नंतर चमस, दर्वी, (२०) आज्यस्थाली, प्रोक्षिणीपात्र, पूर्णपात्र प्रमुखपात्र वगैरे पदार्थ मिळवावेत. (२१) नंतर संज्ञपनी, स्फ्य, वगैरे साधनें मिळवावींत. नंतर कृष्णाजिन, हरिणशृंग, वल्कल, मुसळ, उलूखल, विळा,

उलूखल लाविनी ॥२१॥ यूप चषाल सोमराज ह्मणोन ॥ गव्य पश्वा-द्यनेक संभार साधन ॥ परिपूर्ण होऊन ॥ स्थंडिल इष्टकोपधान॥२२॥ चयन कपालसाधन ॥ याज्य अग्निमथन ॥ पुरोनुवाक्यस्तुति साधन॥ शस्त्रहविर्दान ॥२३॥ उद्देश्य त्यागादिकें करून ॥ तत्तत्संकल्पपूर्वक क-रून ॥ मंत्राक्षर स्वर,वृत्त,वर्ण ॥ इत्यादि लोप न होतां॥२४॥ जरी क्र-मभंग झालियास ॥ वपनपरिषत्तादि प्रायश्चित्तास ॥ करून घ्यावें या शरीरास ॥ नंतर वेदमुख्य प्रतिपाद्य ॥२५॥ शिवप्रीत्यर्थ रुद्रमूर्ति अ-ग्नीस जाण ॥ चतुरस्त्र त्रिकोण अर्धचंद्राकार वर्तुलाकार ह्मणोन॥ ध-नुराकार षडस्त्र पद्माकाराष्टकोण ॥ गरुडाकार ॥२६॥ आणिक श्येना-कारादि कुंड करोन ॥ तत्तदुक्त क्रमानें जाण ॥ तत्तदंग होऊन रचना करून ॥ उत्तम मध्यमाधम कुंडस्थळ ॥२७॥ स्थंडिलस्थळ शुभस्थ-ळावरि बैसोन ॥ अन्वारब्धपत्नीसह असोन ॥ अंतर्वेदी पत्नीशाला जाण ॥ इत्यादिकांचे ठायीं ॥ २८ ॥ शामित्र पशुसंज्ञपनादि न चुकतां करोन ॥ सूत्यादि वपा हवन ॥ अंगहोम आज्यहोमादि करोन ॥ आ-हवनीय गार्हपत्य ॥२९॥ दक्षिणाग्नि असोन ॥ आणिक कारणरुद्र का-र्यरुद्र ह्मणोन ॥ लीलारुद्ररूप त्रिगुणमूर्ति तृप्ति करोन ॥ अनंतर का-

---

(२२)यूप, चषाल,सोमराज, गव्य, पशु वगैरे अनेक संभार मिळवावेत. नंतर स्थंडिल, इष्टकोपधान (२३) चयन, कपालसाधन, अग्निमंथन, याज्य, पुरोनुवाक्य, स्तुति, शस्त्र, हविर्धान, (२४) उद्देश त्याग वगैरे तयार करावेत; नंतर त्या त्या कर्माला ते ते संकल्प करावेत; नंतर मंत्राक्षराचा लोप, स्वराचा लोप, वृत्ताचा लोप व-र्णांचा लोप, होऊं देऊं नये. (२५) कदाचित् क्रमभंग झाल्यास वपन परिषत् वगैरे प्रायश्चित्तें घ्यावीत. नंतर वेदाचा मुख्य प्रतिपाद्य (२६) अशा शिवाच्या संतोषाकरितां रुद्रमूर्ति अग्नीस चतुरस्त्र, त्रिकोण, अर्धचंद्राकार, वर्तुलाकार, धनु-राकार, षडस्त्र, पद्माकार अष्टकोण, गरुडाकार, (२७) श्येनाकार कुंडें तयार क-रावीं. त्या त्या शास्त्रोक्त नियमांप्रमाणें त्या त्या अंगांसह रचना करून उत्तम, मध्यम, कनिष्ठ कुण्डस्थल, (२८) स्थंडिलस्थल वगैरे शुभस्थलाचे ठिकाणीं बसून अन्वा-रब्ध अशा पत्नीसह अंतर्वेदी, पत्नीशाला वगैरे ठिकाणीं (२९) इष्टमित्र पशुसंज्ञ-पनादि कर्में न चुकतां करावींत. नंतर वपाहवन सूत्यादिक करावें. नंतर अंग-होम, आज्यहोम करावेत. नंतर आहवनीय, गार्हपत्य (३०) दक्षिणाग्निरूप का-

ळी कराली ॥३०॥ विशुद्ध धूम्रवर्णा ह्मणोन ॥ स्फुलिंगिनी विश्वरुचि ह्मणोन ॥ आणिक लोलायमाना जाण ॥ ऐशा अग्निहोत्र सप्त ज्वाला ॥३१॥ प्रज्वलत असतां ॥ यथाकाल तत्वतां ॥ हव्यकव्यादि जात ॥ समर्पावें ॥ ३२ ॥

## रुद्राग्निमूर्ति.

नंतर "रुद्रो वा एषोग्निः" ह्मणोन ॥ "त्वमग्नेरुद्रः" ह्मणोन॥ "आवो राजानं" ह्मणोन ॥ इत्यादि मुख्य श्रुतिनिरुक्त ॥१॥ ब्राह्मणवाक्योक्त प्रकार ॥ धूम्रप्रकाश उष्णता ज्वालाकार ॥ आणिक स्फुलिंग अंगार ॥ श्रीलक्षण ॥२॥ कपिलताम्रस्वर्णवर्ण ॥ शब्दगंधव्यंजन ॥ हव्यवाह कव्यवाह ह्मणोन ॥ दश कलायुक्त ॥३॥ अग्निमंडलस्थानीं द्विशिर ॥ चतुःशृंग त्रिनेत्र ॥ कपर्द चंद्रकला यज्ञसूत्र ॥ सप्तहस्त सप्तजिह्वा ॥४॥ त्रिपाद त्रिमेखला मेषवाहन ॥ वृषभाकार ज्योतिर्मय जाण॥ रुद्रशक्तियुक्त वामपार्श्वस्थानीं ॥ स्वधादेवी॥५॥ दक्षिणपार्श्वस्थानीं॥ स्वाहादेवी परिग्रहण करोनि ॥ दक्षिणहस्त चतुष्टयांनीं ॥ शक्ति अन्न स्रुक् ॥६॥ आणिक स्रुव धरोन ॥ वामकरत्रयांनीं ॥ तोमर व्यजन ॥ घृ-

---

णरुद्र, कार्यरुद्र लीलारुद्र या त्रिगुण मूर्तींची तृप्ति करावी. नंतर काली, कराली, (३१) विशुद्ध, धूम्रवर्णा, स्फुलिंगिनी, विश्वरुची, लोलायमाना वगैरे अग्निहोत्राच्या सप्तज्वाला (३२) प्रकाशमान झाल्या असतां यथाकाल हव्यकर्म समर्पण करावें.

## रुद्राग्निमूर्ति.

(१) नंतर "रुद्रो वा एषोग्निः, त्वमग्ने रुद्रः, आवो राजानं" वगैरे मुख्यश्रुतिनिरुक्त(२) ब्राह्मण वाक्यांनीं अग्नीस सन्मुख करून घेऊन, धूर, प्रकाश, उष्णता, ज्वाला, ठिणग्या, अंगार, श्रीलक्षण (३) कपिल ताम्रस्वर्णवर्ण, शब्द, गंध, व्यंजन हव्यवाह, कव्यवाह अशा दशकलांनीं युक्त (४) अग्निमण्डलाच्या मध्यभागीं दोन मस्तकें, चार शिंगें, तीन डोळे, कपर्द (जटा), चंद्रकला, यज्ञसूत्र, सात हात, सात जिभा, (५) तीन पाय, त्रिमेखला, मेषवाहन, वृषभाकार, ज्योतिर्मय रुद्रशक्ति, यांनीं युक्त अशी रुद्राग्निमूर्ति आहे. या रुद्राग्निमूर्तीच्या डाव्या पार्श्वास स्वधादेवी आहे. (६) उजव्या बाजूला स्वाहादेवी आहे. या मूर्तीच्या उजव्या चार हातांत शक्ति, अन्न, स्रुक्, (७) स्रुव, हे पदार्थ असतात. डाव्या तीन

तपात्र धरिलें ॥७॥ रक्तांबर रक्तवर्ण ॥ रक्तगंधाक्षतादिकें अलंकृत हो-ऊन ॥ स्थंडिल परिस्तरण परिवेषण ॥ अलंकरण अभिमुखीकरण॥८॥ इत्याद्याहुतींनीं समर्चित होऊन ॥ देवमुख ह्मणवोन ॥ द्विजकुलदैव होवोन ॥ सूर्याग्न्यभिन्न ॥ ९ ॥ वेदज्योति पावोन ॥ विष्ण्वादि सकल देवता शक्तियुक्त होवोन ॥ स्वभक्त देवपोषण ॥ करावया अवमकृत्यें ॥१०॥ हव्यवाह होवोन ॥ मिरवतो श्रीरुद्राग्निमूर्ति जाण ॥ तयाचें स-भक्तिक ध्यान ॥ करावें यथाविधि ॥११॥ हरिणवर्ण गगनवर्ण ॥ रक्त-वर्ण कृष्णवर्ण ॥ सुप्रभावर्ण बहुवर्ण ॥ अतिरक्त ज्वालास्थानीं ॥१२॥ समिधा लाजा मोहऱ्या ह्मणोन ॥ तूप दूध अन्न ॥ तिलादि सप्ताहुति देवोन ॥ यूपस्थापन अहोरात्र ॥१३॥ प्रयोग सवन ॥ अवभृथादिस्ना-न ॥ तत्तत्काल कर्मतंत्र जाणोन ॥ विध्युक्त करावें ॥१४॥ तत्फल स्व-र्गादि नश्वर फलकांक्षा न धरोन ॥ परमेश्वर प्रेम साधोन ॥ सोमपान पूत होवोन ॥ सोमयाजी असो ॥१५॥ अथवा पौंडरीकादि ब्रह्मरथारू-ढ दान कर्मशूर जाण ॥ अथवा वाजपेयादि पूत मेध्य दक्षिणरूप श्रेष्ठ

---

हातांत तोमर, व्यजन, घृतपात्र हे पदार्थ असतात. (८) या मूर्तीचा वर्ण तां-बडा असून ही मूर्ति रक्तवस्त्र नेसली आहे आणि ही मूर्ति रक्तगंध रक्तअक्षता यांनीं अलंकृत झालेली असते. या रुद्राग्निमूर्तीची पूजा स्थंडिल, परिस्तरण, प-रिवेषण, अलंकरण, अभिमुखीकरण (९) मुख्याहुति इत्यादिकांनीं करावी. या मूर्तीला देवमुख ह्मणतात, ब्रह्मकुलाचें दैवत ह्मणतात, या मूर्तीनें सूर्याग्नीनें अ-भिन्न असलेली (१०) वेदज्योति मिळविली आहे. आणि ही मूर्ति विष्ण्वादि सर्व देवताशक्तींनीं युक्त आहे. अशी ही मूर्ति स्वभक्तांच्या पोषणाकरितां अवमकृत्य (११) करीत हव्यवाहन या नांवानें शोभिवंत आहे. अशा श्रीरुद्राग्निमूर्तीचें ध्यान भक्तिपूर्वक करावें, (१२) नंतर हरिणवर्ण, गगनवर्ण, रक्तवर्ण, कृष्णवर्ण, सुप्रभावर्ण, बहुवर्ण, अतिरक्त अशा ज्वालेंत (१३) समिधा, मोहऱ्या, लाह्या, तूप, दूध, अन्न, तीळ, अशा सात आहुति द्याव्या. नंतर यूपस्थापन, अहोरात्र, (१४) प्रयोग, सवन, अवभृथस्नान वगैरे कर्में त्या त्या कालांतील कर्म तंत्र मंत्र जाणून विधिपूर्वक करावींत. (१५) परंतु यजमानानें स्वर्गादि नश्वर फलांची इ-च्छा न धरितां परमेश्वरप्रसन्नतेची अपेक्षा धरावी. असो सोमपानादिकांनीं पु-नीत झालेला सोमयाजी असो, (१६) पौंडरीकादि ब्रह्मरथारूढ दान कर्मशूर असो. किंवा वाजपेयादिकांनीं पुनीत झालेला "पूतमेध्यदक्षिण" अशी पदवी मिळवि-

ब्राह्मण ॥ अथवा सोमरहित हविर्याजी जाण ॥ पयसाग्निहोत्र ॥ १६ ॥ यवाग्वाग्निहोत्र करोन ॥ षट्कर्मनिष्ठ होऊन ॥ सकल धर्मव्रतादिकांनीं ॥ परमेश्वरमुखोल्लास ॥ १७ ॥ विधिपूर्वक करीत असोन ॥ गुरुवेदानुशासन ॥ धर्मशास्त्रनीति यथातिक्रम न करोन ॥ वंशांकुरवृद्धि करावी ॥१८॥ भुक्तभोग झालियानें ॥ विचारमुख होवोन ॥ नंतर विरक्त व्हावया साधन ॥ कैसें ह्मणतिलें तरी ॥१९॥

## गृहस्थधर्मानुशासन.

नंतर गृहस्थानें ॥ वेदवेदांगस्मृत्याद्यध्ययन ॥ रूप ब्रह्मयज्ञ करोन॥ आणिक अग्निहोत्र ॥१॥ शिवसमर्चनादिरूप देवयज्ञ करोन ॥ आणिक अतिथ्यभ्यागतसमाराधन ॥ रूप मनुष्ययज्ञ करोन ॥ आणिक पिंडपितृयज्ञ ॥२॥ तिलतर्पणादिरूप पितृयज्ञ करोन ॥ श्वानबल्यादिरूप भूतयज्ञ करोन ॥ ऐसे पंचयज्ञ शक्तिलोप न होतां करोन ॥ संस्कृत धर्मपत्नी ॥३॥ ऋतुकालातिक्रमण ॥ न करितां संतानार्थ जाण ॥ " विष्णुर्योनि" ह्मणोन ॥ गर्भाधानसूक्त पठन करीत ॥४॥ शिवशक्त्यैक्यानुसंधानें करून ॥ स्वस्त्रीचे ठायीं रत होवोन ॥ सुपुत्र पावोन ॥ पितृऋण फालवावें ॥५॥ आणिक गुरुयात्रा ॥ देवयात्रा ॥ तीर्थयात्रा ॥ यज्ञधर्मा-

---

केला विप्रश्रेष्ठ असो, किंवा सोमरहित हविर्याजी असो यांनीं पयसाग्निहोत्र, (१७) यवाग्वाग्निहोत्र वगैरे कर्में चालवीत षट्कर्मांमध्यें परमनिष्ठा ठेवावी. आणि सकल धर्मव्रतें करून परमेश्वराला संतोषवीत (१८) गुरुवेदानुशासन, धर्मशास्त्र, नीति इत्यादिकांचा मार्ग न सोडतां न वंशांकुर वाढवून (१९) भुक्तभोग होऊन परम विचार करून नंतर वैराग्य स्वीकारावें.

## गृहस्थधर्मानुशासन.

(१) गृहस्थानें वेदवेदांगस्मृत्याद्यध्ययनरूप ब्रह्मयज्ञ करावा. आणि अग्निहोत्र (२) शिवपूजारूप देवयज्ञ करावा. व अतिथि अभ्यागत समाराधनारूप मनुष्ययज्ञ करावा आणि पिंडपितृयज्ञ (३) तिलतर्पणादिरूप पितृयज्ञ करावा. तसेंच श्वानबल्यादिरूप भूतयज्ञ करावा. असे पांच यज्ञ शक्तिलोप होऊं न देतां करावेत. संस्कारांनीं युक्त असलेल्या धर्मपत्नीशीं (४) ऋतुकालांत संतानाकरितां " विष्णुर्योनि " हें गर्भसूक्त ह्मणंत (५) शिवशक्त्यैक्याचें अनुसंधान करून रत व्हावें. त्यास पुत्र उत्पन्न करून त्याच्यायोगानें पितृऋणांतून मुक्त व्हावें. (६) गुरुयात्रा,

चरण ॥६॥ आपत्कुटुंबभरणासि ॥ केवल धर्मानें द्रव्यार्जनासि ॥ करावें त्या कारणासि ॥ आत्मार्थालागीं न करितां ॥७॥ आणिक देवतार्थे ॥ यज्ञार्थे ॥ भिक्षार्थे ॥ पाकप्रयत्न करावा ॥८॥ आपण एक वेळीं ॥ अथवा दोन्ही वेळीं ॥ मुष्टिमात्र बत्तीस कवळीं ॥याहुनि अधिकरहित शुद्धान्न ॥९॥ करावें भोजन ॥ आणिक अत्याशन ॥ अतिपान ॥ उग्रप्रतिग्रह ॥१०॥ उच्छिष्ट पर्युषित ॥ निषिद्ध द्रव्यजात ॥ करावें वर्जित ॥ शिवसंस्कार नसोनि ॥११॥ कोणतें द्रव्यजात ॥ परिग्रह न करावें क्वचित ॥ पूजन हवन स्नानांत ॥ आणिक भोजनाचे ठायीं॥१२॥धरावें केवल मौन ॥ अहिंसा अस्तेय ह्मणोन ॥ एकांत स्वस्त्रीगमन ॥ परदारा वर्जे ॥ १३ ॥ अकृत्रिम शौच ह्मणोन ॥ इंद्रियनिग्रह भूतदया ह्मणोन ॥ देवताभक्ति गोविप्रसेवा ह्मणोन ॥ सत्यवचन सदाचार ॥१४॥ परोपकार पुण्यसंपादन ॥ सात्विकवृत्ति भर्तव्यभरण ॥ भोजनादि नियम करोन ॥ इत्यादि सुगुण पावावे ॥१५॥ याचकासि असेल तें घालोन॥ न करावें परुषाक्षरोच्चारण॥ न द्यावें परक्यासि संतपन ॥ शिवमाहेश्वर प्रसाद मिळवावा ॥१६॥ शिवमाहेश्वरा लागून ॥ न द्यावें अपचा-

---

देवयात्रा, तीर्थयात्रा, यज्ञ, धर्माचरण, (७–८) आपत्कुटुंबपोषण इत्यादिकांकरितां न्यायानें द्रव्य मिळवावें. देवांकरितां, यज्ञाकरितां, भिक्षेकरितां स्वयंपाक करवावा. आपल्या स्वतःच्या पोटाकरितां अन्न शिजवूं नये. (९) एकवेळां होवो, किंवा दोनवेळां होवो आपल्या मुठीच्या प्रमाणानें घास करून (यापेक्षां अधिक न करतां) तसले घास बत्तीसपर्यंत एका वेळेला खावेत. (१०) अत्याशन, अतिपान, उग्रप्रतिग्रह ( क्रूर दान घेणें ) (११) उच्छिष्ट, पर्युषित ( शिळें ), निषिद्धद्रव्य, यांचा स्वीकार करूं नये. शिवसमर्पण केल्याशिवाय (१२) कोणताही पदार्थ घेऊं नये. पूजन, हवन, स्नान, भोजन यावेळेस (१३) मौन धरावें. अहिंसा, अस्तेय, एकांत स्वस्त्रीगमन, परस्त्रीवर्ज, (१४) अकृत्रिम, शौच, इंद्रियनिग्रह, भूतदया, देवताभक्ति, गोविप्रसेवा, सत्यवचन, सदाचार, (१५) परोपकार, पुण्यसंपादन, सात्विकवृत्ति, भर्तव्यभरण, भोजनादि नियम, वगैरे सद्गुण नेहमीं बाळगिले पाहिजेत. (१६)भिक्षुक लोकांना घरांत असेल ती भिक्षा वाढावी त्यांशीं कठोर भाषण करूं नये. दुसऱ्याला संताप देऊं नये. शिवमाहेश्वरांचा प्रसाद नेहमीं मिळवावा. (१७) शिवमाहेश्वरांचा अपमान कधींही करूं नये. लुप्त झालेल्या क्रियेबद्दल प्रायश्चित्त घेत

रदान ॥ लुप्तक्रियासि जाण ॥ प्राप्त प्रायश्चित्त द्यावें ॥१७॥ व्रतभंग न करोन ॥ इत्यादि धर्मपर होवोन ॥ आणिक वार्तावृत्ति ह्मणोन ॥ स्वाधीनवृत्ति मायावादवृत्ति ॥१८॥ मौन संन्यासी ह्मणोन ॥ याप्रकारें चतुर्विध जाण ॥ आणिक ऋतामृतादि सद्वृत्ति जाण ॥ शिलोंच्छवृत्त्यादिकें उपजीवन करावें ॥ १९ ॥ गृहिणीसहित असोन ॥ गृहमेधी होवोन ॥ आपत्कालींही धैर्य धरोन ॥ धर्मानें जो करी संसार ॥ २० ॥ तोचि गृहस्थ जाण ॥ ऐसें बोलतें शास्त्रवचन ॥ हाचि निर्धार धरोन ॥ प्रवर्तावें ॥ २१ ॥

## पंचकर्मविभाग.

आणिक त्या गृहस्थाचें आचरण ॥ आहे तें कवण कवण ॥ तें सांगती जाण ॥ शास्त्राधारें ॥१॥ नित्य नैमित्तिक ह्मणोन ॥ आणिक प्रायश्चित्तकर्म ह्मणोन ॥ काम्य निर्मल ह्मणोन ॥ ऐसें पंचविध ॥२॥ त्याचे ठायीं संध्यावंदनादिक तें ॥ नित्यकर्म ह्मणवी निरुतें ॥ शुभकाल देशादिक तेथें ॥ विधिपूर्वक ॥३॥ कीजे जें विशेष ॥ विविध परि पृथक् ॥ तें नैमित्तिक ॥ कर्म ह्मणवी ॥ ४ ॥ ब्रह्महत्यादि समस्त ॥ दोषपरिहारानिमित्त ॥ क्रियारंभ तें प्रायश्चित्त ॥ कर्म ह्मणवी ॥५॥ ज्योतिष्टोम यागादिक तें ॥ काम्यकर्म ह्मणवी निरुतें ॥ ईश्वरोपासना तें ॥ निर्मल कर्म ह्मणवी ॥६॥

---

असावें. (१८) व्रतभंग न होऊं देण्याबद्दल दक्ष असावें. अशा रीतीनें धर्मपर होऊन वार्तावृत्ति, स्वाधीनवृत्ति, मायावादवृत्ति, (१९) मौनसंन्यास या चार प्रकारांनीं आणि ऋतामृतादि सद्वृत्तींनीं किंवा शिलोंच्छादि वृत्तींनीं उपजीवन करीत (२०) पत्नीसह गृहस्थाश्रमी होऊन आपदेच्या वेळेसही धैर्य धरून धर्ममार्गानें वागावें. (२१) अशा प्राण्याला गृहस्थ असें ह्मणतात.

## पंचकर्मविभाग.

(१) पुनः त्या गृहस्थाचीं अनुष्ठेयकर्में यथाशास्त्र सांगतात कीं, (२) नित्य, नैमित्तिक, प्रायश्चित्त, काम्य, निर्मल, अशीं पांच कर्में गृहस्थाचीं होत. (३) त्यांमध्यें संध्यावंदनादिक हें नित्यकर्म होय. शुभकालीं शुभदेशीं (४) करावयाचें तें नैमित्तिककर्म होय. (५) ब्रह्महत्यादि दोष निवारण होण्याकरितां करण्यांत येणारें तें प्रायश्चित्त होय. (६) ज्योतिष्टोमादिक तें काम्यकर्म होय. ईश्वरोपासनाच निर्मलकर्म होय.

## निर्मलकर्मविवेक.

आणिक तें निर्मल कर्म जाण ॥ तपःकर्म जपध्यान ॥ ज्ञान ह्मणोनि भिन्न ॥ पंचप्रकार असे ॥१॥ त्याचे ठायीं दोषपरिहारक ॥ होऊनि असे विशेष ॥ शरीरबाधात्मक ॥ महा कष्टसाध्य ॥ २ ॥ तप्तकृच्छ्र महातप्तकृच्छ्र ॥ शिवकृच्छ्र पादकृच्छ्र ॥ प्राजापत्यकृच्छ्र पराककृच्छ्र ॥ देवकृच्छ्र यावकृच्छ्रादि कृच्छ्रानें ॥३॥ पक्षमासाचे ठायीं अन्न ॥ अधिक क्षीण करोनि सेवन ॥ इत्यादिक साधनें ॥ आचरणें तें ॥४॥ चांद्रायण यवचांद्रायण ॥ पिपीलिकाचांद्रायण ऋषिचांद्रायण ॥ शिशुचांद्रायण यतिचांद्रायण ॥ आदि चांद्रायणें ॥५॥ प्राजापत्यादि व्रतानें ॥ धर्मार्थ होऊनि आपण ॥ शरीरशोषण करणें ॥ तें तप ह्मणवी ॥६॥ बाह्याभ्यंतर साधनें ॥ सगुण निर्गुण ॥ ईश्वरार्चन करणें ॥ तें कर्म ह्मणवी ॥७॥ प्रणवादि मंत्रविधान ॥ सांगिक निपुण ॥ करणें उच्चारण ॥ तें जप ह्मणवी ॥ ८ ॥ हृत्कमलकर्णिकास्थान ॥ अंतरीं ईश्वरचिंतन ॥ करणें तें ध्यान ॥ ह्मणवी निरुतें ॥ ९ ॥ प्रत्यगात्म्यातें ॥ परमात्म्यातें ॥ ऐक्यविचारें शुद्धाद्वैतसिद्धीतें ॥ ज्ञान ह्मणवी ॥१०॥ इति हें समस्त ॥ गृहस्थाश्रम्यासि कृत्य ॥ योगज्ञाभिमत ॥ ह्मणोनि जाणावें ॥११॥

---

## निर्मलकर्मविवेक.

(१) त्या निर्मलकर्मांचा प्रकार असा आहे कीं, तप, कर्म, जप, ध्यान ज्ञान असें पांच प्रकार निर्मलकर्मांमध्यें आहेत. (२) त्यांमध्यें दोषपरिहार करणारीं आणि शरीराला त्रास पोंचविणारीं कष्टसाध्य अशीं व्रतें ह्मणजे (३) तप्तकृच्छ्र, महातप्तकृच्छ्र, शिवकृच्छ्र, पादकृच्छ्र, प्राजापत्यकृच्छ्र, पराकृच्छ्र, देवकृच्छ्र, यावकृच्छ्र वगैरे व्रतें होत. (४) यांनीं आणि पक्षमासादिकांमध्यें अन्नाचे घास वाढवून व कमी करून अन्न भक्षण करणें वगैरे लक्षणांनीं युक्त (५) चांद्रायण, यवचांद्रायण पिपीलिकाचांद्रायण, ऋषिचांद्रायण, शिशुचांद्रायण, यतिचांद्रायण वगैरे चांद्रायणव्रतांनीं (६) आणि प्राजापत्यादि व्रतांनीं धर्माकरितां शरीरशोषण करणें याला तप असें ह्मणतात. (७) बाह्याभ्यंतरसाधनांनीं सगुणनिर्गुण ईश्वरार्चना करणें याला कर्म असें ह्मणतात. (८) प्रणवादि मंत्राचा सांग उच्चार करणें याला जप असें ह्मणतात. (९) हृदयकमलकर्णिकेमध्यें ईश्वरचिंतन करणें याला ध्यान असें ह्मणतात. (१०) प्रत्यगात्मपरमात्म्याच्या ऐक्याच्या विचारानें शुद्धाद्वैतसिद्धि करून घेणें याला ज्ञान असें ह्मणतात. (११) एकूण हीं सर्व कर्में गृहस्थांच्या कर्तव्यकर्मांपैकीं आहेत.

## नीतिसंग्रह.

दारापुत्रादिकुटुंबभरणयुक्त ॥ जो संसार करीत ॥ ऐसा तो गृहस्थ ॥ तयानें अविरुद्धपणें ॥१॥ लोकयात्रा करून ॥ शिवपदप्रवेश करावया जाण ॥ लौकिक वैदिक नीति जाणून ॥ अनर्थांसि वश न होतां ॥२॥ तयांसि चुकवून ॥ सप्रयोजक वर्तन ॥ करावें कैसें जाण ॥ सांगे युक्ती ॥ ३ ॥ रोदनकर्त्यांस आग्रह उत्पन्न न करावें जाण ॥ गुरुवडिलांचें न करावें आज्ञोल्लंघन ॥ बालभाषण जरी योग्य तें करावें ग्रहण ॥ कूटकृत्य न करावें ॥ ४ ॥ कूट विरोध न करावा जाण ॥ अरिषड्वर्गावरि जय मिळवोन ॥ विवेक वाढवून ॥ करावें क्षमासंरक्षण ॥५॥ आपण स्थिर ह्मणोन ॥ करावें विद्याधनसंपादन ॥ आपण क्षणजीवी ह्मणोन ॥ धर्मसंग्रह करावा ॥६॥ होईल तोंवरि सत्पात्रासि करावा उपकार ॥ शास्त्रीय विषयप्रकार ॥ सिद्ध करावया मिथ्योपचार ॥ करोनि भाषण करावें ॥७॥ करावें भर्तव्यकुटुंबभरण ॥ कालानुसारं केलें तरी वर्तन ॥ न सोडावा निजधर्म जाण ॥ निष्ठुर बोलूं नये ॥८॥ दुर्जन संगति न करितां जाण ॥ जवळ करावे सज्जन ॥ काल व्यर्थ न

---

## नीतिसंग्रह.

(१) स्त्रीपुत्रादि कुटुंब पोषण करणाऱ्या संसारी गृहस्थानें विरोध न आणूं देतां (२) लोकयात्रा करून शिवपदप्रवेश करावयाकरितां लौकिक वैदिक नीति समजून घेऊन अनर्थांस आस्पद ( थारा ) न देतां (३) अनर्थ चुकवून सप्रयोजक रीतीनें वागावें. तो प्रकार असा कीं, (४) रडणाऱ्यास आग्रह उत्पन्न करूं नये. गुरु व वडील माणसें यांची आज्ञा मोडूं नये. बालभाषण हितावह असेल तर ग्रहण करावें. कपटकृत्य करूं नये. (५) कट ( मिथ्या ) विरोध करूं नये. अरिषड्वर्गाला (काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर ) जिंकावें. विवेकाची वाढ करावी, व मनीं क्षमा बाळगावी. (६) पुष्कळ दिवस मी वांचणार आहें, अशा बुद्धीनें द्रव्यसंग्रह करावा, व विद्येचा संग्रह करावा. मी क्षणजीवी आहें, असें मानून धर्मसंग्रह करावा. (७) होतां होईल तितक्या प्रयत्नानें सत्पात्रीं उपकार करावेत. शास्त्रीयविषयाची स्थापना करण्याकरितां असत्य भाषण करावयास हरकत नाहीं. (८) पोसावयास योग्य अशा कुटुंबाचें पोषण करावें. कालाला अनुसरून वागणूक असली तरी निजधर्म सोडूं नये. कठोर भाषण करूं नये. (९) दुर्जन सहवास न क-

घालवोन ॥ एक क्षणही न घालवितां ॥९॥ करावें ऐहिकामुष्मिकसाधन ॥ करावें पुरातनपद्धतिपरिपालन ॥ आपत्कालीं धैर्य न सोडावें जाण ॥ विचारें लोकानुभव अधिकपणें संपादावा ॥१०॥ सत्कार न करितां अतिथीस पाठवूं नये जाण ॥ न करावें अहितान्न भक्षण ॥ दृष्टिपूतस्थलीं पाद ठेवोन ॥ वस्त्रशोधित जल प्यावें ॥ ११ ॥ सत्यपूत बोलावें वचन ॥ आत्मपूत तें करावें जाण ॥ कार्यारंभ न करावा संशय घेवोन ॥ बाळपणीं करावें विद्यार्जन ॥१२॥ तरुणपणीं द्रव्यार्जन करोन ॥ तयाचा उपभोग घेवोन ॥ धर्मकीर्ति संपादन ॥ करावी यथाविधि ॥१३॥ वृद्धपणीं वैराग्यें शिवध्यान ॥ करीत करावें ज्ञानसंपादन ॥ शिवयोगानें अंत्यकालीं जाण ॥ तनुत्याग करावा ॥१४॥ ज्ञानादि शिवविषयीं तृप्ति न पावोन ॥ मैत्र्यादि वृत्तींनीं अंतःकरण शोधन ॥ करीत न करावें महाजनपथातिक्रमण ॥ अपवादासी भ्यावें ॥१५॥ करूं नये व्यर्थ साहस जाण ॥ जडपणा सोडोन ॥ जाग्रतीनें प्रयत्नपर होवोन ॥ उत्साह धैर्यें अभिवृद्ध करावा ॥ १६ ॥ नीतीनें कार्य जिंकोन ॥ करावें परलोकचिंतन ॥ सर्वतोपरी आत्मद्रोह जाण ॥ न करावा क-

---

रितां सज्जनसहवासांत नेहमीं असावें. काल व्यर्थ घालवूं नये. एक क्षण न सोडितां (१०) ऐहिकामुष्मिकसाधन करून घ्यावें. पुरातन पद्धत पाळावी. संकटकालीं धैर्य सोडूं नये. विचारपूर्वक लोकानुभव जास्त रीतीनें संपादावा. (११) अतिथींचा सत्कार न करितां त्यांना तसेंच पाठवूं नये. शत्रूंचें अन्न जेवूं नये. दृष्टीनें पाहून पाऊल पुढें ठेवावें. वस्त्रगाळ पाणी प्यावें. (१२) खरें बोलत असावें. आत्मपूत ( आपणास खरें वाटणारें ) कृत्य करावें. संशय आल्यास कर्मास आरंभ करूं नये. बाळपणीं विद्या मिळवावी. (१३) तरुणपणीं द्रव्य मिळवावें व त्याचा उपभोग घ्यावा व त्यायोगानें धर्म आणि कीर्ति मिळवावी. (१४) ज्ञातारपणीं वैराग्य संपादन करून शिवध्यानरत होऊन ज्ञान संपादन करावें. शिवयोगानें अंत्यकाळीं शरीर सोडावें. (१५) ज्ञानादि शिवविषयांमध्यें तृप्ति मानूं नये. (नित्य ज्ञान संपादन करीत असावें.) मैत्र्यादिवृत्तींना अंतःकरणाचा शोध करावा. मोठ्या लोकांचा मार्ग सोडूं नये. अपवादाला भीत असावें. (१६) व्यर्थ साहस करूं नये. आळस सोडून जाग्रतीनें प्रयत्नपर होऊन धैर्यानें उत्साह वाढवून (१७) नीतीनें कार्यें जिंकावींत. परलोकविचार करावा. कोणत्याही प्रकारानें आत्मद्रोह करूं नये.

र्थीही ॥ १७ ॥ करावें देशानुवर्तन ॥ समय सरळपणें पाहोन ॥ न क-
रितां सतिसुतातिक्रमण ॥ करावें पोषण ॥ १८ ॥ गोविप्रनागवधोपेक्षा
न करावी जाण ॥ संपत्कालीं कुसुमापरि मृदुहृदय होवोन ॥ विप-
त्कालीं शिलानुसार कठिण हृदय करोन ॥ वृक्षादिकांपरी स्वकार्यीं
॥१९॥ लक्ष न देतां परोपकार करावा जाण ॥ सर्वचि दैवाधीन सम-
जोन ॥ स्थैर्यें परमेश्वराचे ठायीं भार ठेवोन ॥ निर्भयानें राहावें ॥२०॥
पुरुषप्रयत्न न सोडावा जाण ॥ परमाणुसदृश जरी परगुण ॥ पर्वत-
प्राय श्लाघन ॥ करावें सर्वदा ॥२१॥ करावें निजगुणातिशय विस्मर-
ण ॥ आत्मस्तुति परनिंदा न करोन ॥ दूर जरी सुखासमीप जावें आ-
पण ॥ लोकव्यवहारासी ॥२२॥ सत्यधर्मासी विरोध न येतां चालवो-
न ॥ दुःखातिशयसमयीं विचारपर होवोन ॥ करावें पूर्वेतिहासमनन ॥
स्थळ पाहोन करावें शयन ॥ २३ ॥ शारीरिककर्मव्यत्यास न करावा
जाण ॥ ऋणरोगपरिहार शीघ्र करोन ॥ न करावा वैद्याशीं द्वेष जाण ॥
दिवसा उत्तरमुख ॥२४॥ रात्रीं दक्षिणाभिमुख होवोन ॥ करितां मल-
विसर्जन ॥ शौच करितां धरावें मौन ॥ तळ न जाणतां डोहीं न बुडा-

---

(१८) देशाला अनुसरून वागावें. योग्य समय पाहत असावें. पत्नीपुत्रादिकांचा अतिक्रम ( त्याग ) न करितां त्यांचें पोषण करावें. (१९) गो, विप्र, सर्प, यांचा वध होत असतां उपेक्षा करूं नये. संपत्ति आली असतां फुलाप्रमाणें हृदय कोंवळें करावें. संकटें आलीं असतां दगडाप्रमाणें मन कठिण करावें. स्वकार्यदक्ष असला तरी वृक्षादिकांप्रमाणें परोपकाररत व्हावें. (२०) सर्व कांहीं दैवाधीन आहे असें समजून दृढभावानें परमेश्वरावर सर्व भार टाकून निर्भयपणें राहावें. (२१) पुरुषप्रयत्न सोडूं नये. परक्याचे गुण थोडे असले तरी पर्वताएवढे करून दाखवावेत. (२२-२३) निजगुणांचें विस्मरण करावें. आत्मस्तुति परनिंदा करूं नये. दूर असलें तरी सुख असेल त्या ठिकाणीं आपण जावें. सत्यधर्माला विरोध न आणतां लोकव्यवहार चालवावा. दुःख अतिशय झालें असतां विचारांत तत्पर व्हावें, प्राचीन इतिहासांचें मनन करीत असावें. स्थळ पाहून निजावें. (२४) शारीरिक कर्मांचा व्यत्यास करूं नये. ऋणाचा आणि रोगाचा परिहार तात्काळ करावा. वैद्याबरोबर द्वेष करूं नये. दिवसा उत्तरेस मुख करून (२५) रात्रीं दक्षिणेस मुख करून मलत्याग करावा व मलत्याग करतेवेळेस आणि पादप्रक्षालनादि शुद्धता करून घेतेवेळेस बोलूं

वें ॥२५॥ जलादिकीं न करावें मलमूत्रविसर्जन ॥ न राहावें मलिन ॥ गांभीर्य न सोडोन ॥ मानी होवोन राहावें ॥ २६ ॥ साक्षि वादासी न सांपडोन ॥ मित्रद्रोह स्वामिद्रोह कुलद्रोह न करावा जाण ॥ उपकाऱ्यांवरी कृतज्ञ राहोन ॥ मातापितृसंतोष करावा ॥२७॥ विश्वासुकांचा त्याग न करावा जाण ॥ वपन तैलाभ्यंजन मैथुन ॥ इत्यादिक षण्णवति श्राद्धसमयीं जाण ॥ आणिक निषिद्ध वारादिकीं न करावें॥२८॥ आदित्य मंगळ ह्मणोन ॥ गुरुशुक्रजन्मवार ह्मणोन ॥ या दिवशीं विशेष कर्म न करोन ॥ सौम्यक्रियापर व्हावें ॥२९॥ प्रतिदिवशीं प्रभातकालीं उठोन ॥ उदयादिसंध्याकालसमयीं जाण ॥ न करावें शयन ॥ पूर्वोत्तर मुख होवोन ॥ ३० ॥ करावें सत्कर्माचरण ॥ मंगळवारीं कार्य न करावें नवीन ॥ बुधवारीं न काढावें ऋण ॥ क्षुद्रजंतूंचा स्पर्श न करावा ॥३१॥ न करावें आत्मरक्षणविस्मरण॥ बुधबृहस्पति ह्मणोन ॥ आणिक शनिवारीं नूतन ॥ वस्त्रचंद्रस्वरें नेसोन पांघरावें ॥३२॥ शिष्टवारीं जाण ॥ सूर्यस्वरें करावें भोजन ॥ उत्तराभिमुख होवोन॥ चंद्रस्वरें न करावें भोजन ॥३३॥ असाक्षिक न करावें भोजन ॥ ताम्रपात्रीं न करावें क्षीरपान ॥ न करावें लवणमिश्र दुग्धपान ॥ नारिकेल

नये. डोहांत बुडी मारूं नये. (२६) पाण्यामध्यें मलमूत्र सोडूं नये. मलिनपणें राहूं नये. गांभीर्य सोडूं नये. मानी होऊन राहावें. (२७) साक्ष देऊं नये. मित्रद्रोह, स्वामिद्रोह, कुलद्रोह करूं नये. उपकारकर्त्याबरोबर कृतज्ञपणें राहावें. मातापितरांना संतुष्ट ठेवावें. (२८) आपणावर भरंवसा ठेवणारांना सोडूं नये. षण्णवति श्राद्धादिकांचे वेळेस व निषिद्ध दिवस वार वगैरे दिवशीं क्षौर, तैलाभ्यंजन, मैथुन वगैरे कर्मे करूं नयेत. (२९) आदित्य, मंगळ, गुरु, शुक्र, जन्मवार या दिवशीं विशेष कर्मे करूं नयेत व सौम्य क्रिया कराव्यात. (३०--३१) दर दिवशीं सकाळीं उठावें. उदयादि संध्याकालाचे वेळेस निजूं नये. पूर्वेस किंवा उत्तरेस मुख करून सत्कर्मे करावींत. मंगळवारीं नवीन कामास आरंभ करूं नये. बुधवारीं ऋण काढूं नये. क्षुद्र जंतूंचा स्पर्श करूं नये. (३२) आत्मरक्षणाविषयीं विस्मरण होऊं देऊं नये. बुधवार, गुरुवार, शनिवार ह्या दिवशीं नवीन वस्त्रें चंद्रस्वरानें अंगावर घ्यावींत. (३३) बाकी वाराचे दिवशीं सूर्यस्वरानें भोजन करावें. उत्तराभिमुख होऊन चंद्रस्वरानें भोजन करूं नये. (३४) असाक्षिक होऊन (एकटें) जेवूं नये. तांब्याच्या पात्रांत दूध घालूं नये व पिऊं नये. मीठ घालून दूध पिऊं नये. नारळाचें

जलपान कांस्यपात्रीं करूं नये ॥३४॥ वामकरें न करावें जलपान ॥ तर्जनीनें न करावें दंतधावन ॥ सुपारी न पाहोन ॥ विड्याचें पान न धुतां ॥ ३५ ॥ चुना न शोधतां ॥ तांबूलस्वीकार करूं नये ह्मणती ॥ वामहस्तें शिर विंचरूं नये ह्मणती ॥ मद्कारक वस्तु सेवूं नये ॥३६॥ उत्तरशिर करून न करावें शयन ॥ न करावें दिवामैथुन ॥ न करावी दिवानिद्रा जाण ॥ न करावा दासीवेश्यासंग ॥३७॥ मरणावस्था आली ह्मणोन ॥ जाऊं नये हीनासमीप " देहि " ह्मणोन ॥ " देहि " ह्मणोनि आलेल्या याचका लागून ॥ नास्ति ऐसें ह्मणूं नये ॥३८॥ कोणतेंही येणार तें येतें जाण ॥ न येणार तें येत नाहीं ह्मणोन ॥ न करावें स्थितिगतिचिंतन ॥ भाग्यक्षय होऊन द्रव्य जातां ॥ ३९ ॥ त्यागभोगशेष राखूं नये जाण ॥ क्षीण होतां धन ॥ आणिक द्रव्यार्जन ॥ गृहच्छिद्र अपमान ॥ न सांगावा कोणासी ॥४०॥ सूपकारासी ॥ वैद्यासी ॥ मर्मज्ञासी ॥ कोपवूं नये ॥४१॥ अनाहूत जाऊं नये परसद्ना ॥ कार्य सांगूं नये निश्चयावीण ॥ शिवारामक्षेत्रीं मलमूत्रविसर्जन ॥ करूं नये ऐसें ह्मणती ॥ ४२ ॥ पंचसूतकें करूं नये जाण ॥ न करावें लौकिकाचाराति-

---

पाणी काशाच्या पात्रांत धरून पिऊं नये. (३५) डाव्या हातानें पाणी पिऊं नये. तर्जनी ( आंगठ्याजवळच्या ) बोटानें दांत घासूं नये. सुपारी न पाहतां, पानें न धुतां (३६) चुना न शोधतां, तांबूल स्वीकार करूं नये. डाव्या हातानें डोकें खाजवूं नये. मादक वस्तु स्वीकारूं नये. (३७) उत्तरेस डोकें करून निजूं नये. दिवानिद्रा, दिवामैथुन करूं नये. दासी व वेश्या यांचा सहवास करूं नये. (३८) मरणावस्था आली तरी नीचाजवळ याचना करूं नये. याचकांना नाहीं असें ह्मणूं नये. (३९) कोणतेंही असो, नशिबांत असेल तितकेंच येत असतें. नशिबांत नसलेलें कधींहि येत नसतें याकरितां स्थितिगतीची चिंता करूं नये. भाग्यक्षयाचे वेळेस कांहीं केलें तरी द्रव्य राहत नाहीं. (४०) याकरितां दान करून भोग भोगून द्रव्याचा क्षय करून टाकावा. धनक्षय, द्रव्यार्जना, गृहच्छिद्र, अपमान हे विषय दुसऱ्यापुढें सांगूं नयेत. (४१) स्वयंपाकी, वैद्य, आपलीं मर्में जाणणारे यांच्याशीं विरोध करूं नये. (४२) न बोलावतां दुसऱ्याच्या घरीं जाऊं नये. प्रश्न न ऐकतां कोणास कांहीं सांगूं नये. शिवारामक्षेत्रादिकांचे ठिकाणीं मलमूत्र विसर्जन करूं नये. (४३) पंचसूतकें मानूं नयेत. लौकिकाचारांचा अतिक्रम करूं नये.

क्रमण ॥ न करावें जातिसंक्रमण ॥ दासीभृत्यादिकांसीं ॥४३॥ अन्नव- स्त्र न देतां दुखवूं नये जाण ॥ दीर्घ द्वेष करूं नये जाण ॥ फलवृक्ष तोडूं नये जाण ॥ पापकृत्यें करूं नये ॥४४॥ धनवनितादि अनित्य ह्मणोन ॥ दृढानुराग करूं नये जाण ॥ दंभार्थ शिवपूजन ॥ करूं नये केव्हांही ॥४५॥ इत्यादि सुनीति असोन ॥ गृहस्थानें करावें मनन ॥ नीतिमार्ग सांडोन ॥ जाऊं नये कधींही ॥४६॥

## वानप्रस्थाश्रम.

आणिक त्या गृहस्थासी अति ॥ उपजली जरि विरक्ति ॥ तरी वा- नप्रस्थ अथवा यति ॥ आश्रम स्वीकारावा ॥१॥ सतिसंग करूनि अं- गीकार ॥ नातरी वनितादिगृहभार ॥ पुत्रासि समर्पून सर्वत्र ॥ उप- रांति ॥२॥ सर्वसंग परित्याग करूनि ॥ जातेसमयीं गृह त्यजुनी ॥ त- पःकार्यें सिद्धार्थी होउनी ॥ विवेकावें ॥३॥ उत्तरायण शुक्लपक्ष शुभ- वार ॥ शुभलग्न शुभ नक्षत्र ॥ सुमुहूर्त विचारूनि अंगीकार ॥ करावा सर्वथा ॥ ४ ॥

## प्रयाणवारशूल.

शनिवार सोमवार पूर्वें ॥ सर्वथा न निघावें ॥ आदित्य शुक्रवारीं न जावें ॥ पश्चिमेसीं ॥१॥ मंगळ बुधवारीं प्रयाण ॥ उत्तर दिशेसीं न क-

---

जातिसंकर होऊं देऊं नये. दासी नोकर यांना (४४) अन्नवस्त्र न देतां त्यांचीं मनें दुखवूं नयेत. दीर्घ द्वेष करूं नये. फळझाडें तोडूं नयेत. पापकृत्य करूं नये. (४५--४६) द्रव्य व स्त्रिया अनित्य असल्यामुळें त्यांवर दृढानुराग करूं नये. दं- भाकरितां पूजादि कर्में करूं नयेत. ही सर्व नीति गृहस्थानें पाळावी.

### वानप्रस्थाश्रम.

(१) त्या ग्रहस्थाला वैराग्य उत्पन्न झाल्यास त्यानें वानप्रस्थाश्रमाचा किंवा संन्यासाश्रमाचा स्वीकार करावा. (२) त्यांत वानप्रस्थाश्रमांत जावयाचें झाल्यास पत्नीसहित जावें किंवा पत्नी घर वगैरे मुलाचे ताब्यांत देऊन नंतर (३) सर्व संग त्याग करून वनाला जावें. त्या समयीं तपश्चर्येच्या कार्यसिद्धीकरितां (४) उत्तरायण, शुक्लपक्ष, शुभवार, शुभलग्न, शुभनक्षत्र स्वानुकूलता यांचा विचार करावा.

### प्रयाणवारशूल.

(१) शनिवारीं, सोमवारीं पूर्वेस जाऊं नये. आदित्यवारीं, शुक्रवारीं पश्चिमेस जाऊं नये. (२) मंगळवारीं, बुधवारीं उत्तरेस जाऊं नये, गुरुवारीं दक्षिणेकडे प्र-

णें ॥ गुरुवारीं दक्षिणे ॥ निघो नये ॥२॥ आतुरपक्षीं जाण ॥ दानभोजनादिकांनीं ॥ प्रतिक्रिया करोन ॥ अनुकूल करून घ्यावें ॥ ३ ॥ स्वर होरादिक जाण ॥ यथालाभ समय साधून ॥ अभिसंधि शुद्ध होवून ॥ प्रयाण करावें ॥ ४ ॥

## अपशकुन.

हरडा गर्दभ गवळी ह्मणोन ॥ वामभागीं शब्द करीत असोन ॥ हरिण भारद्वाज हंसजाण ॥ आडवा येऊं नये ॥ १ ॥ जंबूक मोर नकुल जाण ॥ कावळा हरिणीरोदन ॥ गरुड जरी उजवीकडे येई डावीकडून ॥ वायस येई उजवीकडून डावीकडे ॥२॥ सर्पाचें आडवें आगमन ॥ सशाचें दर्शन ॥ एक शिंकश्रवण ॥ ताक केंस विखुरलेल्या स्त्रिया ॥३॥ तैलाभिषिक्त मानव जाण ॥ आणिक विधवा मृत्तिकाभांड नूतन ॥ कुऱ्हाड इत्यादि आयुधें जाण ॥ अपशकुन ह्मणती ॥ ४ ॥ रज्जु रिक्तकुंभ सर्पण ॥ कलह मांजर एक ब्राह्मण ॥ अंगहीन मानव पांगळा श्वान ॥ वानर अपशब्द आर्द्रवस्त्र ॥५॥ धूम्रयुक्त मेघवाहन ॥ रजस्वला स्त्री ह्मणोन ॥ इत्यादि दुर्दर्शन ॥ झालें असतां ॥६॥ आणिक प्रतिकूल समीरण ॥ प्रतिघातपात रजोदर्शन ॥ तुषारादिकांचें आ-

---

याण करूं नये. हे वार शूल जाणावेत. (३) आतुरसमयीं दान भोजनादिकांनीं प्रतिक्रिया करून (४) स्वर होरा वगैरे योग्य समयबलानें अभिसंधिशुद्ध होऊन गांव सोडून निघावें.

## अपशकुन.

(१) हरडा (पक्षी विशेष), गाढव, गौळीण यांनीं डाव्या भागीं शब्द करूं नये. हरिण, भारद्वाज, हंस, हे आडवे येऊं नयेत. (२) कोल्हा, मोर, नकुल, कावळा, हरिणी वगैरे प्रयाण करतांना रडूं नयेत. गरुड डावीकडून उजवीकडे जाऊं नये. कावळा उजवीकडून डावीकडे जाऊं नये. (३) सर्प आडवा येऊं नये. ससा येऊं नये. एक शिंक ऐकूं नये. ताक, केंस मोकळे सोडलेली स्त्री, (४) तेल डोक्यास चोळलेला मनुष्य, विधवा (विकेशी), कोरें मडकें, कुऱ्हाड वगैरे आयुधें समोर येऊं नयेत. (५) दोर, लांकडें, रिकामी घागर, कलह, मांजर, एकटा ब्राह्मण, अंगहीन मनुष्य, लंगडा, कुत्रा, वानर, अपशब्द, ओलें वस्त्र, (६) धूर असलेला अग्नि, रजस्वला वगैरेंचें दर्शन होऊं नये. (७--८) प्रतिकूल वारा, प्रतिघात, पात, धूळ तुषार वगैरे दिसल्यास आपल्यास दैव सहाय नाहीं, असें समजून त्या

गमन ॥ तात्काळीं ॥७॥ दैव सहाय नाहीं ह्मणोन ॥ न करितां प्रयाण॥ परत फिरोन ॥ स्वगृहीं यावें ॥८॥ नंतर स्वस्तिवाचन करोन ॥ सर्व मंगलालंकृत सांबशिवध्यान करोन ॥ समाधान चित्त करोन॥ प्रभातकालीं ॥ ९॥ अभिजिन्मुहूर्तीं उठोन ॥ निश्चयदार्ढ्य धरोन ॥ करावें प्रयाण ॥ विध्युक्त ॥१०॥

## शुभशकुन.

नंतर गो वृषभ ह्मणोन ॥ कन्यका कलश ह्मणोन ॥ हरिद्रा कुंकुम ह्मणोन ॥ गंध पुष्प ॥१॥ तांबूल दर्पण॥ छत्र चामर व्यजन ॥ गज तुरग मंगल वादन ॥ वेश्याजन भोज्यान्न ॥२॥ दधि फलादिक ह्मणोन॥ प्रदक्षिण ज्वालामाली अग्निहोत्र जाण ॥ विभूति रुद्राक्षालंकृत द्विब्राह्मण ॥ शव सुराभांड ॥३॥ मीनद्वय शुभ जाण ॥ कुंभद्वय पूर्ण ॥ अनुकूल पक्षिगमन ॥ अनुकूल प्रियवचन ॥ ४ ॥ अनुकूल यान ॥ मांसखंड जाण ॥ हितमित्रादि संदर्शन ॥ शुभ शकुन जाणा ॥५॥ तयें हृष्टमन होऊन ॥ परमेश्वर सहाय ह्मणोन ॥ निश्चय करोन ॥ प्रयाण करावें ॥ ६ ॥

## अरण्यवास.

बहु दूर प्रयाणासी चंद्रस्वर ॥ समीप प्रयाणासी सूर्यस्वर ॥ वि-

---

वेळीं प्रयाण करूं नये. पुनः घरीं येऊन (९) स्वस्तिवाचन करून सर्व मंगलयुक्त शिवध्यान करावें. शांत मन करून प्रातःकालीं (१०) अभिजिन्मुहूर्ताच्या वेळेस गांव सोडून बाहेर निघावें.

### शुभशकुन.

(१) गाय, बैल, कन्या, भरलेला कलश, हळद, कुंकू, गंध, पुष्प, (२) तांबूल, दर्पण ( आरसा ), छत्र, चामर, व्यजन ( पंखा ), हस्ति, घोडा, मंगलवाद्य, वेश्या, भोज्य अन्न, (३) दहिं, फळें, प्रदक्षिणज्वाला ज्याला आहेत. असा अग्नि, विभूतिरुद्राक्षालंकृत विप्रद्वय, प्रेत, सुरापान, (४) मत्स्यद्वय, पूर्ण कुम्भद्वय, अनुकूल पक्षिगमन, अनुकूल प्रियवचन, (५) अनुकूल यान, मांसखंड, हितमित्रादि संदर्शन, हे सर्व शुभ शकुन आहेत असें समजून (६) आनंदयुक्त मनानें परमेश्वराचें साहाय आपल्यास पूर्ण आहे असा निश्चय करून निघावें.

### अरण्यवास.

(१) पुष्कळ दूर जावयाचें झाल्यास चंद्रस्वराचा व जवळ प्रयाण करावयाचें

वारें करावा अंगीकार ॥ मंगळ सूचनेनें ॥१॥ चिरकाल प्रयाणासी अ-
प्तत्व ॥ क्षिप्रप्रयाणासी तेजस्तत्व ॥ असावें ह्मणोन इत्यादि जाणोन त-
त्व ॥ करोनि आत्मरक्षण ॥२॥ ग्रामाबाहेर करावें प्रयाण ॥ इति बाधा
नसोन ॥ रम्य पुण्यवन ॥ प्रवेशावें ॥३॥ फलवृक्ष कंदमूल समीप अ-
सोन ॥ आणिक जलाशय प्रदेश जवळ असोन ॥ अशा प्रदेशीं वस-
तिस्थान ॥ यथायुक्त करावें ॥४॥ अथवा यथासुख परिकल्पित ॥ पर्ण-
शाला सुस्थित ॥ करोनि तेथ ॥ वास करावा ॥५॥ अथवा तरुमूला-
दि छायाश्रयस्थान ॥ अथवा निकुंज गुहाद्युपाश्रयस्थान ॥ सुखचित्तें
पाहोन ॥ वनस्पति प्रार्थनापूर्वक ॥६॥ भूरक्षादिक करोन ॥ करावें सु-
खनिवासस्थान ॥ इति निश्चय करोन ॥ विध्युक्त ॥७॥

## वानप्रस्थदीक्षा.

नंतर संकल्प संस्कारपूर्वक होऊन ॥ जटा यज्ञोपवीत बृसी कृष्णा-
जिन ॥ वल्कल वेणु वेत्र हसंती धमनी व्यजन ॥ पात्रभाजन पर्ण रज्जु
खनित्र पिटकादि सह ॥ १ ॥ भस्मधारण करोन ॥ रुद्राक्ष पवित्रादि
धारण करोन ॥ केश श्मश्रु लोमनखादि न त्यजोन ॥ विशेष निषिद्ध
त्यागावें ॥२॥ ग्रामप्रवेश न करोन ॥ कामक्रोधादिक सोडोन ॥ प्रति-

---

झाल्यास सूर्यस्वराचा विचारपूर्वक अंगीकार करावा. (२) चिरकाल प्रयाणास अ-
प्तत्व असावें. क्षिप्रप्रयाणास तेजस्तत्व असावें. हें सर्व जाणून आत्मरक्षण करून
(३) गांव सोडून बाहेर निघावें. नंतर निरुपद्रवी रम्य पुण्यवनांत प्रवेश करावा.
(४-५) आसपास जवळ फळझाडें, कंदमूल, जलाश्रयप्रदेश वगैरे पाहून तेथें सु-
खाची उत्तम पर्णशाला बांधावी. (६) किंवा झाडाची दाट छाया कोठें आहे, ती
जागा पाहावी किंवा निकुंज, गुहा वगैरे ठिकाणें पाहावींत. अशा त्या ठिकाणीं
वनस्पतिप्रार्थना करीत (७) व भूरक्षा वगैरे करीत सुखानें वास करावा.

## वानप्रस्थदीक्षा.

(१) नंतर संकल्प करावा आणि करावयाचे संस्कार करून घ्यावेत. जटा, य-
ज्ञोपवीत, बृसी ( दर्भासन ), कृष्णाजिन, वल्कल, वेणुवेत्र ( वेळूची किंवा वेताची
काठी), धमनी, पंखे, पात्र, भाजन, पर्ण, रज्जु, कुदळ, पिटक ( टोपली), शेगडी
वगैरे पदार्थ नेहमीं जवळ बाळगावेत. (२) भस्मरुद्राक्षादि धारण करून नेहमीं
पवित्र राहावें. केंस, श्मश्रु, लोम, नखें वगैरे काढूं नयेत. विशेष निषिद्ध पदार्थ
सोडून द्यावेत. (३) ग्रामप्रवेश करूं नये. कामक्रोधादिक सोडावेत. वाद घेऊं नये.

ग्रहपराङ्मुख होवोन ॥ त्रिषवणस्नान शांभवव्रत ॥ ३ ॥ त्रिपुंड्र धारण ॥ त्रिसंध्योपासन ॥ त्रेतायजन मंत्रानुष्ठान ॥ पंचमहायज्ञ ॥४॥ आणिक शिवार्चन ॥ यमनियमासन ॥ प्राणायाम प्रत्याहार ध्यान ॥ धारण समाध्यष्टांगयोगनिष्ठा ॥५॥ कृच्छ्र चांद्रायणाद्युपवास जाण ॥ पयोव्रत गोमूत्रप्राशन ॥ जलपान वायुभक्षण पर्णाशन ॥ फलाशन कंदमूलाशन ॥६॥ नीवारकडंगरीयादि संग्रह ह्मणोन ॥ आणिक भूशयन ॥ शीतवातधर्मतितिक्षायुक्त होवोन ॥ नखवितुष द्विदल धान्यादिक ॥७॥ संतोषें स्वीकार करोन ॥ तपःशुष्कगात्र होऊन ॥ शिवसेवा करोन ॥ राहावें यथाविधि ॥ ८ ॥

## पंचाग्निमध्यतप.

नंतर शरीरस्थानीं ॥ मूलाधारादिस्थित जाठरकालाग्नि ॥ जलादिगत तैक्ष्ण्यरूप वडवाग्नि ॥ तरुपाषाणादिगर्भस्थ ॥ १ ॥ असोन व्यक्त दिसे भौमाग्नि ॥ वृष्टींत अभिव्यक्त होऊनि दिसे विद्युदशनिपातरूप वैद्युताग्नि ॥ दिवसा प्रकाशक सूर्याग्नि ॥ ऐसे सूक्ष्मबिंदुरूप पंचाग्नि समजावें ॥२॥ ग्रीष्मादिरूप कालाग्नि ॥ आतपरूप सूर्याग्नि ॥ पुण्या-

---

त्रिषवण स्नान करावें. शांभवव्रत करावें. (४) त्रिपुंड्र धारण करावें. त्रिसंध्योपासना करावी. त्रेतायजन करावें. मंत्रानुष्ठान करावें. पंचमहायज्ञ करावेत. (५) शिवार्चना करावी. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि इत्यादि अष्टांगयोगामध्यें निष्ठा ठेवावी. (६) कृच्छ्र, चांद्रायण वगैरे व्रतें करावीं. पयोव्रत, गोमूत्रप्राशन, जलपान, वायुभक्षण, पर्णाशन, फलाशन, कंदमूलाशन, (७--८) नीवार कडंगरीयादि संग्रह, भूशयन, शीत वात धर्मतितिक्षा वगैरे चांगल्या रीतीनें पाळून नखानें तूस काढून द्विदळ धान्यादिकांचा संतोषानें स्वीकार करावा. एकूण तपश्चर्येनें शरीर शुष्क करून शिवसेवा करावी.

### पंचाग्निमध्यतप.

(१) शरीरामध्यें मूलाधारादिकांचे ठिकाणीं असणारा जाठरकालाग्नि, जलादिगत तीक्ष्णस्वरूप वडवाग्नि, तरु, पाषाण इत्यादिकांच्या गर्भांत (२) असणारा व स्पष्टपणें दिसणारा भौमाग्नि, वृष्टि होत असतां वीज वगैरे रूपानें अभिव्यक्त होणारा वैद्युताग्नि, दिवसा प्रकाशणारा सूर्याग्नि, याप्रमाणें सूक्ष्म बिंदुरूप पंचाग्नि होत यांचें साधन करावें. (३) किंवा ग्रीष्मादिरूप कालाग्नि, आतपरूप सूर्याग्नि,

भिव्यक्तरूप सूर्यकांताग्नि ॥ वेण्वभिव्यक्त दावाग्नि ॥३॥ देहांतर्गत उदराग्नि ॥ ऐसे जाण पंचाग्नि ॥ आणिक तो भौमाग्नि ॥ चारी दिशेस कुंडांमध्यें स्थापून ॥४॥ मध्यभागीं योगासनासीन ॥ होवोन सूर्याग्नीनें तपश्चरण ॥ करून साधतो पंचाग्नि ॥ यथाविधि सेवा करीत ॥५॥ एकपादस्थित इत्यादिकें करून ॥ करतो उग्र तपाचरण ॥ औदुंबर वैपासक ह्मणवोन ॥ आणिक प्रक्षालिक पौर्णिम ॥६॥ ऐसे चतुर्विध होऊन ॥ असतो तो वानप्रस्थ जाण ॥ याप्रमाणें लक्षण ॥ सांगितलें॥७॥

## यत्याश्रम.

नंतर त्या वानप्रस्थास जरी ॥ आणिक ब्रह्मचारी ॥ आणिक गृहस्थासि जरी ॥ दृढतर वैराग्य उत्पन्न होईल ॥ १ ॥ तयानें करावा यत्याश्रम स्वीकार ॥ त्या यतींमध्यें चतुर्विधप्रकार ॥ प्रवृत्तिभेदानें दिसती प्रकाशाकार ॥ कुटीचक बहूदक ॥ २ ॥ हंस परमहंस ह्मणोन ॥ ऐसा यति चतुर्विध असोन ॥ त्यांमध्यें सर्वांनीं काम्यफल सोडोन ॥ आश्रमोक्तधर्मांनीं ॥३॥ चालत असोन ॥ व्याहृति प्रणव ह्मणोन ॥ पंचाक्षर हंसजप ह्मणोन ॥ निवृत्तिधर्म ॥४॥ विरक्तलक्षण ॥ शिवयोगयुक्त होऊन ॥ शमदमादिनिष्ठित असोन ॥ संचरती जाणा ॥५॥

---

रत्नाभिव्यक्तिरूप सूर्यकांताग्नि, वेण्वभिव्यक्त दावाग्नि, (४) देहांतरगत जठराग्नि. अशा रीतीनें तरी पंचाग्नि साधन करावें. किंवा भौमाग्नीला चोहोंकडे केलेल्या कुंडांत घालून (५) मध्यें आपण योगासनानें बसून वर सूर्याग्नीला पाहत तप करणें. यालाही पंचाग्नि साधन ह्मणतात. या पंचाग्नींत बसून विधिपूर्वक शिवसेवा करतात. (६) कांहीं लोक पंचाग्नींमध्यें एका पायावर उभे राहून उग्र तप करतात. एकंदरींत औदुंबर, वैपासक, प्रक्षालिक, पौर्णिम (७) असे चार प्रकार वानप्रस्थांमध्यें आहेत. अशा रीतीनें वागणाऱ्याला वानप्रस्थ ह्मणतात.

### यत्याश्रम.

(१) वानप्रस्थ असो, गृहस्थ असो, ब्रह्मचारी असो, त्याला दृढ वैराग्य उत्पन्न झालें असतां (२-३) त्यानें यत्याश्रमाचा स्वीकार करावा. यतीमध्यें प्रवृत्तिभेदानें कुटीचक, बहूदक, हंस, परमहंस असे चार भेद आहेत. त्यांमध्यें त्यांनीं काम्यफल त्याग करून आश्रमोक्त धर्म (४) सोडूं नयेत. व्याहृति, प्रणव, पंचाक्षर या मंत्रांचा जप करावा. वृत्तिधर्मानें वागावें. ( ५ ) विरक्तलक्षणांनीं युक्त असावें. शिवयोग करावा. शमदमादि परिनिष्ठित होऊन रहावें.

## कुटीचकसंन्यासी.

नंतर त्याचें ठायीं शिखायज्ञोपवीत ॥ त्रिदंडकमंडलुभिक्षापात्र ॥ काषायांबर ॥ पादुका धारण ॥१॥ त्रिसंध्याकाल भस्मोध्दूलन ॥ तिर्यक् त्रिपुंड्र धारण ॥ रुद्राक्ष आभरण ॥ शिवलिंगार्चन ॥२॥ प्रणवव्याहृति गायत्री ह्मणोन ॥ हंसपंचाक्षर ह्मणोन ॥ मंत्रांचा जप करीत असोन ॥ परम विश्वासें ॥३॥ स्वजातींत ॥ अथवा पुत्रबंध्वादि गृहांत॥ भिक्षान्न मागत ॥ भोजन करी ॥४॥ ऐसा तो शिवयोगी जाण ॥ कुटीचक संन्यासी ह्मणोन ॥ ऐसें शास्त्रवचन ॥ सांगे दृढनिश्चयें ॥५॥

## बहूदकयति.

आणिक शिखायज्ञोपवीती होऊन ॥ गोवालरचित रज्जुसंबंधत्रिवेणुदंड धरोन ॥ कांस्यपात्र मृण्मयपात्र ह्मणोन ॥ अथवा दारुपात्र॥१॥ यांमध्यें एक पात्र धरोन ॥ कंथा कौपीन ॥ आच्छादन ॥ कृष्णाजिन॥ आतपत्र ॥ २ ॥ पादुका सूचिका तरी ॥ आणिक कर्तरी ॥ योगदंड योगपट्टादि परी ॥ योगपट्टादि सामग्रीयुक्त ॥३॥ भसितोध्दूलन ॥ त्रिपुंड्रधारण ॥ रुद्राक्षमालाभरण ॥ शिवलिंगार्चन ॥४॥ सप्रणव सावित्री जपोच्चारण ॥ त्रिसंध्याकालीं आचरित असोन ॥ त्यक्त वेदाध्य-

---

## कुटीकचसंन्यासी.

(१) त्या यतींमध्यें शिखा यज्ञोपवीत धारण करणारा, त्रिदंड, कमंडलु, भिक्षापात्र, काषायांबर, पादुका धारण करणारा, ( २ ) तिन्हीहि संधिकालचे वेळेस भस्मोध्दूलन त्रिपुंड्रधारण करणारा, शिवलिंगार्चन करणारा, ( ३ ) प्रणव, व्याहृति, गायत्री, हंस, पंचाक्षर मंत्रांचा जप करणारा, (४) स्वजातींत किंवा पुत्रबांधवादिकांकडून भिक्षान्न आणून भोजन करणारा, (५) असा शिवयोगी जो असेल त्याला कुटीचकसंन्यासी ह्मणतात.

## बहूदकयति.

(१) आणि जो शिखा यज्ञोपवीत धारण करून गोवालरचित रज्जूनें वेष्टलेलां त्रिवेणुदंड धारण करतो, व कांस्यपात्र, दारुपात्र, मृत्पात्र, (२) यांपैकीं कोणतें तरी एक पात्र हातांत धरतो. आणि कंथा, कौपीन, आच्छादन, कृष्णाजिन, छत्र (३) पादुका, सुई, कातर, योगदंड, योगपट्ट, योगपट्टादि परिकर धारण करतो. (४) व भसितोध्दूलन करतो, त्रिपुण्ड्रधारण करतो, रुद्राक्ष माळेचें आभरण घालतो, शिवलिंगार्चन करतो. (५) सप्रणव गायत्री मंत्राचा जप त्रिसंध्येच्या वेळेस

धन ॥ ईश्वरध्यानासक्त ॥ ५ ॥ एकान्नरहित पुत्रबंधुजनं ॥ तयाचे घरीं न जावोन ॥ प्रत्येक सात घरीं भिक्षा मागोन ॥ लोकानुभवानें ॥ ६ ॥ तितिक्षापर होवोन ॥ सहज विरक्ति शिवयोगपर होवोन ॥ असे जो यतिजन ॥ तोचि बहूदक ॥७॥

## हंसयति.

आणिक बहिःशिखायज्ञोपवीत त्यजोन ॥ वेणुदंड एक धरोन ॥ कमंडलुपाणि होवोन ॥ मृत्पात्र पाणिपात्र ॥१॥ कंथा कौपीन ॥ आणिक आच्छादन ॥ काषायवस्त्र धरोन ॥ भस्मरुद्राक्षधारण ॥२॥ शिवाराधन ॥ प्रणवोच्चारण ॥ सावित्री पंचाक्षरोच्चारण ॥ हंसजपतत्पर ॥३॥ त्रिसंध्याकालीं गुरुवंदन ॥ इत्यादिक न चुकतां करोन ॥ एककालीं अष्टग्रास भिक्षान्नभोजन ॥ अजिव्हषंढ ॥४॥ पंगु अंध बधिर ह्मणोन ॥ मुग्ध इति षड्गुणयुक्त होवोन ॥ वनितादि विषयकामन ॥ तयांचें मनन ॥५॥ तयांचें वर्णन ॥ तयांचें विनोदीकरण ॥ रत्याचरण ॥ अंगीकार करणें ॥ ६ ॥ तयांचें चुंबन ॥ तयेविषयीं एकीकरण ॥ इत्याद्यष्टविध मैथुन ॥ त्याग करोन ॥७॥ मोक्षाधिकारें करून ॥ अध्यात्मचिंतक होवोन ॥ असे तो जाण ॥ हंसयति ॥८॥

---

न चुकतां करतो, वेदाध्ययन सोडून ईश्वरध्यान करतो, (६) एकान्न भोजन करीत नाहीं. बंधुपुत्रादिकांचे घरीं जात नाहीं, निराळ्या सात घरीं भिक्षा मागतो, लोकानुभवानें (७) तितिक्षातत्पर होऊन राहतो, सहज वैराग्ययुक्त होऊन शिवयोगतत्पर असतो तो बहूदक होय.

## हंसयति.

(१-२) बाहेर दिसणाऱ्या शिखा काढून टाकणारा, यज्ञोपवीत न घालणारा, वेणुदंड, कमंडलु, मातीचें पात्र, हस्तपात्र, कंथा, कौपीन, आच्छादन, काषायवस्त्र धारण करणारा, भस्मरुद्राक्ष धारण करणारा. (३) शिवाराधना करणारा, प्रणव, सावित्री, पंचाक्षर, हंस या मंत्रांचा जप करणारा, (४) त्रिसंध्येच्याकालीं गुरुवंदन वगैरे न चुकतां करणारा, एकाच वेळेला आठच घास खाणारा, आजिव्ह, षंढ, (५) पंगु अंधक, बधिर, मुग्ध अशा षड्गुणांनीं युक्त असणारा, वनितादि विषयांच्या ठिकाणीं कामना, स्मरण, (६--७--८--) स्तोत्र, विनोद, रति, कबुली, चुंबन, सहवास अशा आठ तऱ्हेच्या मैथुनांनीं रत नसणारा, मोक्षादिचिंतनानें अध्यात्मचिंतन करणारा तो हंस यति होय.

## परमहंसयति.

शिखायज्ञोपवीत ॥ नित्यकर्मादि कृत्य ॥ त्रिदंडकमंडल्वादि समस्त ॥ परित्यागुनी ॥१॥ कंथाकौपीन शीत ॥ परिहारानिमित्त ॥ पाणिपात्रादिवस्त ॥ स्वीकारूनी ॥२॥ आणिक दिव्यस्नान ॥ वारुणस्नान॥ मानसस्नान वायव्यस्नान ॥ आग्नेयस्नान इति पंचविध स्नानांत॥ ३॥ आग्नेय स्नान मानसस्नान ॥ तें सकळ स्नानांत मुख्य असोन ॥ कोटिगुण ॥ विशिष्ट असे ॥ ४ ॥ श्रुतिसिद्धांतसंमत होऊनिया ॥ असे त्याकारणें भलतिया ॥ आश्रमासी त्यजावया ॥ योग्य नव्हे ॥५॥ त्यालागीं अग्निरिति ॥ भस्म ह्मणोनि इति ॥ आदिमंत्रें भस्मोध्दूलनकृति॥ प्रणव हंसमंत्रांनीं त्रिपुंड्रधारण ॥६॥ शिवध्यानें निर्धूतकल्मष होवोन॥ रुद्राक्षमालाधारण करोन ॥ शिवलिंगार्चन ॥ सदाकाळीं ॥ ७ ॥ त्रिसंध्याकाळीं प्रणवसहित ॥ षट्प्राणायामयुक्त ॥ अष्टोत्तरशत ॥ प्रणवजप करूनि ॥८॥ एकांतवास सेवूनि ॥ सुखासनीं वसोनी ॥ समाधिनिष्ठ होउनि ॥ यथाशक्ति ॥९॥ वरि मधुकरी असंक्लृप्त ॥ प्राक्प्रणीत अयाचित ॥ तात्कालिक ह्मणोनि विहित ॥ पंचभिक्षांतरी ॥१०॥ नातरी एकान्न ॥ यथेष्ट ना अल्प योगानुगुण ॥ यथायुक्त भोजन ॥ करूनियां

---

## परमहंसयति.

(१) शिखा, यज्ञोपवीत, नित्यकर्म, त्रिदंड, कमंडलु, वगैरे परिकरांचा त्याग केलेला, (२) कंथा, कौपीन, पाणिपात्र वगैरे, शीतबाधे करितांच धारण करणारा (३) दिव्यस्नान वारुणस्नान, वायव्यस्नान, मानसस्नान, आग्नेयस्नान, या पंचविध स्नानांमध्यें ( ४ ) आग्नेयस्नान, मानसस्नान, दोन्ही मुख्य असल्यामुळें व कोटि गुणाधिक असल्यामुळें ( ५ ) व श्रुतिसिद्धांतसंमत असल्यामुळें त्या त्या आश्रम्यांस त्याग करावयास योग्य नसल्यामुळें (६) अग्निरित्यादि मंत्रांनीं भस्मोध्दूलन करणारा, प्रणव हंसमंत्रांनीं त्रिपुंड्र धारण करणारा, (७) शिवध्यानानें निष्कल्मष झालेला, रुद्राक्षमाला धारण करणारा, नित्य लिंगपूजा करणारा (८) त्रिसंध्येच्या वेळेस, प्रणवपूर्वक षट् प्राणायामांनीं अष्टोत्तरशत जप करणारा, (९) एकांतवास करून व सुखासन घालून यथाशक्ति समाधि लावणारा, (१०) मधुकर, असंक्लृप्त, प्राक्प्रणीत, अयाचित, तात्कालिक अशा पंचविध भिक्षा मागणारा (११) एकान्न खाल्लें तरी यथेष्ट किंवा अल्पस्वल्प न खातां योगानुगुण भोजन कर-

॥ ११ ॥ सद्गुरूपासन ॥ तयें साधनें आत्मज्ञान ॥ दृढीकरण ॥ करीत असे निरुता ॥१२॥ स्नान शौच सत्यादियुक्त होऊन ॥ अनृत कामक्रोध ह्मणोन ॥ लोभ मोह शोक ह्मणोन ॥ हर्ष दंभ ॥१३॥ दर्पादिक सोडोन ॥ चातुर्मास्याचरण ॥ करीत असोन ॥ स्वपूर्वाश्रमाचार ॥ १४ ॥ सर्व सोडोन ॥ उत्तराचारनिष्ठ होवोन ॥ दृढविरक्त शिवयोगी होऊन॥ जो असे तोचि परमहंस यति ॥१५॥

## अत्याश्रमी.

सूर्योदयरहितपूर्वक ॥ हें खद्योत हा दीपक ॥ हें नक्षत्र हा चंद्र एक ॥ ह्मणिजे निरुतें ॥१॥ भिन्नभिन्न प्रकारलक्षित ॥ प्रकाशांतर जात ॥ उदय झालिया आदित्य ॥ सकळ रविप्रभेआंत अंतर्भाव पावे ॥ २ ॥ तैसे ज्ञानोदयासि पहिले ॥ भिन्नभिन्न वेगळे ॥ अभिमानें योग्य झाले ॥ जे चतुराश्रमधर्म ॥ ३ ॥ तया आश्रमधर्माचरणें अंतःकरण ॥ शुद्ध होय वरि साधन ॥ चतुष्टयसंपन्न ॥ होउनिया ॥४॥ श्रीगुरूपदेशें वेदांतसिद्धांत ॥ विचारें जीवपरमैक्यत्व ॥ वशें सम्यग्ज्ञान विशेषत्व ॥ जालियावरी ॥५॥ तयें निर्विकल्प निर्विशेष ह्मणोनि ॥ चिन्मात्र नित्यशुद्ध ह्मणोन ॥ आनंदैकरसाद्वैतसिद्धि होवोन ॥ मुक्तज्ञानानंतर ॥ ६ ॥ तया ज्ञानासी निराळें अतिशय नसोन ॥ आपणासी आश्रमाभिमान नसो-

---

णारा, (१२) गुरूपासनेनें आत्मज्ञान दृढ करणारा, (१३) स्नान, शौच, सत्य पाळणारा, अनृत, काम, क्रोध, लोभ, मोह, शोक, हर्ष, दंभ, दर्प (१४) यांना सोडलेला, चातुर्मास्याचरण करणारा, पूर्वाश्रमाचार (१५) सोडलेला, उत्तराचारनिष्ठ असलेला, दृढ विरक्त असलेला, असा शिवयोगी परमहंस होय.

### अत्याश्रमी.

(१--२) सूर्योदयापूर्वी हा काजवा, हें नक्षत्र, हा चंद्र, याप्रमाणें असलेले निरनिराळे प्रकाशभेद, जसे सूर्योदयानंतर सूर्यज्योतीमध्यें अंतर्भाव पावतात. (३) त्याप्रमाणें ज्ञानोत्पत्तीच्या अगोदर निरनिराळ्या रीतीनें अभिमानण्यास योग्य असलेल्या चतुराश्रम धर्मांनीं (४) अंतःकरण शुद्ध होऊन नंतर साधनचतुष्टयसंपन्न होऊन (५) गुरुपदेशाच्या प्रभावानें वेदांत सिद्धांत जीव परमात्म्यैक्यविषयक ज्ञानानें (६) निर्विकल्पक, निर्विशेष, चिन्मात्र, नित्यशुद्धानंदैकरसाद्वैत सिद्धि करून घेऊन मुक्तज्ञानानंतर (७) त्या ज्ञानाला दुसरें कोणतें अतिशय विषय नसून आ-

न ॥ विधिनिषेधातीत होवोन ॥ प्रवेशतो निस्त्रैगुण्यपदांत ॥७॥ सर्वा-श्रम्यांसी पूज्य होवोन ॥ जीवन्मुक्त ह्मणवून ॥ स्थितप्रज्ञ ह्मणोन ॥ गु-णातीत ॥ ८ ॥ निर्लिप्त ज्ञानसिद्ध ह्मणोन ॥ अवधूत कृतकृत्य ह्मणोन ॥ भगवद्भक्त ब्राह्मण ह्मणोन ॥ शिवयोगसिद्ध ॥९॥ ऐशीं नांवें पावोन॥ कैवल्य परमहंस निरालंब ह्मणोन ॥ ब्रह्माद्युपनिषदुक्तप्रकारें असोन॥ राहे तो अत्याश्रमी ॥१०॥

## शिवयोगाधिकारी.

आणिक इति ॥ पूर्वोक्त प्रकार समस्त ॥ शैवधर्मरूप वर्णाश्रमाप्र-ति ॥ तयामध्यें ॥१॥ शुद्ध वैदिक तांत्रिक वैदिक ॥ शुद्धतांत्रिक वैदि-कतांत्रिक ॥ ह्मणोनि ज्ञानक्रियाभेद चतुष्क ॥ प्रकार होउनी असती ॥ २ ॥ त्यांचे ठायीं तंत्रवासना किंचित ॥ न रिघतां कदाचित ॥ वै-दिककर्म निष्ठावंत ॥ ते शुद्धवैदिक ॥ ३ ॥ वेद आणि स्मृति ॥ ह्मणजे उभयप्रीति ॥ युक्त जे असती अति ॥ ते तांत्रिकवैदिक ॥४॥ वेदवास-ना लेशमात्र ॥ न रिघतां निरंतर ॥ तांत्रिकनिष्ठातत्पर ॥ तो शुद्धतां-त्रिक ॥५॥ तंत्रवेदादिक ॥ उभय प्रीतियुक्त ॥ होउनि असती ते वैदि-क ॥ तांत्रिक ह्मणवी ॥६॥

---

पण आश्रमाभिमान सोडून विधिनिषेधमुक्त होऊन निस्त्रैगुण्य पदाला पोंचतो. (८) व जो सर्वाश्रम्यांकडून पूजा घेत जीवन्मुक्त, स्थितप्रज्ञ, गुणातीत होतो. (९) तसाच जो निर्लिप्त, ज्ञानसिद्ध, अवधूत, कृतकृत्य, भगवद्भक्त, ब्राह्मण, शिवयोग-सिद्ध होतो. (१०) आणि जो हीं नांवें पावून कैवल्य, परमहंस, निरालंब ब्रह्मादि उपनिषदें यांत सांगितल्याप्रमाणें आचरण करतो तो अत्याश्रमी होय.

## शिवयोगाधिकारी.

(१--२) या पूर्वोक्त सकलशैवधर्मरूप वर्णाश्रमांमध्यें शुद्ध वैदिक, तांत्रिक वै-दिक, शुद्धतांत्रिक, वैदिकतांत्रिक असे चार प्रकार ज्ञानक्रिया भेदानें झाले आ-हेत. ( ३ ) त्यांमध्यें तंत्रवासना न करतां वैदिककर्मांतच परिनिष्ठित असलेले ते शुद्ध वैदिक होत. (४) वेद व स्मृति यांवर प्रेम करणारे ते तांत्रिकवैदिक होत. (५) वेदवासना न करतां केवल तंत्रांमध्यें निष्ठा ठेवणारे ते शुद्ध तांत्रिक होत. (६) तंत्र व वेद या दोहोंवर प्रेम ठेवणारे ते वैदिकतांत्रिक होत.

## प्रमाणग्रंथविभाग.

तया अधिकाऱ्यांलागून ॥ मार्गसंकर न होय तैसें भिन्न भिन्न॥ विधिप्रतिपादक ते कवण ॥ ह्मणतिलें तरी ॥१॥ सूतसंहिता मुख्य ॥ पाराशरपुराणादिक ॥ शुद्धवैदिक ॥ प्रतिपादक ह्मणवी ॥२॥ शिवगीता शिवराघवसंवादात्मक ॥ वायव्यसंहितादिक ॥ तांत्रिकवैदिक ॥ प्रतिपादक ह्मणवी ॥३॥ शैव पाशुपत ॥ सोम लाकुल इति ॥ शास्त्रशुद्धतांत्रिकप्रति ॥ पादक ह्मणवी ॥४॥ भागवतशैवसिद्धांतादिक ॥ वैदिकतांत्रिकप्रतिपादक॥ ह्मणोनि जाणावें पूर्वक॥ इति चर्यापादांत॥५॥

### इति चर्यापाद समाप्त.

## योगपादप्रारम्भः

आणिक तया ॥ योगपादांत विवेकुनिया ॥ श्रीकंठेश्वरापासुनिया ॥ उपदेश पावले ॥१॥ श्वेतसदाव मदन सहोत्र ॥ कंक लोकाक्ष जनिपदधिवाह ॥ वृषभ उग्र अत्रि सुबालक गौतम वेदशिर ॥ गोकर्ण ॥२॥ गुहावासी शिखंडि जटामालि ॥ अट्टहास दारुक लांगुली ॥ महाकाय शूलि ॥ दंडि मुंडि ॥३॥ सहिष्णु सोमशर्मक ॥ लकुलीश ह्मणोनि अष्टक ॥ विंशति मुख्य ॥ योगाचार्य ॥ ४ ॥ एकएकांसि चौघे

---

## प्रमाणग्रंथविभाग.

(१) आणि अधिकाऱ्यांना मार्गसंकर न होऊं देतां निरनिराळे विधि प्रतिपादणारे ग्रंथ कोणते ह्मणाल तर सांगतात. (२) सूतसंहिता, पराशरपुराण, वगैरे शुद्ध वैदिक प्रतिपादन करितात. (३) शिवगीता, शिवराघवसंवाद, वायवीयसंहिता, वगैरे ग्रंथ तांत्रिकवैदिक प्रतिपादन करतात. (४) शैव, पाशुपत, सोम, लाकुल वगैरे ग्रंथ शुद्ध तांत्रिक प्रतिपादन करतात. (५) भागवत, शिवसिद्धांत वगैरे ग्रंथ वैदिकतांत्रिक प्रतिपादन करतात. याप्रमाणें या चर्यापादांत विषय सांगितले आहेत.

### इति चर्यापाद समाप्त.

## योगपादप्रारंभ

(१) या योगपादामध्यें प्रथम श्रीकंठेश्वराकडून उपदेश घेतलेल्या लोकांचीं नांवें सांगतात. (२) तीं अशीं कीं—श्वेत, सदाव, मदन, सहोत्र, कंक, लोकाक्ष, जनिपत्य, दधिवाह, वृषभ, उग्र, अत्रि, सुबालक गौतम, वेदशिर, गोकर्ण (३) गुहावासी, शिखंडी, जटामाली, अट्टहास, दारुक, लांगुली, महाकाव्य, शूली दंडी, मुंडी, (४) सहिष्णु, सोमशर्मा, लकुलीश, असे हे अठ्ठावीस योगाचार्य होत. आणि हे मोठे मुनीश्वर होत. (५) तर या प्रत्येकास चौघे चौघे शिष्य झाले. त्यांत श्वेत-

चौघे शिष्य ॥ श्वेतशिखादिगर्गमिश्रकरिष्य ॥ सहित शतद्वादश ॥ योगप्रवर्तक शिष्यसंयुक्त ॥५॥ भसितोध्दूलन त्रिपुंड्र ॥ रुद्राक्षमाळा योगदंड ॥ योगपट्टादिक अखंड ॥ आलंकृत होऊन ॥ ६ ॥ एक शिखा बहु शिखा ॥ पंचविध शिखा ॥ केशपाश मुंडितादिक ॥ होऊनिया ॥७॥ शांततेजोमय अति ॥ होऊनि असति ॥ तथा योगाचार्यांची स्थिति ॥ लक्षण जाणावें ॥८॥

## शिवयोगलक्षण.

नंतर तो योग जाण ॥ शिवचैतन्यापासोन ॥ जीवचैतन्य ॥ पृथक् जाणणें ॥ १ ॥ ऐशा अविद्यापाशपरिहारार्थ जाण ॥ शिवजीवयोगरूप ऐक्यज्ञानसिद्धि असोन ॥ तीतें मैत्र्यादिकानें ॥ शमादिकांनीं ॥२॥ परिष्कृत शुद्धांतःकरण ॥ तयास सकार्य होऊन ॥ आत्म्याचे ठायीं विलीनतारूप ह्मणोन ॥ दुःखमय द्वैत ॥ ३ ॥ तयास सुखमय असोन ॥ अद्वैतमय करावें ह्मणोन ॥ तयास योग ह्मणती जाण ॥ कर्मकौशल्यरूप ह्मणोन ॥४॥ असंग ब्रह्मात्मभावना ह्मणोन ॥ तयास योग ह्मणती महाजन ॥ निग्रहीत प्राण ॥ तयासह निरुद्ध मन ॥५॥ तयासि तारकशिवलिंग जाण ॥ तयाचे ठायीं निर्भेद होऊन ॥ ऐक्य तें जाण ॥ योग ऐसें निर्धारा ॥६॥

---

शिखापासून गर्गमिश्र करिष्यापर्यंत एकशे बारा मुनि योगप्रवर्तक झाले. (६)त्यांसह भसित, अक्षसूत्र, योगदंड, योगपट्ट इत्यादिकांनीं अलंकृत होऊन (७) एकशिखा, बहुशिखा, पंचशिखा, केशपाशमुंडन यांनीं युक्त ( ८ ) शांततेजोमय होऊन राहणारे ते शिवयोगाचार्य होत. याप्रमाणें शिवयोगाचार्यांचें लक्षण आहे.

## शिवयोगलक्षण.

(१) आतां शिवयोगाचा प्रकार सांगतात कीं, शिवचैतन्याहून जीवचैतन्य निराळें आहे. (२) असें समजून अविद्यापाशानें युक्त असलेल्या लोकांचे अविद्यापाश तोडावयाकरितां शिवजीवयोगरूप ऐक्यज्ञानसिद्धि संपादन करावी व मैत्र्यादिकांनीं शमादिगुणांनीं (३) परिष्कृत झालेल्या शुद्धांतःकरणास सहकारी होऊन आत्म्याचे ठिकाणीं लीन होणें हा एक योग होय. दुःखमय द्वैत (४) सुखमय अद्वैत करून राहणें हा एक योग होय. कर्मकौशल्यरूप (५) असंग ब्रह्मात्मभावना करणें हा एक योग होय. प्राणादिनिग्रह करून त्यांसह निरुद्ध झालेल्या मनास (६) तारकशिवलिंगामध्यें निर्भेदपणें ऐक्य करणें हा एक योग होय.

## शिवयोगभेद.

ईश्वराचे ठायीं चित्त ॥ परतोनिया तद्युक्त ॥ झालें एकत्व ॥ त्या- योगाचे परिभेद ॥१॥ मंत्रयोग लययोग ॥ हठयोग राजयोग ॥ ह्मणोनि चतुर्थ योग ॥ भेद ह्मणवी ॥२॥ मृदु ह्मणोनि मध्यम ह्मणोनि ॥ अति- मात्र ह्मणोनि ॥ अतिमात्रतर ह्मणोनि ॥ चतुर्विधक्रमें विशेषगुणी ॥ मंत्रा- दियोगक्रम ॥३॥ तया चारांचे अनुक्रमें विशेध ॥ प्रणव हंसादि मंत्र- भेद ॥ दश नाद दश बिंदु ॥ लक्षणादिक ॥ ४ ॥ यम नियम आसन ॥ प्राणायाम प्रत्याहार ध्यान धारण ॥ समाधि ह्मणिजे सगुण निर्गुण॥ अष्टांग योगविधी ॥ ५ ॥ अहिंसा सत्य अस्तेय ॥ ब्रह्मचर्य क्षमा धृति दया ॥ आर्जव मिताहार शौच ह्मणोनिया ॥ यमांग दश भेद ॥६॥ तप संतोष, आस्तिक्य, दान ॥ ईश्वरपूजन सिद्धान्तश्रवण ॥ लज्जामति जपव्रत ह्मणोन ॥ नियमांग दशभेद ॥७॥

## अहिंसादिलक्षण.

आणिक येथें विशेष ॥ यमादियोगलक्षणभेद ॥ कैसा कवण विविध ॥ ह्मणतिलें तरी ॥१॥ यज्ञार्थ पशु एक रहित ॥ प्राणिमात्रपरि समस्त ॥ न पीडन घात ॥ ते अहिंसा ह्मणवी ॥२॥ गुरुदेवताप्रयोजन ॥ विषयीं एक वांचून ॥ आपणासि आन ॥ आपदादिक ॥३॥ बंधन शरीरपात ॥

---

## शिवयोगभेद.

(१) ईश्वराचे ठिकाणीं एकाग्रचित्त करणें याला योग ह्मणतात. (२) योगांत मंत्र, लय, हठ, राज असे चार प्रकार आहेत. (३) आणि मृदु, मध्य, अतिमात्र, अतिमात्रतर असे चार प्रकार चतुर्विध योगक्रमानें मंत्रादियोगक्रम आहेत. (४) नंतर या चार योगानुक्रमानें प्रणवहंसादि मंत्रविधि, दशनाद दशलक्षणें, (५) यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा समाधिरूप सगुणनिर्गुणरूप अष्टां- गयोगविधि, (६) अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, क्षमा, धृति, दया, आर्जव, मिताहार, शौच, हें यमांगदशक (७) व तप, संतोष, आस्तिक्य, दान, ईश्वरपूजा, सिद्धांतश्रवण, लज्जा, मति, जप, व्रत हें नियमांगदशक या सर्वांचा विचार करावा.

## अहिंसादिलक्षण.

(१) आतां यमादियोगलक्षण सांगतात कीं, (२) यज्ञार्थपशुहिंसेशिवाय को- णत्याही बाजूनें सर्व प्राण्यांला क्लेश न देणें याला अहिंसा ह्मणतात. (३-४) गुरु- देवताप्रयोजनाशिवाय आपणावर बंधन, शरीरपात, भीति, वगैरे कसलेंहि संकट आलें

भीतीचे ठायीं अनृत ॥ न बोलणें किंचित तें सत्य ह्मणवी ॥४॥ चोरी-च्या कृतीनें ॥ नातरी बलात्कारानें ॥ परद्रव्य न परिहरणें ॥ तें अस्तेय ह्मणवी ॥५॥ वनितालावण्यदर्शनें ॥ कां ऐकोनि मनोवाक्यानें ॥ लेश-मात्र न चळे तेणें ॥ तें ब्रह्मचर्य ह्मणवी ॥६॥ हृदय वाक् नेत्र रेत इत्या-दि अंगें असोन ॥ परस्त्रीविषयीं जाण ॥ अथवा स्वस्त्रीविषयीं अशा-स्त्रीय रीतीनें न चलितां जाण ॥ निग्रहानें राहणें तें ब्रह्मचर्य ॥७॥ परो-पकारास आपण ॥ प्रत्यपकार करण्या समर्थ जाला विशेष गुण ॥ परि क्षमावंत असणें ॥ ते क्षमा ह्मणवी ॥८॥ अर्थ, बंधु, सुतादिकांचे ठायीं ॥ प्राप्ताप्राप्तविषयीं ॥ हर्ष विषादादि नसोन कांहीं ॥ असणें ती धृति ह्मणवी ॥९॥ रोगापासून पीडित ॥ झाले शत्रुमित्रादि समस्त ॥ तया अभिमुख होणें रक्षणार्थ ॥ ती दया ह्मणवी ॥१०॥ हर्ष शोकादि-कांचे ठायीं ॥ बुद्धि कलुषमय कांहीं ॥ नसोनि असणें निःसंदेही ॥ तें आर्जव ह्मणवी ॥ ११ ॥ अनल्प न यथेष्ट अन्न ॥ योगानुगुण्य ॥ करणें भोजन ॥ तो मिताहार ह्मणवी ॥१२॥ स्वदेहमलविमोचन ॥ निमित्ता-र्थ लागून ॥ मृत्तिकाजीवन ॥ संयोग करणें ॥ १३ ॥ मनोमलनिवृत्ति कारणें ॥ मंत्रध्यानादिक विधानें ॥ यथापूर्वक करणें ॥ तें शौच ह्मण-

---

तरी खोटें न बोलणें याला सत्य ह्मणतात. (५) चौर्यानें किंवा बलात्कारानें परद्र-व्यापहार न करणें याला अस्तेय ह्मणतात. (६) वनितादिविषय दृष्टीस पडले किं-वा कानांनीं ऐकिले तरी त्यांचे ठिकाणीं मनोवाक्कायांनीं मातृभाव ठेवणें याला ब्र-ह्मचर्य असें ह्मणतात. (७) अथवा हृदय, वाक्, नेत्र, रेत, अंग इत्यादिक परस्त्री-विषयीं किंवा स्वस्त्रीविषयीं अशास्त्रिय रीतीनें चलन न पावतां निग्रह करून रा-हणें याला ब्रह्मचर्य ह्मणतात. (८) दुसऱ्यानें केलेल्या अपकारांस प्रत्यपकार कर-ण्यास आपण समर्थ असला तरी प्रत्यपकार न करितां सहन करून घेणें याला क्षमा ह्मणतात. (९) अर्थ, बंधु, सुत यांची प्राप्ति होवो, किंवा प्राप्ति न होवो, हर्षशोक न मानणें याला धृति ह्मणतात. (१०) रोगादिकांनीं पीडित झालेल्या शत्रुमित्रादिकांचें रक्षण करण्याविषयीं झटणें याला दया ह्मणतात. (११) हर्ष शोक प्राप्त झाले असतां बुद्धि चंचल न करणें याला आर्जव ह्मणतात. (१२) अल्प व-यथेष्ट भोजन न करितां योगानुगुण भोजन करणें याला मिताहार ह्मणतात. (१३-१४) देहमलमोचनाकरितां मृत्तिकाशौच करणें, जलस्नान करणें, आणि मनो-

वी ॥१४॥ मी कोठील पै कवण ॥ मज हा संसार आला काय कारण ॥ कैसा सुटेल इति आत्मानात्मविवेक करून ॥ ऐशा विचारें शिवस्वरूपज्ञान तें तप ह्मणवी ॥१५॥ आपणासि जी भोग्यानुगुणें ॥ प्राप्ति होय तितुकियानें ॥ परमसंतुष्ट असणें ॥ तो संतोष ह्मणवी ॥१६॥ पुण्यपापस्वर्गनरक ॥ असती इति यथापूर्वक ॥ जाणणें तें आस्तिक्य ॥ ह्मणवी जाणिजे ॥१७॥ आपण साधिलेलें द्रव्यादिक ॥ धर्मार्थ देशकालपूर्वक ॥ सत्पात्रीं देणें विधियुक्त ॥ तें दान ह्मणवी ॥ १८ ॥ स्मरण स्तुति भजन निरंतर ॥ मनोवाक्कायें तत्पर ॥ शिवभक्ति दृढस्तुति ईश्वर ॥ पूजन ह्मणवी ॥१९॥ वेदांतार्थानुसंधान ॥ पूर्वक परि विचारण ॥ तें सिद्धांतश्रवण ॥ ह्मणवितसें ॥ २० ॥ लौकिकवैदिकविरोध ॥ मार्ग परि बहुविध ॥ तेथेंचि महासावध ॥ ती लज्जा ह्मणवी ॥ २१ ॥ विहित स्वधर्मीं विश्वास निश्चय ॥ मति ह्मणवी निःसंशय ॥ प्रणव शतरुद्रादि स्वाध्याय ॥ तो जप ह्मणवी ॥२२॥ धर्मार्थ आत्मसिध्यर्थ ॥ झालें उपायग्रहण तें ह्मणवी व्रत ॥ इति अहिंसादि समस्त ॥ लक्षणें जाणावीं ॥ २३ ॥

---

मलमोचनाकरितां मंत्रध्यान करणें याला शौच ह्मणतात. (१५) मी कोण ? मला हा संसार कसा आला ? हा संसार कसा सुटेल ? असा विचार करून आत्मानात्मविवेकानें शिवस्वरूप जाणणें याला तप असें ह्मणतात. (१६) आपल्या प्रारब्धांत जितकें असेल तितकें मिळतें, त्यांतच तृप्ति मानणें याला संतोष असें ह्मणतात. (१७) पुण्य पाप स्वर्ग नरक आहेत असें मानणें याला आस्तिक्य ह्मणतात. (१८) आपण मिळविलेलें द्रव्य धर्मार्थविधिपूर्वक क्रमानें देश काल पात्र यांना अनुसरून खर्च करणें याला दान ह्मणतात. (१९) स्मरण, स्तुति, भजन यांनीं त्रिकरणशुद्धिपूर्वक शिवभक्ति दृढ करणें याला ईश्वरपूजा ह्मणतात. (२०) वेदांतार्थ विचार करणें याला सिद्धांतश्रवण ह्मणतात. (२१) लौकिक वैदिक ह्यांहून विरुद्ध मार्गांत जाणाऱ्या मनाला सावधपणानें परत आणणें याला लज्जा ह्मणतात. (२२) विहित स्वधर्मामध्यें विश्वास ठेवणें याला मति ह्मणतात. प्रणव, शतरुद्रीय, स्वाध्याय करणें याला जप ह्मणतात. (२३) धर्मार्थ आत्मसिध्यर्थ उपायांचा स्वीकार करणें याला व्रत ह्मणतात. याप्रमाणें अहिंसादि लक्षणें जाणावींत.

## शिवयोगासन.

आणिक स्थिर सुखासनपूर्वक ॥ जो झाला निश्चलात्मक ॥ त्या योगासि आसन क्रमादिक ॥ कैसें ह्मणतिलें तरी ॥१॥ शुद्धासन सिंहासन ॥ स्वस्तिकासन सव्यासन ॥ शूलासन सुखासन ॥ सर्वतोभद्रासन ॥२॥ गोमुखासन गरुडासन ॥ मयूरासन मच्छेंद्रासन ॥ मच्छासन मुद्गरासन ॥ मंडूकासन ॥३॥ मृगासन नागासन ॥ कुक्कुटासन कुंजरासन ॥ कूर्मासन काष्ठासन ॥ क्रौञ्चासन ॥४॥ खड्गासन कामदहनासन ॥ योन्यासन वैय्याघ्रासन ॥ वैणिकासन वस्त्रासन ॥ वासवासन ॥५॥ वीरासन वाराहासन ॥ पर्यंकासन पद्मासन ॥ पथासन पश्चिमकारणासन ॥ त्रिपदासन ॥६॥ हस्तिकर्णासन ॥ हेमासन ॥ अर्थासन ह्मणिजे इत्यादि करून ॥ चौऱ्यांशी आसनभेद ॥७॥ तत्तल्लक्षणपूर्वक ॥ स्वस्वयोगस्थित्यनुसारक ॥ योग्यानें निर्धाक ॥ राहावें जाणिजे ॥ ८ ॥

## योगास षट्चक्रादिविवेक.

आणिक देहजनितपवन ॥ निरोधलक्षण ॥ तया प्राणायामविधिलागून ॥ प्रथमारंभीं ॥१॥ कुश कृष्णाजिन ॥ आदियोगग्रहोपकरण ॥ प्र-

---

## शिवयोगासन.

(१) सुखकर, स्थिर, निश्चल अशा योगयोग्यासनांमध्यें पुढील प्रकार आहेत ते असे (२) शुद्धासन, सिंहासन, स्वस्तिकासन, सव्यासन, शूलासन, सुखासन, सर्वतोभद्रासन, (३) गोमुखासन, गरुडासन, मयूरासन, मत्स्येंद्रासन, मत्स्यासन, मुद्गरासन, मंडूकासन, (४) मृगासन, नागासन, कुक्कुटासन, कुंजरासन, कूर्मासन, क्रौंचासन, काष्ठासन, (५) खड्गासन, कामदहनासन, योन्यासन, व्याघ्रचर्मासन, वैणिकासन, ( वेळूचें आसन--चटई ) वस्त्रासन, वासवासन, (६) वीरासन, वराहासन, पर्यंकासन, पद्मासन, पथासन, पश्चिमकारणासन, त्रिपदासन, (७) हस्तिकर्णासन, हेमासन, अर्थासन वगैरे चौऱ्यांशी भेद आहेत. (८) त्यांत त्या त्या आसनाचें लक्षण जाणून आपापल्या योगाला अनुसरून आसनाचा निश्चय करावा

## योगास षट्चक्रादिविवेक.

(१) प्राणायामाचें लक्षण ह्मणजे शरीरांतील वायूचा निरोध करणें हेंच होय. अशा प्राणायामविधीचा पहिला प्रकार झाल्यानंतर (२) कुश, कृष्णाजिन, वगैरे

कार रचना करून ॥ उपरि प्रथम ॥२॥ तैल पिण्याकादि अशेख॥ हीनवस्तु परि बाधक ॥ योगेश्वरासि मुख्य ॥ निषेधद्रव्यें ॥३॥ मुद्ग पटोलक ॥ गोधुमादि वस्तु सौख्य ॥ योगेश्वरासि सर्वक ॥ स्वीकारासि योग्य नियमें ॥४॥ वरि प्राणायामप्रारंभें श्रीगुरु ॥ सरस्वति विघ्नेश्वर ॥ विशाखादि देवता उपचार ॥ पूजाविधानें करावीं ॥५॥ आणिक सकळ ॥ मनुष्य शरीर सकल ॥ आपापुलें शाहाण्णव अंगुळ ॥ प्रमाण उन्नत असे ॥६॥ गुदस्थानावरि द्व्यंगुळ ॥ गुह्यस्थानाखालीं द्व्यंगुळ ॥ मध्यप्रमाण एक अंगुळ ॥ तें देहमध्य ह्मणवी ॥७॥ तेंचि मूलाधार ह्मणोन ॥ शिखीस्थान ह्मणोन ॥ नाम तया लागून ॥ विभेद परि ॥ ८ ॥ तयाकारणें त्रिकोण ॥ आकार होऊन ॥ तप्तसुवर्ण ॥ कांतिमय असे ॥९॥ आणिक तयापासून ॥ नवांगुल उन्नत चतुरंगुल विस्तीर्ण ॥ कुक्कुटांडाकार नाडीकंद असोन ॥ तयातें मध्यनाभि ह्मणवी ॥१०॥ नाभी वसे तया मध्यस्थानीं ॥ तया नाडीकंदापासोनि ॥ द्व्यंगुलांखालीं कुंडलिनी ॥ स्थान असे ॥११॥ ते कुंडलिनी सर्प अष्टप्रकृति ॥ रूपानें विकृति ॥ सप्तकुटिलाकृति ॥ होऊनिया ॥ १२ ॥ नाडीकंदमध्यस्थित सुषुम्ना ॥ ह्मणजे नाडीद्वार अंतर्मुखें आच्छादुनि ॥ दीर्घ विसरपाडु-

---

योगग्रहोपचारांचा स्वीकार करावा. नंतर (३) योगीश्वरानें निषिद्ध तेल, पिण्याकादि ( पेंड वगैरे ) निषिद्ध द्रव्यें (४) व मूग, पटोलक, गहूं वगैरे स्वीकार्य (घ्यावयास योग्य ) वस्तु (५) तसेंच प्राणायामाचे प्रारंभीं श्रीगुरु, सरस्वती, विघ्नेश्वर, विशाखा वगैरे देवतांचें पूजाविधान यांचा विचार करावा. (६) सर्व मनुष्यांचें शरीर आपापल्या अंगुलीच्या प्रमाणानें शाहाण्णव अंगुल प्रमाण असतें. (७) त्यांत गुदस्थानापासून दोन अंगुल प्रमाणाच्यावर व गुह्येंद्रियापासून दोन अंगुलांच्या खालीं मध्यभागीं एक अंगुल प्रमाण जें स्थान तो देहाचा मध्यभाग होय. (८) यालाच मूलाधार किंवा शिखिस्थान असें नांव आलेलें आहे (९) तें स्थान त्रिकोणाकार असून तापलेल्या सोन्याच्या कांतीप्रमाणें सतेज असतें. (१०) त्यापासून नवांगुल उंचीवर चार अंगुल विस्ताराचें कोंबड्याच्या अंड्याप्रमाणें एक नाडीचें मूलस्थान ( नाडीकंद ) आहे, त्याच्या मध्यभागाला नाभि असें ह्मणतात. (११) त्या नाडीकंदापासून दोन अंगुलांखालीं कुण्डलीस्थान आहे. (१२) त्या ठिकाणीं कुण्डलीसर्प असून तो अष्टप्रकृतीरूपानें सात तऱ्हेनें कुटिलाकृति होऊन (१३) नाडीकन्दाच्या मध्यभागीं असलेल्या सुषुम्नानाडीचें द्वार आपल्या

नि ॥ निद्रित होऊनि असे ॥ १३ ॥ तया नाडीकंदापासून द्वादशक ॥ अंगुळें उन्नतपूर्वक ॥ रंध्रनाळसहित पत्राष्टकानें चतुष्क ॥ अंगुळें वि-स्तीर्ण ॥१४॥ कदलीपुष्पादिक ॥ तैसे होऊनि अधोमुख ॥ पूर्व हृद-यकमलस्थान ॥ असे त्याचे ठायीं ॥१५॥ जीवहंस तो आपण ॥ कर्म-पाशें करून ॥ बहुबद्ध होऊन ॥ तेथें वसे ॥१६॥ वालाग्र शतभागांत॥ एकभाग असोन अति ॥ सूक्ष्माकृतिचित्ताधीनगति ॥ होऊन फिरत असे ॥१७॥ तया नाडीकंदापासूनि ॥ जाळी सूत्रा ऐसें अंकुरोनि ॥ अ-धोर्ध्व वामदक्षिण पसरोनि ॥ सविस्तारें ॥ १८ ॥ मनप्राणादि करून ॥ दशविधपवन ॥ संचारालागून ॥ मार्ग ह्मणवी ॥ १९ ॥ बाहत्तरसहस्र अशेख ॥ नाडीस्तोमांत मुख्य ॥ ह्मणविती चतुर्दशक ॥ नाडी तयांचे ठायीं ॥२०॥ ईश्वर अधिदेवतायुक्त ॥ सुषुम्ना मस्तकान्त॥ पर्यंतपूरित॥ होऊनि असे ॥२१॥ विष्णु अधिदेवतायुक्त ॥ ईडा वामनासापुटान्त ॥ पर्यंतपूरित ॥ होऊनि असे ॥२२॥ ब्रह्माधिदेवतासहित ॥ पिंगळानाडी समस्त ॥ दक्षिण नासापुटान्त ॥ पर्यंतपूरित असे ॥ २३ ॥ इंद्रादिदेव-तायुक्त ॥ गांधारी वाम नेत्रान्त ॥ पर्यंत परिपूरित ॥ होऊन असे॥२४॥ दिगधिदेवतायुक्त ॥ पूषा दक्षिणनेत्रान्त ॥ पर्यंत पूरित ॥ होऊनि

---

मुखानें झांकून दीर्घ विस्मरण पावून स्वस्थ निजलेला असतो. (१४--१५) नंतर नाडीकन्दापासून बारा अंगुल लांबीच्या रंध्रयुक्त नाळासहित व चार अंगुलें वि-स्तीर्ण अशा आठ पत्रकांसह केळफुलाप्रमाणें खालीं तोंड केलेलें हृदयकमल आहे त्यांत (१६) जीवहंस हा कर्मपाशबद्ध होऊन असतो. (१७) त्याचा आकार केंसाच्या शतांश भागाएवढा आहे, त्या ठिकाणीं तो सूक्ष्म मनाच्या प्रवृत्तीप्रमाणें काल हरण करीत असतो. (१८--१९) नंतर त्या नाडीकन्दाच्या बाहेर जाळ्याच्या सूत्राप्रमाणें वर खालीं व बाजूला ( सर्वत्र ) व्यापून मनःप्राणादि दशवायूंचा मार्ग होऊन (२०) राहिलेल्या बाहत्तर हजार नाड्यांमध्यें मुख्य असलेल्या ज्या चतु-र्दश नाड्या त्यांमध्यें (२१) जिचें अधिदैवत ईश्वर आहे अशी सुषुम्ना नाडी म-स्तकापर्यंत गेलेली आहे. (२२) विष्णु जिचें अधिदैवत आहे अशी ईडा नाडी डाव्या नाकपुडीपर्यंत आली आहे. (२३) ब्रह्म जिचें अधिदैवत आहे अशी पिं-गळा नाडी उजव्या नाकपुडीपर्यंत आहे. (२४) इंद्र जिचें अधिदैवत आहे अशी गांधार नाडी डाव्या नेत्रापर्यंत आहे. (२५) दिक् जिचें अधिदैवत आहे अशी

असे ॥ २५ ॥ चंद्र अधिदेवतायुक्त शंकिनी ॥ असे वामकर्णान्त पुरी- ति ॥ प्रजापति अधिदेवतायुक्त पयस्विनी ॥ दक्षिणकर्णांतपूरित असे ॥२६॥ विराटाधि देवतायुक्त ॥ सरस्वति असे जिव्हांतपर्यंत ॥ पावकाधिदेवतायुक्त ॥ विश्वोद्धति जठरान्त होऊनि असे ॥२७॥ भूम्याधिदेवतायुक्त ॥ कुहूगुह्यान्त ॥ पर्यंत पूरित ॥ होऊनि असे ॥ २८ ॥ वरुणाधिदेवतायुक्त ॥ अलंबुषा पाय्वंत ॥ पर्यंत पूरित ॥ होऊनि असे ॥ २९ ॥ सूर्याधिदेवतायुक्त ॥ पयस्विनी दक्षिण पादांगुष्ठान्त ॥ पर्यंत पूरित ॥ होऊनि असे ॥३०॥ वरुणाधिदेवतायुक्त ॥ हस्तिजिव्हावामपादांगुष्ठान्त ॥ पर्यंत पूरित ॥ होऊनि असे ॥३१॥ वायु अधिदेवतायुक्त ॥ वारुणी सर्वांगान्त ॥ गामिन्यत्वें पूरित ॥ होऊनि असे ॥३२॥ मूलाधारस्वाधिष्ठान ॥ मणिपूर आग्नेय ह्मणोन ॥ अनाहत विशुद्ध ह्मणोन ॥ सहस्रार संमित ॥३३॥ पिंडांडस्थानीं ॥ जैसें ब्रह्मांडस्थान ॥ सर्वलक्षण ॥ तुल्य सृष्टि आहे ॥ ३४ ॥ तयाकारण ॥ महदाकाशस्थित सर्व जाण ॥ दहराकाशस्थानीं असोन ॥ गुरूपदेशें ॥३५॥ आणिक अनुष्ठान ॥ अभ्याससाधन ॥ क्रमानें जाण ॥ विवेकुनी ॥३६॥

---

पूषा नाडी उजव्या नेत्रापर्यंत आहे (२६) चंद्र जिचें अधिदैवत आहे अशी शंकिनी नाडी डाव्या कानापर्यंत असते. प्रजापति हा जिचें अधिदैवत आहे अशी पयस्विनी नाडी उजव्या कानापर्यंत आहे. (२७) जिचें अधिदैवत विराट् आहे अशी सरस्वती नाडी जिभेपर्यंत आली आहे. अग्नि जिचें अधिधैवत आहे अशी विश्वोद्धति नाडी उदरापर्यंत असते. (२८) जिचें अधिदैवत भू आहे अशी कुहूनाडी शिश्नापर्यंत गेलेली असते. (२९) वरुण जिचें अधिधैवत आहे अशी अलंबुषानाडी पायूपर्यंत गेलेली असते. (३०) सूर्य जिचें अधिदैवत आहे अशी पयस्विनी नाडी दक्षिण पायाच्या अंगठ्यापर्यंत गेली आहे. (३१) वरुण जिचें अधिदैवत आहे अशी हस्तिजिव्हा नाडी डाव्या पायाच्या अंगठ्यापर्यंत असते. (३२) वायु जिचें अधिदैवत आहे, अशी वारुणी नाडी सर्वांगांत संचार करीत असते. (३३) मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, आग्नेय, अनाहत, विशुद्ध, सहस्रार या नाड्यांनीं युक्त (३४) या पिंडांडामध्यें ब्रह्मांडाप्रमाणें सर्व लक्षणें समान रीतीनें सृष्ट झालेलीं असतात. (३५--३६) या कारणास्तव महदाकाशमध्यगत सर्व विषय दहराकाशांत असतात. या सर्वांचा विचार गुरूपदेशानुष्ठानाच्या अभ्याससाधनक्रमानें करावा.

## योगतंत्रसंग्रह.

आणिक नाडीचक्रपूर्वक ॥ शोधन क्रमादिक ॥ रेचकपूरक ॥ कुंभकविधि ॥ १ ॥ आपुल्या दक्षिणकरानें ॥ जानुप्रदक्षिणाकारविधानें ॥ एक चटक करणें ॥ तें मात्रा ह्मणवी ॥ ॥ २ ॥ तयालागीं षोडशमात्रा नेमेंकरून ॥ तनुलघुदीपन ॥ जठराग्निवर्धन ॥ तें नाडीशुद्धिचिन्ह ॥३॥ सूर्यभेदन उज्जाय शीत्कारी ॥ शीतल भस्त्रिका भ्रमरि ॥ मूर्छा केवळ ह्मणिजे परि ॥ कुंभक अष्टप्रकार ॥४॥ मूलबंध ॥ उड्याणबंध ॥ जालंधरबंध ॥ ह्मणिजे बंधत्रय ॥ ५ ॥ तयांत प्राकृत ह्मणोनि ॥ विकृत ह्मणोनि ॥ ह्मणिजे दोन्ही ॥ भेद होऊनि असे ॥ ६ ॥ रेचक पूरक कुंभक ॥ उत्कर्ष अपकर्षक ॥ शून्य उत्क्रांति ह्मणिजे सप्तक ॥ प्राणायामलक्षण ॥ ७ ॥ स्वेद कंपन देहोत्थान ॥ ह्मणिजे अनुक्रमें भिन्न ॥ कनिष्ठ मध्यमोत्तम प्राणा:॥ यामसिद्धि सूचना ॥८॥ पश्चिमद्वारगमन ॥ ब्रह्मादि ग्रंथिभेदन ॥ शिरोमध्यगत चंद्रामृतपान ॥ सेवनादिक्रम ॥ ९ ॥ तत्तल्लक्षणादिक ॥ अनुष्ठानयोग्यक ॥ होईल तैसें सविस्तारक ॥ विवेकावें ॥ १० ॥

---

## योगतंत्रसंग्रह.

(१–२) नंतर नाडीशोधनक्रम, रेचकपूरककुम्भकक्रम, आपल्या गुडघ्याभोंवतीं हात फिरवून एक चुटकी वाजविण्यास लागणाऱ्या कालास एक मात्रा (३) असें ह्मणतात अशा तऱ्हेच्या षोडश मात्रांचे नियम, तनुलाघव, दीपन, जठराग्निवर्धन; नाडीशुद्धिचिन्हें,(४) हे,आणि सूर्यभेदन, उज्याय, सीत्कारी, शीतळ, भस्त्रिका, भ्रमरी, मूर्छा, केवल, असे अष्टविध कुंभक प्रकार; (५) व मूलबंध, उड्याणबंध,जालंधरबन्ध हे बंधत्रय;(६)आणि प्राकृत व वैकृत या रीतीनें दोन प्रकारचे असलेले (७) बंध; रेचक, पूरक, कुंभक, उत्कर्ष, अपकर्ष, शून्य, उत्क्रांति अशीं हीं सप्तप्राणायाम लक्षणें. (८) व स्वेद, कंपन, देहोत्थापन ह्या क्रमानें कनिष्ठ मध्यमोत्तम अशा प्राणायामाच्या सिद्धिसूचना; ( ९ ) व पश्चिमद्वारगमन, ब्रह्मादि ग्रंथिभेदन, शिरोमध्यगत चंद्रामृतसेवन वगैरे क्रम; (१०) या सर्वांचा विचार त्या त्या लक्षणांच्या प्रकारानें अनुष्ठानास योग्य होईल. त्याप्रमाणें सविस्तर रीतीनें करावा.

## सर्वयोगांगफलादिसंग्रह.

आणिक समस्त प्राणायामांत ॥ पापक्षयरूपशांति ॥ अज्ञाननिवृत्ति ॥ रूपप्रशांति ॥१॥ ज्ञानप्रकाशरूप दीप्ति ॥ बुद्धिनिर्मलरूप प्रसाद ह्मणिजे इति ॥ चतुर्विध परिप्राप्ति ॥ सिद्धि होय ॥२॥ आणिक बाह्यकर्म परित्यागें चित्त ॥ अंतर्मुख करणें अखंडित ॥ तो प्रत्याहार लक्षणयुक्त ॥ परि तो अनेक भेद ॥३॥ परशिव ह्मणिजे चिद्घन ॥ शुभाश्रयाचे ठायीं चित्तस्थापन ॥ तें लक्षणवंत धारण ॥ परि वायुधारण भूधारणादि बहुविध ॥४॥ वरि विषयांतरासि नातळतां ॥ अंतरीं शिवचिंता ॥ प्रवाहरूप अखंडता ॥ तें सुध्यान परि नानाविध ॥५॥ ध्येय वस्तुचिये ॥ ठायीं मन निश्चलात्मक होय ॥ ते समाधिनिश्चय ॥ जाणिजे ॥६॥ परि तो ज्ञाताज्ञातादि ॥ भेद अणिमादि ॥ अष्टसिद्धि ॥ भेदप्रदायक ॥७॥ तत्तल्लक्षणपूर्वक ॥ अनुष्ठानफलयोग्यक ॥ होईल तैसें आवश्यक ॥ विवरण करावें ॥८॥

## योगविघ्नादिक.

आणिक आलस्य व्याधिप्रमादता ॥ स्थानसंशय अनवस्थिती अश्रद्धा ॥ भ्रांति दर्शन दुःखदौर्मनस्य विषयलुब्धता ॥ ह्मणिजे दशवि-

---

## सर्व योगांगफलादिसंग्रह.

(१–२) प्राणायामानें पापक्षयरूप शांति व अज्ञानानिवृत्तिरूप प्रशांति व ज्ञानप्रकाशरूप दीप्ति आणि बुद्धिनिर्मलरूप प्रसाद अशा चतुर्विध सिद्धींची प्राप्ति होते. (३) बाह्यकर्म त्याग करून मन अंतर्मुख करावें हें प्रत्याहाराचें लक्षण आहे. त्याचे अनेक भेद आहेत, (४) परशिवरूप शुभाश्रयाचे ठिकाणीं चित्ताची स्थापना करावी हें धारणेचें लक्षण आहे त्या धारणेमध्यें वायुधारणा, भूधारणा असे अनेक भेद आहेत ते सर्व जाणावेत. (५) आणि विषयांतराकडे न जातां केवळ शिवाकडेच प्रवाहरूपानें अखंड चित्त वाहत राहणें, हें ध्यानाचें लक्षण आहे, तें नानाप्रकारचें आहे. (६) ध्येयवस्तूचे ठिकाणीं मन निश्चल राहणें हें समाधीचें लक्षण आहे. (७) त्या समाधीचे ज्ञाताज्ञातादि अनेक भेद व अणिमादि अष्टसिद्धिभेद आहेत, ते सर्व जाणावेत. (८) सारांश त्या त्या लक्षणांची परीक्षा करून अनुष्ठान करावें ह्मणजे तें अनुष्ठान फलयोग्य होतें.

## योगविघ्नादिक.

(१) नंतर आलस्य, व्याधि, प्रमाद, स्थानसंशय, अनवस्थिति, अश्रद्धा,

ध योगविघ्न ॥१॥ लय विक्षेप कषाय ॥ ह्मणिजे चित्तदोषत्रय ॥ ते ते विघ्नदोषमय ॥ उपशांतिप्रकार ॥ २ ॥ आणि यमादि अष्टक ॥ अंगांत मुख्य ॥ प्रथम यमादि चतुष्क ॥ ते बाह्य ह्मणवी ॥३॥ उरले प्रत्याहार ॥ आदि चतुष्कप्रकार ॥ ते ह्मणवी अंतर ॥ त्याचे ठायीं ॥४॥

## योगफलादि.

अहिंसादि ते ॥ अवांतरांग होऊनि निरुतें ॥ यमासि सत्यार्थें ॥ वैराग्यादिक "निर्वैरः समदर्शना" दि फलें ॥१॥ तपःस्वाध्यायादिक ॥ अवांतरांगयुक्त नियमासि प्रत्यक्ष ॥ अभिमत देवतालोक ॥ संदर्शनादि फलें ॥२॥ स्वस्तिकादि भेद ॥ युक्त आसनासि साध्य ॥ देह आरोग्यभेद ॥ अनालस्यादिफल ॥ ३ ॥ रेचकादि सप्त ॥ भेदयुक्त प्राणायामासि अनुचित ॥ सकल दोष परि समस्त ॥ निवृत्यादि फलें ॥४॥ सकळ इंद्रियांसि ॥ अंतरंगीं जो आकर्षी ॥ तयाप्रत्याहारासि ॥ जाणावें निश्चयेसी ॥५॥ वैराग्य लक्षण ॥ वन्हि ऐसेंनि तप्तपणें ॥ तद्विषयवर्गवन ॥ दहन करी निर्विषय लोलुपता हेंचि फल ॥६॥ परशिवस्वरूप ॥ शुभाश्रयाचे ठायीं चित्तबंधनरूप ॥ धारणेसि पाप ॥ क्षया-

---

भ्रांतिदर्शन, दुःख, दौर्मनस्य, विषयलोलुपता अशीं योगाला दहा विघ्नें आहेत. (२) लय, विक्षेप, कषाय, असे तीन दोष मनाचे आहेत. हें सर्व जाणून त्या त्या विघ्नदोषाला जी शांति असेल ती करावी. (३) आणि यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि, ह्या अष्टांग योगांगामध्यें यमादि चार बाह्य योग होत. (४) बाकी प्रत्याहारादि चार योग अंतरंग होत. वगैरे विषयप्रतिपादन करून पुढें सांगतात.

## योगफल वगैरे.

(१) अहिंसादि अवांतर अंगें असलेल्या यमयोगाला निर्वैर आणि समदृष्टि वगैरे फलें आहेत. (२) तपःस्वाध्यायादि अवांतर अंगें असलेल्या नियम योगाला अभिमत देवतादर्शन वगैरे फलें आहेत. (३) स्वस्तिकादि भेद असलेल्या आसनाला देहारोग्य, अनालस्य वगैरे फलें आहेत. (४) रेचकादि सात भेद असलेल्या प्राणायामाला सर्व दोषनिवृत्ति वगैरे फलें होत. (५) इंद्रियें सर्व अंतरंगांत आकर्षण करणाऱ्या प्रत्याहाराला(५)वैराग्यरूप अग्नीनें विषयरूप मनाला जाळून निर्विषयलोलुपता उत्पन्न होणें हेंच फल होय. ( ७ ) परशिवस्वरूप शुभाश्रयाचें

दि सकळ हेंचि फल ॥ ७ ॥ सगुण निर्गुण ॥ ध्यानासि आन ॥ अनीश्वरत्व अभिमान ॥ निवृत्यादि हेंचि फल ॥ ८ ॥ ज्ञातादि समाधिसी मुख्य ॥ प्रज्ञाप्रतिष्ठादिक इति अशेख ॥ फळ ह्मणवी ॥९॥ तत्त्वयोगप्रतिबध्यक ॥ प्रतिबंधक उत्तेजक ॥ अवांतरफल तत्साध्यादिसर्वक ॥ प्रतिपादून ॥ १० ॥

## योग्यांचें तारतम्य.

आणि तया अष्टांगयोगांत ॥ यमादि अष्टांगांत ॥ योगाभ्यासी पूर्वांगसिद्धिरहित ॥ तो कनिष्ठ ह्मणवी ॥१ ॥ आसनादि षट्क ॥ अंग योगाभ्यासी तो मध्यमादिक ॥ प्रत्याहारादि चतुष्क ॥ अंगाभ्यासी तो उत्तम ॥ २ ॥ ध्यानाद्यंगद्वयाभ्यासी उत्तमोत्तम ह्मणती त्यासी ॥ इति अधिकारी स्थितीसी ॥ भेद ह्मणवी ॥३॥

## निर्गुणयमादियोगलक्षण.

यानंतर देहादिक धर्म ॥ सकळ इंद्रियस्तोम ॥ उभयावरि वैराग्य ते यम ॥ ह्मणवी निरुतें ॥१॥ परमात्मा सकळ भरित ॥ ह्मणोनि सततोदित ॥ जाणीव आपणांत ॥ ती अभिरतिनियम ह्मणवी ॥ २ ॥ सर्व वस्तूंचे ठायीं उदासीन ॥ स्थिरस्थिति तेंचि ह्मणवी आसन ॥ विष-

---

ठिकाणीं चित्त बंधन करणाऱ्या धारणेला पापक्षय वगैरे फलें आहेत. (८) सगुण निर्गुण ध्यानास अनीश्वरता, अभिमान, निवृत्ति, वगैरे फलें आहेत. (९) ज्ञातादिरूप समाधीला प्रज्ञाप्रतिष्ठादिक वगैरे फलें होत. (१०) तद्योग प्रतिबध्य, प्रतिबंधक, उत्तेजक अवांतर फलें तत्साद्य उपाय वगैरे विषय प्रतिपादिले.

### योग्यांचें तारतम्य.

(१) आणि त्या अष्टांगयोगसंबंधीं यमादि अष्टांगांमध्येंही व्यवसाय करीत असतां पूर्वांगसिद्धि न पावणारा योगी तो कनिष्ठ होय. (२) आसनादि षडंगयोगी मध्यम होत. प्रत्याहारादि चतुरंगाभ्यास करणारे योगी उत्तम होत. (३) ध्यानाद्यंगद्वयाभ्यासी योगी उत्तमोत्तम होत. याप्रमाणें अधिकारितारतम्य जाणावें.

### निर्गुणयमादि योगक्षलण.

(१) देहेंद्रियांचे ठिकाणीं वैराग्य उत्पन्न होणें हें यमाचें लक्षण जाणावें (२) सकल व्यापक परमात्म्याचे ठिकाणीं सतत अभिरति उत्पन्न होणें हें नियमाचें लक्षण आहे. (३) सर्व विषयांच्या ठिकाणीं औदासिन्य उत्पन्न होऊन स्थिरस्थिति होऊन राहणें हें आसनाचें लक्षण जाणावें. विषयच ज्यांस प्रयोजन आहे अशा

यार्थी इंद्रियनिरोधन ॥ तो प्राणायाम ह्मणवी ॥३॥ विषयपदार्थांतें ॥ विमुखत्वें तें ॥ अंतराभिमुख होणें निरुतें ॥ तो प्रत्याहार ॥४॥ स्वात्मनैष्ठत्वनिपुण ॥ तें ह्मणवीं धारण ॥ ब्रह्म मी इति निश्चयें ऐक्यानुसंधान॥ तें ध्यान ह्मणवी ॥५॥ जाणीव नेणीवरहित ॥ शुद्ध जाणीव अखंडित ॥ संविन्मात्र फलावभास ॥ तो समाधि ह्मणवी ॥ ६ ॥ इति निर्गुण ॥ अष्टांगयोग लक्षण ॥ प्रतिपादन ॥ जाणावें पूर्वक ॥७॥

## षट्चक्रविषयविवेक.

आणिक ॥ त्या योगलक्ष्यानुसंधानोपयुक्त मूलाधार ॥ स्वाधिष्ठान मणिपूर ॥ अनाहत विशुद्ध अग्निचक्र ॥ ह्मणिजे षट्चक्रें ॥१॥ तयाशीं परिक्रमें देहमध्य॥ लिंग नाभि हृदय॥ कंठ तालुमध्य भ्रूमध्य॥ ललाट ह्मणिजे षट् स्थानें॥२॥चतुरस्र अर्धचंद्र॥त्रिकोण षट्कोणाकार॥वर्तुळ विचित्र ॥ इति षडाकार ॥३॥ पृथ्वी जीवन ॥ अग्नि पवन ॥ आकाश मन ॥ ह्मणिजे षड् भूतें ॥ ४ ॥ पीत श्वेत रक्तादिक ॥ नील स्फटिक ॥ माणिक्य ह्मणिजे षट्क ॥ वर्णादिक ॥ ५ ॥ चतुर्दळ षड्दळ ॥ दशदळ द्वादशदळ ॥ षोडशदळ द्विदळ ॥ ह्मणिजे षट्कमळें ॥ ६ ॥ वादि

---

इंद्रियांचा निर्बंध करणें हें प्राणायामाचें लक्षण आहे. (४) बाह्य विषयांविषयीं मन विमुख होऊन अंतरंगांत सन्मुख होऊन राहणें हें प्रत्याहाराचें लक्षण आहे. (५) स्वात्म्याचे ठिकाणीं निष्ठा असणें हें धारणेचें लक्षण जाणावें. मीच ब्रह्म आहे असें ऐक्यानुसंधान करणें हें ध्यानाचें लक्षण जाणावें. (६--७) जाग्रति व विस्मरण नसून संविन्मात्रावभास होणें हें समाधीचें लक्षण जाणावें. याप्रमाणें निर्गुणाष्टांगयोगलक्षणें जाणावीत.

## षट्चक्रविषयविवेक.

(१--२) आणि त्या योगलक्ष्यानुसंधानाला उपयुक्त होऊन राहिलेल्या मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध, आग्नेय या षट्चक्रांस क्रमानें देहमध्य, लिंग, नाभि, हृदय, कंठतालुमध्य, भ्रूमध्य, ललाट हीं सहा स्थानें होत. (३) चतुरस्र, अर्धचंद्र, त्रिकोण, षट्कोण, वृत्त, चित्र असें त्यांचे सहा आकार होत, (४) पृथिवी, उदक अग्नि, वायु, आकाश, मन हीं सहा भूतें होत. (५) पीत, श्वेत, रक्त नील, स्फटिक, माणिक्य असे त्याचे सहा वर्ण होत. (६) चतुर्दळ, षट्दळ, दशदळ, द्वादशदळ, षोडशदळ, द्विदळ अशा आकारचीं सहा कमळें आहेत. (७) वकारापासून सकारापर्यंत, बकारापासून लकारापर्यंत, डकारापासून

सांत वादि लान्त ॥ डादि फान्त कादि ठान्त ॥ अकारादि स्वरान्त हं क्षं समस्त ॥ षट्ट चक्रदळाक्षरें ॥७॥ नकारादि प्रणवान्त ॥ षट्ट कर्णिकाक्षरें शोभित ॥ ब्रह्मादि जीवांत ॥ षडधिदेवता ॥ ८ ॥ वरि ब्रह्मचक्र ॥ शिखाचक्र ॥ पश्चिमचक्र ॥ ह्मणिजे चक्रत्रय ॥९॥ तयांसि पृथक ॥ अनुक्रमें मस्तक ॥ शिखा शिखांत ह्मणिजे स्थानें क ॥ त्रिविध जाणावीं ॥ १० ॥ सहस्रदळ ॥ त्रिदळ ॥ एकदळ ॥ ह्मणिजे पद्मत्रय ॥११॥ ज्योतिवर्ण ॥ महज्ज्योतिवर्ण ॥ अप्रदर्शवर्ण ॥ ह्मणिजे वर्णत्रय ॥ १२ ॥ अक्षरात्मक नाद ॥ अनाक्षरात्मक नाद ॥ निःशब्द नाद ॥ ह्मणिजे अव्यक्त इति नादत्रय ॥१३॥ अंतरात्मा ॥ परमात्मा ॥ परब्रह्मा ॥ ह्मणिजे आदिदेवता त्रय ॥१४॥ क्रमें तत्तद्विप्रतिपत्तिमतभेदांस ॥ अवकाश नसोनि तयास ॥ अनुभवसिद्धांतास ॥ प्रतिपादिलें ॥१५॥

## योगविद्यापरिशेष.

आणिक सोममंडल ॥ सूर्यमंडल अग्निमंडल ॥ इति तीन मंडलें ॥ १ ॥ स्थानव्यावृत्ति कांतिमय ॥ इति बाह्यमध्य लक्षादिक ॥ गुणविरहित आंतरलक्ष्यत्रय ॥ आकाश पंचक ॥२॥ पूर्व मध्योत्तर ॥ ह्म-

---

फकारापर्यंत, ककारापासून ठकारापर्यंत, अकारादि षोडश स्वर, हं क्षं या सहित हीं सर्व अक्षरें त्या त्या कमलांत आहेत. (८) नकारापासून प्रणवापर्यंत सहा कर्णिकाक्षरें आहेत. ब्रह्मदेवापासून जीवापर्यंत त्यांच्या सहा आधाराधिदेवता आहेत. (९) नंतर ब्रह्मचक्र, शिखाचक्र, पश्चिमचक्र अशीं तीन चक्रें आहेत (१०) या चक्रांस मस्तक, शिखा, शिखांत अशीं तीन स्थानें जाणावींत. (११) सहस्रदळ, त्रिदळ, एकदळ, अशीं तीन कमलें जाणावींत. (१२) ज्योतिवर्ण, महाज्योतिवर्ण, अप्रदर्शवर्ण असे तीन वर्ण आहेत. (१३) अक्षरात्मक, अनक्षरात्मक, निःशब्द ( अव्यक्त ) असे तीन नाद जाणावेत. (१४) अंतरात्मा, परमात्मा, परब्रह्म, अशा तीन अधिदेवता होत. (१५) याप्रमाणें क्रमानें त्या त्या विप्रतिपत्ति ( विरुद्ध ) मतभेदास अवकाश न देतां अनुभवसिद्धांत प्रतिपादिला आहे.

### योगविद्यापरिशेष.

(१-२) नंतर सोमसूर्याग्निमण्डलत्रय, स्थान, कांति, व्यावृत्ति, प्रयोजन यांचे प्रकार. नंतर बाह्यलक्ष्य, मध्यलक्ष्य, अंतर्लक्ष्य ही लक्ष्यत्रयी. नंतर गुणरहित आकाशपंचक (३) नंतर पूर्व, मध्य, उत्तर हें तारकत्रय, षण्मुखी, खेचरी, शांभवी

णिजे तारक त्रिप्रकार ॥ षण्मुखी खेचरी शांभव्यादि वर ॥ मुद्राभेद ॥३॥ आणिक उन्मनी ॥ मनोन्मनी ॥ सहजा ह्मणिजे तीन्ही ॥ स्थानत्रय ॥ ४ ॥ विक्षेपगतागत ॥ संक्लिष्ट स्वलीनता ॥ ह्मणिजे चतुर्थता ॥ मनोवृत्ति॥५॥ बालोन्मत्त पिशाचादिक॥ लक्षणयुक्त योगेश्वरासि विशेख ॥ वायूत्कर्षक ॥ चिन्हत्रय ॥ ६ ॥ इत्यादि समस्त ॥ योग वृत्तांत ॥ आगमशास्त्र योगपादांत ॥ प्रतिपाद्य जाणावा ॥७॥

## ज्ञानपाद प्रारंभः

नंतर प्राण्यांमध्यें सर्वोत्तम जाण ॥ तो शिवसिद्धांती असोन॥ शिवज्ञानानें कृतकृत्य होवोन ॥ शिवसमानतारूप ॥ १ ॥ मुक्ति पावत असोन ॥ शैव सर्व जाण ॥ मुख्यत्वेंकरून ॥ शिवसिद्धांत ज्ञानस्वरूप जाणावया ॥२॥ आगमशास्त्र असोन ॥ तें ज्ञानपादांत जाण ॥ अबाधित विस्तरण ॥ विचारसंग्रह केला ॥ ३ ॥ तें कैसें ह्मणतिलें तरी ॥ ज्ञानपादांत ॥ पति पशु पाश ह्मणिजे त्रिपदार्थ ॥ प्रतिपादक होऊनि असे ॥ ४ ॥

## पतिपदार्थ.

त्याचे ठायीं ॥ अनादि निर्मल चिद्धन स्थिर ॥ एकत्वें सृष्टि स्थिति

---

वगैरे मुद्रा भेदाभेद (४) उन्मनी, मनोन्मनी सहजा हीं तीन स्थानें (५) विक्षेप, गतागत, संक्लिष्ट, स्वलीन या चार मनोवृत्ति (६) बाल, उन्मत्त, पिशाच वगैरे योगीश्वर चिन्हत्रय (७) सपादलक्ष भेदांतभेदसहित योगाचे सर्व विषय शिवसिद्धांत आगमशास्त्रांमध्यें सविस्तर प्रतिपादिले आहेत.

याप्रमाणें योगपाद समाप्त झाला.

## ज्ञानपाद प्रारंभ.

(१) सर्व प्राण्यांमध्यें सर्वोत्तम ह्मणजे शिवसिद्धांती होय, कारण तो शिवज्ञानानेंच कृतकृत्य होऊन शिवसमानतारूप (२) मुक्ति पावतो. सर्व शैवांनीं मुख्यत्वेंकरून शिवसिद्धांतज्ञानस्वरूप जाणावयास (३) आगम शास्त्राच्या ज्ञानपादामध्यें अबाधितविस्ताराचा विचारसंग्रह करावा (४) तो कसा ह्मटला तर सांगतात कीं, पति, पशु, पाश हे तीन पदार्थच सिद्धांतशास्त्रामध्यें प्रतिपाद्य होत. त्यांमध्यें—

## पतिपदार्थ.

(१) अनादि, निर्मल, चिद्घन परमेश्वर हा एकरूप होऊन सृष्टि, स्थिति, सं-

संहार ॥ तिरोभाव अनुग्रह ॥ ह्मणिजे इति ॥१॥ पंचकृत्य स्वाधीन ॥ कर्तृत्व तें आपल्यास ॥ असाधारण धर्म जयास ॥ होऊनि असे स्वानुमतें ॥२॥ चैतन्यचि सदाशिव ॥ पशुपति परब्रह्मरूप ॥ तो पति पदार्थ ॥ ह्मणवी निरुता ॥ ३ ॥

## सृष्टिस्वरूप.

नंतर सृष्ट्यादि पंचकृत्य ॥ तयाचे ठायीं प्रथम ॥ सृष्टि ही बिंद्वधिकार ॥ अवस्थात्मक ॥१॥ उपाधि विशिष्टत्वानें ॥ ईश संज्ञायुक्त असोन ॥ तो परशिव जाण ॥ संनिधानकर्तृत्व प्रयुक्त ॥ २ ॥ सकल कार्योत्पादक व्यापार ॥ विशेष तो अवसर ॥ होवोनि असे निरंतर ॥ इति जाणिजे निश्चयें ॥ ३ ॥

## कर्तृत्वविवेक.

आणिक तें कर्तृत्व जाण ॥ कार्योपादान ॥ गोचरापरोक्षज्ञान ॥ चिकीर्षाकृतिरूप ॥१॥ ऐसें सामान्यपणेंवरि ॥ हें जाणितलें जरी ॥ ईशशक्तीचे ठायीं विशेषपरी ॥ असोनि तरी ॥२॥ करणकर्तृत्व । संकल्पकर्तृत्व ॥ संनिधानकर्तृत्व ॥ ह्मणिजे कर्तृत्वत्रय तयातें ॥३॥ करणकर्तृत्वादिक ॥ तें ईश्वरदत्त स्वातंत्र्ययुक्त ॥ कुलाला ऐसे पूर्वक ॥ घटादि कर्तृत्व ॥४॥

---

हार, तिरोभाव, अनुग्रह अशीं (२) पांच कृत्यें करीत असतो. आणि तो परमेश्वर स्वाधीन कर्ता आहे. स्वाधीनकर्तृत्व हा त्याचा सर्व असाधारण धर्म आहे. असें हें (३) सदाशिवचैतन्य पशुपति परब्रह्मवस्तु तोच पतिपदार्थ होय.

### सृष्टिस्वरूप.

(१--२) त्या सृष्ट्यादि पंचकृत्यांमध्यें पहिला विषय सृष्टि होय. बिंद्वधिकारावस्थारूप उपाधीनें विशिष्ट असल्या कारणानें ईश हें नांव परशिवाला आलें आहे. तर तो सृष्टिरूप पहिला विषय परमेश्वराला सन्निधानकर्तृत्वप्रयुक्त ( ३ ) सकलकार्योत्पादकव्यापारविशेष होऊन बसला आहे.

### कर्तृत्वविवेक.

(१) तें कर्तृत्व कार्योपादान गोचरापरोक्षज्ञान चिकीर्षाकृतिरूप आहे. (२) असें सामान्यपणें समजलें तरी तें ईशशक्तीमध्यें विशेष रीतीनें राहून (३) करणकर्तृत्व, संकल्पकर्तृत्व, सन्निधानकर्तृत्व असें तीन प्रकारचें झालें आहे. (४) तें असें कीं, ईश्वरानें कुम्भार वगैरे मानव जातीला घटादि कर्तृत्वस्वातंत्र्य

घटोत्पादानयुक्त ॥ मृद्विषयरहित ॥ पृथुबुध्नोदरादि जात ॥ विकारात्मक ॥५॥ उपकरणमात्रक्षम असून ॥ तेणें तें करणकर्तृत्व ह्मणवून ॥ बद्धजीवसाधारण ॥ होऊनि असे ॥६॥ आणिक ईश्वरदत्त शक्तिक ॥ विश्वकर्मादिक ॥ तयांसि विद्याकर्माद्यतिशय साध्यक ॥ लोकांतरनिर्माणादिकर्तृत्व ॥ ७ ॥ संकल्परूपस्मरण विशेषानें ॥ सर्वज्ञत्वरहित कचिद्‍दशाचे ठायीं ॥ अज्ञत्वादि दोषोपहत असोन ॥ संकल्पकर्तृत्व ह्मणवोन ॥८॥ अधिकारिक जीवसाधारण ॥ असें होवोन ॥ नंतर कुमुद कमल ह्मणोन ॥ मधूच्छिष्ट मृत्तिका ॥९॥ तयांस क्रमानें ॥ संकोचविकास ह्मणोन ॥ द्रवशुष्करूप ह्मणोन ॥ विषयविकार ॥ १० ॥ स्वसंनिधानमात्रानें ॥ करणारा असोन ॥ निर्विकार सूर्य जाण ॥ तयाचे ठायीं ॥११॥ आणिक लोहस्पर्श न करोन ॥ आकर्षण करीत असोन ॥ अयस्कांतमणि जाण ॥ तयाचे ठायीं ॥१२॥ आणिक आपुले ठिकाणीं ॥ सर्व प्रतिफलित करोन ॥ राहत असें दर्पण ॥ तयाचे ठायीं ॥१३॥ संनिधानकर्तृत्व जैसें असोन ॥ तैसें सर्वज्ञ पशुपति जाण ॥ स्वसंनिधा-

---

दिलें आहे. (५) तें कर्तृत्व घटाला उपादान कारण झालेल्या मृत्तिकेच्या ठिकाणीं नसतें परंतु ती मृत्तिका पृथुबुध्नोदरादि विकारांला (६) केवल उपकरण होते. त्यामुळें तिला करणकर्तृत्व हें नांव मात्र येऊन सर्व कर्तृत्व बद्ध जीवाचे ठिकाणीं सर्व साधारणपणें असतें. (७) आणि अशा रीतीनें ईश्वरानें अशा तऱ्हेची शक्ति ज्यांना दिली आहे, त्या विश्वकर्म्यादिकांचे ठिकाणीं असलेलें लोकांतरनिर्माणादि कर्तृत्व विद्याकर्मादिकांच्या अतिशयानें साध्य होणारें असतें. (८) परंतु तें कर्तृत्व संकल्परूपस्मरणविशेषानें युक्त असल्यामुळें सर्वज्ञत्व त्या ठिकाणीं नसून कांहीं अंशांमध्यें अज्ञत्वादि दोष आढळून येत असल्यामुळें त्याला संकल्पकर्तृत्व हें नांव येतें ( ९ ) तें कर्तृत्व अधिकारी, जीवाचे ठिकाणीं साधारण असतें, नंतर कुमुद, कमल, मधूच्छिष्ट, मृत्तिका, (१०) यांत क्रमानें संकोच, विकास, द्रव, शुष्क असे विकार (११) निर्विकार सूर्य आपल्या संनिधानानें उत्पन्न करितो. (१२) तसेंच लोखंडाचा स्पर्शही न करितां आकर्षण करून घेणाऱ्या अयस्कांतमण्यांत ( लोहचुंबकांत ) तेंच कर्तृत्व आहे. (१३) तसेंच आपल्या ठिकाणीं कोणत्याही पदार्थाचा परिणाम करून घेणाऱ्या आरशामध्यें तें कर्तृत्व असतें. (१४) या कर्तृत्वाला संनिधानकर्तृत्व असें ह्मणतात. त्याप्रमाणें सर्वज्ञ पशुपति हा आपल्या सा-

त्रमात्रानें ॥ पंचकृत्य करीत असे ॥ १४ ॥ ऐसें संनिधानकर्तृत्व जाण ॥ पतिपदार्थांचे ठायीं असोन ॥ प्रकाशतें जाण ॥ निश्चयानें ॥१५॥

## स्थितिस्वरूप.

आत्मवर्गासि समस्त ॥ परमानंदोत्पत्तिनिमित्त ॥ भोगावस्थायुक्त ॥ करुनिया ॥१॥ विंदूपाधीनें सदाशिवनामादियुक्त ॥ परशिव पालन करतो सकळ जगत ॥ पालनात्मक विशेषकृत्य ॥ ते स्थिति ह्मणवी ॥२॥

## संहारस्वरूप.

आणिक संसारदुःख अत्यंत ॥ ह्मणोनि पशुविश्रांति निमित्त ॥ शिवाचे नियामकशक्तीनें समस्त ॥ सकल तत्त्वभुवनादि ॥१॥ कार्यवर्गालागूनि ॥ संकोच करूनि ॥ लयावस्था पावूनि ॥ बिंदूपाधीनें ॥२॥ ईशसंज्ञित ॥ झाला पतिपदार्थ ॥ निवृत्तिव्यापारविशेष अत्यंत ॥ तो प्रपंचसंहार ह्मणवी ॥३॥

## तिरोभावस्वरूप.

सर्वात्मवर्गांचें भोगसाधन ॥ झालें बिंदूपाधीकरून ॥ कर्मानुसारें तें तें तत्त्वभुवन ॥ तया ठायीं ॥१॥ तेथें असोनि भोग भोगवी त्या नि-

---

त्र्यानें पंचकृत्यें करतो. (१५) हें संनिधानकर्तृत्व पतिपदार्थांचे ठिकाणीं मात्र विशेषेंकरून दिसतें.

### स्थितिस्वरूप.

(१) नंतर जीववर्गाला परमानंदोत्पादक असल्यामुळें भोगावस्थेला पावलेल्या (२) बिंदूपाधीनें सदाशिव नांव पावून परशिव हा समस्त जगत्पालन करतो. त्या पालनकर्त्याला स्थिति असें ह्मणतात. याप्रमाणें स्थितिस्वरूप आहे.

### संहारस्वरूप.

(१) नंतर संसारानें दुःखी झालेल्या पशूंच्या विश्रांतीकरितां श्रीशिवाच्या नियामकशक्तीनें सकलतत्वभुवनादि (२) कार्यवर्ग संकुचित होऊन लयावस्था पावून बिंदूपाधीनें (३) ईश नांव पावलेला पतिपदार्थरूप श्रीशिव हा निवृत्तिव्यापार करतो त्या व्यापाराला प्रपंचसंहार असें ह्मणतात.

### तिरोभावस्वरूप.

(१) आणि सर्व आत्म्यांचें भोगसाधन असलेल्या बिंदूपाधीमुळें कर्मानुसार त्या त्या तत्वभुवनादिकांमध्यें (२) असलेल्या भोगाचा उपभोग आत्म्यांस मिळतो,

मित्त ॥ तें तें नामादियुक्त ॥ परशिवाचें विशेष कृत्य ॥ त्या त्या पशूचें भोगादृष्ट ॥ २ ॥ झालियावरि समाप्त ॥ नाहीं ह्मणोनि कार्यजात ॥ जें नाहीं दिसत ॥ तयासि तिरोभाव ह्मणती ॥३॥ हें संहारासमान ॥ असलें तरी कारण ॥ वैलक्षण्यविशेषानें ॥ निराळें सांगितलें ॥४॥

## अनुग्रहस्वरूप.

आणिक निःशेख ॥ नष्ट व्हावयासि मुख्य ॥ योग्य झाला मलपरिपाक ॥ अनुसारें ॥१॥ अत्यंत नाशादिक ॥ परिणामक ॥ अति विशेख ॥ तयासि उपयुक्त ॥२॥ आपुला कार्यवर्ग अशेख ॥ गर्भीकारासी झाला अभिमुख ॥ बिंदूपाधीनें पूर्वक ॥ प्राप्ति पावला ॥३॥ निरधिकरण ह्मणोनि ॥ साधिकरण ह्मणोनि ॥ शिवधर्मिणी लोकधर्मिणी ॥ नैष्ठिकी हौत्रकी ॥४॥ इत्यादि दीक्षाद्वारें विहित ॥ झाला ईशानसंज्ञित ॥ पतीचें स्वसमत्व ॥ संज्ञिक ॥५॥ विशुद्धात्मक ॥ अभिव्यक्तीसि कारक ॥ झाला अति प्रसादविशेख ॥ व्यापारविशेष तो अनुग्रह ह्मणवी ॥६॥

## पशुपदार्थ.

आणिक अनादि मलवेष्टित ॥ ज्ञानक्रिया शक्तियुक्त ॥ चैतन्य तें पशुपदार्थ ॥ ह्मणवीत असे ॥ १ ॥ तयाकारणें पिपीलिकादिविष्णवंत ॥

---

त्यामुळें तें तें नांव पावलेल्या परशिवाच्या कृत्यविशेषांस त्या त्या पशूंचें भोगादृष्ट (३) संपल्यानंतर कार्य नाहींसें होतें तें कार्य नाहींसें होणें याला तिरोभाव असें ह्मणतात. (४) हा तिरोभाव संहाराच्या बरोबरीचा असला तरी कारणवैलक्षण्यानें हा एक भाग निराळा झाला आहे.

## अनुग्रहस्वरूप.

(१) नंतर निःशेषपणें नष्ट व्हावयास कारण मलपरिपाकच होय. (२) त्या मलपरिपाकानुसार अत्यंत नाशपरिणामविशेषास उपयुक्त असलेल्या (३) व आपल्या कार्यवर्गाच्या गर्भीकारास अभिमुख असलेल्या बिंदूपाधीनें लभ्य अशा (४) निरधिकरण, साधिकरण, शिवधर्मिणी, लोकधर्मिणी, नैष्ठिकी, हौत्रिकी (५) वगैरे दीक्षाद्वारानें ईशानसंज्ञक पतीच्या स्वसाम्यसंज्ञिक (६) विशुद्धात्माभिव्यक्तीस कारण झालेला अतिप्रसादरूप व्यापारविशेषच अनुग्रह ह्मणवून घेत आहे.

## पशुपदार्थ.

(१) नंतर अनादिमलानें निर्बंध पावलेल्या ज्ञानक्रियाशक्तीनें युक्त चैतन्यच पशु असल्यामुळें (२–३) पिपीलिकेपासून (मुंगीपासून) विष्णुपर्यंत जीवकोटि सर्व

सकल जीवकोटिजात ॥ पतिपाशें बद्ध विहित ॥ पत्यतिरिक्तत्व ॥२॥ विशिष्टचैतन्य ॥ वर्ग सर्व ह्मणोन ॥ पशु ऐसें ह्मणोन ॥ जाणा निश्चयें ॥ ३ ॥

## पाशपदार्थ.

नंतर पत्यभिन्न उमासंज्ञित ॥ शिवशक्त्यधिष्ठित ॥ होवोन पशुज्ञानक्रियाशक्तीतें ॥ तिरस्कार ॥१॥ करूनि राहतें तें ज्ञान ॥ पाश पदार्थ ह्मणवोन ॥ घेत असें जाण ॥ शास्त्रनिर्धारें ॥२॥

## सिद्धांतमतविवेक.

नंतर निखिलनिगमनिगमांत ॥ आगमादि संमत ॥ भाष्यादिसंगृहीत ॥ सिद्धांतविवेक कैसें ह्मणतिलें तरी ॥१॥ ज्ञानक्रियाशक्तियुक्त ॥ चैतन्य एकचि असत ॥ चिदचिद्विशिष्टाद्वैत ॥ शिवतत्त्व ऐसें ॥ २ ॥ सामर्थ्यें निर्गुण ॥ निर्विशेष निष्क्रिय ह्मणोन ॥ सत्तामात्र निरंजन ॥ सुखमात्र चिन्मात्र ॥३॥ एतद्रूपशुद्धाद्वैतबोधक ॥ सकल श्रुत्यादिक ॥ विशेष्यानतिरिक्त ॥ विशेषण ॥ ४ ॥ अथवा विशेषणीभूत विशेष्य ह्मणोन ॥ स्वानतिरिक्त विशेषणकत्व जाण ॥ विशेषणविशेष्योभयात्मकत्व ह्मणोन ॥ तदुभय नित्य संसर्गरूप ॥५॥ विलक्षण स्वरूपशक्तिम-

---

पतीच्या पाशानें बद्ध होऊन पती शिवायकरून सर्व चैतन्यवर्ग सर्व पशु आहेत असें समजावें.

## पाशपदार्थ.

(१) नंतर पतिभिन्न उमासंज्ञक शिवशक्तीनें अधिष्ठित होऊन पशुज्ञानक्रियाशक्तीचा तिरस्कार (२) करून राहिलेल्या ज्ञानालाच पाशपदार्थ असें ह्मणतात.

## सिद्धांतमतविवेक.

(१) सर्व वेद, उपनिषदें, व कामिकादि वातुलांत सर्व शिवागम यांस संमत असलेला व नीलकंठब्रह्ममीमांसाभाष्यादिकांत संग्रहीत केलेला सिद्धांतविवेक कसा आहे हें सांगतात. (२) ज्ञानाक्रियाशक्तियुक्त असलेलें चैतन्यच एक चिदचिद्विशिष्टाद्वैतशिवतत्व आहे. (३) यांत, ज्ञानक्रियाशक्तियुक्त चैतन्यालाच, निर्गुण, निर्विशेष, निष्क्रिय, सत्तामात्र, निरंजन, सुखमात्र, चिन्मात्र (४) अशीं अन्य नांवें शुद्धाद्वैतबोधक श्रुतींनीं दिलीं आहेत. व त्याच श्रुतींनीं त्या चैतन्याविषयीं विशेष्यानतिरिक्त विशेषण (५) अथवा विशेषणीभूत विशेष्य, स्वानतिरिक्तविशेषणकत्व, विशेषणविशेष्योभयात्मकत्व तदुभयनित्यसंसर्गरूप (६) विलक्षणस्व-

त्व ह्मणोन ॥ इत्यादि तात्पर्य देत असोन ॥ सगुणब्रह्मवाद अभिमत ह्मणोन ॥ स्वरूपाचे ठायीं ॥ ६ ॥ जीवेश्वरभेद नाहीं ह्मणोन ॥ मुक्तीचे ठायीं निरंजन ॥ साम्य असोन ॥ सायुज्य कैवल्य ॥ ७ ॥ पृथक् अप्रसिद्ध असलें तरी ॥ अद्वैत्यभिमत तुरीयातीत जीवन्मुक्तीपरी ॥ सिद्धांतमुक्तीचे ठायीं तरी ॥ भेद दिसत नाहीं ॥८॥ तया कारणें औपचारिक असे होवोन ॥ पतिपदार्थ शिवास जाण ॥ पशुपदार्थ विष्णु ब्रह्मादि जीवकोटीस जाण ॥ पाशगुण शक्तितारतम्यानुरूप ॥९॥ तरतमभाव असोन ॥ पतीसी पाशमुक्त जीवासी जाण ॥ अनुक्रमानें स्वाधीन ॥ पाशकत्व ॥ १०॥ शांतविलीन ॥ दग्धपाशत्व हेंचि जाण ॥ मुक्तीचे ठायीं भेदसाधक होवोन॥ पतीसी स्वरूपवश झालेले पशु॥११॥ मुक्तीचे ठायीं वीतशोक होवोन ॥ पतिसेवा करणें स्वभाव असोन ॥ भेदानें हानि नाहीं ह्मणोन ॥ पदार्थत्रय तद्भेद ॥१२॥ अनादि असल्या कारणानें ॥ सृष्ट्यादि जीवन ॥ भोगवैचित्र्यविरोध नाहीं ह्मणोन ॥ स्वशक्त पतीचे ठायीं ॥१३॥ कोणतेंही असामंजस्यादिक ॥ विरोध नाहीं ह्मणोन ॥ शिष्टविषय सर्व जाण ॥ अद्वैतसंमत होवोनि अ-

---

रूपशक्तिमत्व इत्यादि असें त्या पर्यायनामांशीं ब्रह्माचें अभेदतात्पर्य सांगितलें आहे. ह्या सिद्धांतमताला सगुणब्रह्मवाद संमत आहे. त्यांत ( ७ ) जीवेश्वरभेद नाहीं. मुक्तींत निरंजन साम्य मात्र आहे परंतु सायुज्यकैवल्य (८) हें पृथक् अप्रसिद्ध असलें तरी अद्वैतमतवाद्याला अभिमत असलेल्या तुरीयातीत जीवनमुक्तीप्रमाणें सिद्धांतमतमुक्तींत भेद दिसत नसल्यामुळें (९) तें सायुज्यकैवल्य औपचारिक आहे. पतिपदार्थ अशा शिवाला व पशुपदार्थ अशा विष्णुब्रह्मादिजीवकोटीला, पाश, गुण, शक्ति यांच्या तारतम्यभावानें (१०) तरतमभाव आहे ( ह्मणजे यांची योग्यता कमी अधिक प्रमाणानें आहे ). पतीला, व पाशमुक्त पशूला क्रमशः स्वाधीनपाशकत्व (११) व शांत, विलीन, दग्ध असें पाशकत्व हीं मुक्तींत देखील भेद साधकत्वानें आहेत. तथापि पतीशीं स्वस्वरूप झालेले पशू (१२) मुक्तींत वीतशोक होऊनहि त्यांनीं पतिसेवा करणें हा त्यांचा स्वभावच आहे. ह्मणून भेदामुळें कांहीं हानि नाहीं. पदार्थत्रय व त्यांचा भेद (१३) अनादि असल्यामुळें सृष्ट्यादि जीवभोगवैचित्र्य विरोधी नाहीं. स्वशक्त असलेल्या पतीमध्यें (१४) आणखी दुसरे असामंजस्यादिविरोध नाहींत. करितां बाकीचे सर्व विषय अद्वैतसंमत आहेत

सती ॥१४॥ ऐक्यात्मानुसंधानादिकाचि जाण ॥ पाशदहनोपयुक्त होवोन ॥ परमेश्वरसंमत असल्यानें ॥ जगन्मिथ्यादि ॥१५॥ विवेक असावया तरी ॥ तात्विकशैव प्रपंच सत्य होवोनि ॥ पाशविकृति प्रपंच सर्व मिथ्या ह्मणोन ॥ भेदमात्र ज्ञान ॥१६॥ मुक्तिप्रतिबंधक झालें तरी ॥ भेद असतो तादात्म्यरूप होवोन ॥ स्थूल ज्ञान ॥ क्रियाविशिष्ट निरुद्धशक्तिक ॥१७॥ विष्णुप्रमुख पशु जाण ॥ तयाचे ठायीं कांहीं नित्यमुक्त होवोन ॥ कांहीं अधिकारिकमुक्त होवोन ॥ कांहीं अधिकारिक बद्ध ॥१८॥ कांहीं संसृतिबद्ध होवोन ॥ कांहीं केवल जडसदृशावस्थ होवोन ॥ असंख्यात ब्रह्मविष्णुरुद्रांडनियामक ह्मणोन ॥ परःसहस्र सदाशिवरूपांनीं ॥ १९ ॥ तदंतर्गत पशुपाशरूपानें ॥ पाशलेशहीन ॥ शुद्धाद्वैतरूपानें ॥ शांतपाशविशिष्ट ॥ २० ॥ अद्वैतरूपानें ॥ पाशविशिष्टद्वैतरूपानें ॥ पशुपाशोभयांतर्यामिरूपानें ॥ पति एकावीण ॥ २१ ॥ पृथक् नसोन ॥ स्वेच्छेनें आपण ॥ नानाकारें करून ॥ मिरवतो पशुपति ॥२२॥ तयाचे ठायीं जलांतील पदार्थासमान ॥ व्यधिकरण धर्मविरोध नसोन ॥ श्रुतिसिद्धांत भवादिनामाष्टकानें ॥ तदर्थनिर्णायक वे-

---

(१५) व ऐक्यात्मानुसंधानादिकच पाशदहनाला योग्य असून परमेश्वरसंमत असल्यामुळें जगत् मिथ्या आहे, आभास आहे, (१६) अशा प्रकारचें ज्ञान असलें पाहिजे. तथापि तात्विक शैवप्रपंच सत्य असून पाशविकृत सर्व प्रपंच मिथ्या आहे असें भेदमात्रज्ञान (१७) मुक्तिप्रतिबंधक असलं तरी तें भेदतादात्म्यस्वरूपानें राहात असतें. स्थूलज्ञानक्रियाविशिष्ट व निरुद्धशक्तिक (१८) अशा विष्णुप्रमुख पशूंमध्यें कोणी नित्य मुक्त आहेत, कोणी अधिकारिक मुक्त, कोणी अधिकारिक बद्ध, (१९) कोणी संसारबद्ध, कोणी जडासदृशावस्थ असतात. व कांहीं अनेक ब्रह्मविष्णुरुद्रांडांचें नियमन करणाऱ्या हजारो सदाशिवांच्या रूपानें असतात. (२०) कोणी तदन्तर्गत पशुपाशरूपानें; कोणी पाशलेशहीन अशा शुद्धाद्वैतरूपानें; कोणी शांतपाशविशिष्ट (२१) अद्वैतरूपानें; कोणी पाशविशिष्टद्वैतरूपानें; व कोणी पशुपाशोभयांतर्यामिरूपानें असतात. पतीशिवाय (२२) दुसरें कोणीहि नसल्यामुळें तो पशुपति स्वेच्छेनें आपोआप साकार होऊन शोभतो. (२३) पूर्वोक्त सर्व प्राणी त्या पशुपतीच्या ठिकाणीं जलांतील जलचरांप्रमाणें सामानाधिकरण्यानें राहतात. श्रुतिसिद्धांतभवशर्वादि आठ नांवांनीं व

दराशीस ॥२३॥ अथर्वणशिखादि ह्मणोन ॥ अष्टादशोपनिषदांत जाण ॥ छांदोग्यादि दशोपनिषदांतही जाण ॥ सकलागमपुराणाचे ठायीं॥२४॥ उपक्रमादि षड्विध लिंगांनीं ॥ अविरुद्ध होऊन ॥ ब्रह्मसूत्रादिकांनीं ॥ पशुपतिच समुपास्य ह्मणोन ॥ तात्पर्यविषय ॥२५॥ पशुपतिपराङ्मुखांस जाण ॥ पाशकला होवोन ॥ असे ह्मणोन तयाकारणें ॥ मुक्ति नाहीं ॥२६॥ सर्व वेद जाण ॥ सर्व शब्द जाण ॥ योगवलानें ॥ श्रौतागमरूढीनें ॥२७॥ पशुपतिपर झाले विशेष जाण ॥ शिवशब्दासि भवादि नामाष्टकांसि जाण ॥ विष्णवादिकांचे ठायीं जाण ॥ योगशक्तिबोध असला तरी ॥ २८ ॥ रूढ शक्तिबोध नसोन ॥ पशुपतिपर मात्र असोन ॥ पशुपतिच शुद्धसत्वमय होवोन ॥ तद्विरुद्ध प्रतिपादक वाक्यें ॥२९॥ नित्यबद्ध तमोयोग्य जाण ॥ पशुमोहनार्थ होवोन ॥ असती राजसतामस कल्पित ह्मणोन ॥ तादृशतत्त्व ॥३०॥ कूर्मलैंग्य सूतसंहिता ह्मणोन ॥ केदारखंड सिद्धांतागम ह्मणोन ॥ स्मृत्यादिकांनीं ॥ दृढतर असे ॥३१॥ प्रणवब्रह्मशब्द जाण ॥ सदाशिवैकबोधक असती ह्मणोन ॥ आत्मचैतन्यादि शब्द जाण ॥ साधारण असती ॥३२॥ आकाश श्रौतकारणादि शब्द जाण ॥ चिदंबरादिपर असती जाण ॥ भ

---

त्यांचा अर्थ प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींनीं; (२४) व अथर्वशिखादि अठरा उपनिषदांत, छांदोग्यादि दहा उपनिषदांत, सर्व आगम व पुराणें यांत, (२५) असणाऱ्या उपक्रमादि षड्विधलिंगास अविरुद्ध असलेल्या ब्रह्मसूत्रांनीं पशुपतीच उपास्य आहे असें प्रतिपादिलें आहे. (२६) पशुपतीस पराङ्मुख असणाऱ्यांचा पाशच्छेद होत नसल्यामुळें त्यांस मुक्ति नाहीं. (२७) सर्व वेद व सर्व शब्दयोगबलानें व श्रौतागमरूढिबलानेंहि ( २८ ) पशुपत्यर्थप्रतिपादक आहेत. विशेषतः शिवशब्द व भवशर्वादिनामाष्टक यांचा योगशक्तिबलानें विष्णवादि अर्थ होत असला तरी (२९) रूढींत तसा होत नाहीं. परंतु पशुपतिपरच वरील सर्व शब्द आहेत. पशुपति शुद्धसत्वमय आहे तद्विरुद्धार्थ प्रतिपादक वाक्यें (३०) नित्यबद्ध तमोयोग्य अशा पशुमोहनाकरितां राजस् तामस् गुणांनीं कल्पित आहेत. तादृशतत्व ह्मणजे (३१) पशुपतीच शुद्धतत्वमय आहे दुसरा कोणी नाहीं. हें तत्व कूर्मपुराण, लैंग्य, सूतसंहिता, केदारखंड, सिद्धांतागम, स्मृत्यादिक यांनीं दृढतर झालें आहे. ( ३२ ) प्रणव, ब्रह्मशब्द हे सदाशिवमात्रबोधक आहेत व आत्मचैतन्यादि शब्द साधारण आहेत. (३३) आकाश, श्रौत, कारणादि शब्द हे चिदंबरादि

ादि शब्दांनीं ॥ घटादि सत्तादिक॥३३॥ भवसत्तानतिरिक्त ह्मणोन॥ सिद्धांताचे ठायीं अप्राकृतपर जाण ॥ कैलासप्रपंचविषय होवोन॥स-त्ख्याति ॥ ३४ ॥ पाशविकृत प्रपंचांत जाण ॥ अनिर्वचनीय ख्याति जाण॥ स्वीकृत होवोन ॥ असे हें जाणावें ॥३५॥

## उपनिषन्मीमांसा.

निरुपाधिकप्रेमविद्वेष ह्मणोन ॥ तयासि आस्पद सुखदुःख जाण॥ त्यांची प्राप्त्यत्यंतनिवृत्तिच जाण ॥ परमपुरुषार्थ॥१॥ तयाची सिद्धि कशी होईल ह्मणोन ॥ ज्ञानानें जाणावयास विषयकोण ॥ तो प्रसिद्ध कसा होतो ह्मणोन ॥ जाणावया अधिकारी कवण ॥२॥ इत्यादि संश-यज्ञान ॥ डोलासमारूढ श्रोतृजन ॥ मनःशंकाशूकोन्मूलन ॥ तया का-रणें ॥३॥ सर्वज्ञ शिखामणि ॥ व्यासादिजनीं ॥ स्वशास्त्रादि पांडित्यां-नीं॥ अन्यदेवतापर ॥४॥ ध्वनि भासावयापरी ॥ रचित ब्रह्मसूत्र ॥ इ-त्यादिकांस अवसरी ॥ काशीखंडादि प्रसिद्ध होऊन ॥५॥ शिवोपचा-रशिक्षारूप असोन ॥ भुजस्तंभाद्यनुभवोन ॥ स्मारित परमेश्वर जाण॥ त्याच्या अनुभावानुग्रहप्रसादित ॥ ६ ॥ शुद्धज्ञानसंपन्न होऊन ॥ स्व-कृतनिर्णीत सूत्रादि ग्रंथजातास जाण ॥ स्पष्ट तात्विक तात्पर्यसूचन॥

---

परक आहेत. भवादि शब्दांनीं घटसत्तादिक (३४) भवसत्तेहून अतिरिक्त (नि-राळे) नाहीं. सिद्धांताचे ठायीं अप्राकृतपर कैलासप्रपंचविषय सत्ख्यात आहे.(३५) पाशविकृत प्रपंचांत अनिर्वचनीय ख्याति आहे.

## उपनिषन्मीमांसा.

(१) निरुपाधिक प्रेम व द्वेष यांस स्थानभूत असलेलें सुखदुःख यांची अनु-क्रमें अत्यंत प्राप्ति आणि अत्यंत निवृत्ति होणें हाच परमपुरुषार्थ होय.(२) करितां त्या परमपुरुषार्थाची सिद्धि कशी होते? ज्ञानानें जाणावयाचा विषय कोणता? तो कसा जाणिला जावा ह्मणाल तर तो जाणण्यास अधिकारी कोण? (३) इत्यादि संशयांनीं ग्रस्त झालेल्या श्रोतृजनांची शंका दूर करण्याकरितां (४) सर्वज्ञशिरो-मणि अशा व्यासादि पंडितांनीं आपापल्या शास्त्रपांडित्यानें अन्य देवतांचाहि (५) अर्थ निघण्यासारखे ब्रह्मसूत्रादि ग्रंथ रचिले. परंतु पुढें काशीखंडादींतील (६) प्रसिद्ध शिवविरोधामुळें भुजस्तम्भादि शिक्षा झाल्यावर कळलेला परमेश्वराचा प्रभाव व अनुग्रह यांनीं प्रसादित (७) व शुद्ध ज्ञानप्राप्ति होऊन त्यांनीं आपा-

करावया निमित्त ॥७॥ सूतगीता ॥ ब्रह्मगीता ॥ व्यासगीता ॥ इत्यादिक सांगितलें ॥८॥ समन्वयाध्याय ॥ अविरोधाध्याय ॥ साधनाध्याय ॥ फलाध्याय ऐसे चार ॥९॥ तयांचे ठायीं सद्ब्राह्मण ॥ आदि सकल वर्णाश्रमसंस्कृतशैव जाण ॥ तयांनीं मोक्षालागून ॥ तत्तदधिकारानुगुण होऊन ॥१०॥ आगमादि संमत ह्मणोन ॥ क्रियाचर्यायोगज्ञान॥ लक्षणांनीं ॥ शिवचि समुपास्य ॥ ११ ॥ देवता ह्मणोन ॥ सकल श्रुति स्मृत्यादिकरून ॥ इतिहासपुराण ॥ इत्यादिकांनीं ॥१२॥ अबाधित सिद्धांत करून ॥ शिष्ट अन्यतात्पर्य जाण ॥ निंद्य समजोन ॥ सिध्दांतांसी ॥१३॥ मुख्य लक्ष्य जाण ॥ शिवाद्वैत असोन ॥ अविरुध्द ह्मणोन॥ निर्धारावें ॥ १४ ॥

## समन्वयसंग्रह.

नंतर श्रुतिसिद्धांताचे ठायीं ॥ प्रकरणाचे ठायीं ॥ आराधनाराध्यभूत कांहीं ॥ धर्मब्रह्मांसी ॥१॥ संबंध उत्पन्न होऊन ॥ धर्मब्रह्मबोधक हेतु असल्यानें ॥ धर्मविचारानंतर ब्रह्मविचारण ॥ करावें ऐसें ॥ २ ॥ धर्मविचारण ॥ साधनचतुष्टय जाण ॥ संपत्तिद्वारक होऊन ॥ ब्रह्म-

---

पल्या पूर्वी लिहिलेल्या ब्रह्मसूत्रादि ग्रन्थसमूहाचे स्पष्ट, तात्विक, तात्पर्यार्थक (८) असे सूतगीता, ब्रह्मगीता, व्यासगीता, इत्यादि ग्रंथ रचलें. (९) त्यांत समन्वयाध्याय, अविरोधाध्याय, साधनाध्याय, फलाध्याय, असे चार अध्याय आहेत. (१०) त्यांत सद्ब्राह्मणादि सकल वर्णाश्रमांनीं शुद्ध झालेल्या शैवांनीं मोक्षाकरितां त्या त्या अधिकारानुरूप (११) आगमादिकांस संमत असलेल्या क्रिया, चर्या, योग, ज्ञान, यांच्या लक्षणानें शिवच उपास्य आहे. (१२) असें सर्व श्रुति, स्मृति, इतिहास, पुराणादि ग्रंथांनां (१३) अबाधित रीतीनें सिद्ध केलें असतां तो सिद्धांत सांडून असलेलीं अन्य तात्पर्यें निंद्य असतां सिद्धांताला (१४) मुख्य लक्ष्य असें शिवाद्वैत अविरुद्ध आहे असें समजावें.

## समन्वयसंग्रह.

(१) नंतर श्रुतिसिद्धांत व प्रकरणग्रन्थांत आराधनाराध्यभूत ( आराध्य ह्मणजे पूज्य व आराधना ह्मणजे पूजन या स्वरूपानें असलेल्या ) धर्म व ब्रह्म यांचा (२) परस्पर संबन्ध असल्यामुळें धर्म हा ब्रह्मबोधक हेतु आहे ह्मणून धर्म विचारानंतर ब्रह्मविचार करावा. (३) तो धर्मविचार साधनचतुष्टयसंपत्तिद्वारें ब्रह्मज्ञा-

ज्ञान साधक होतें ॥ ३ ॥ ज्ञानाचे ठायीं समुचित ॥ कर्मवादाचि जाण निर्धारित ॥ ह्मणोन ॥ गोदोहन आदिकापरि अधिकारांत ॥ प्रयुक्तोप-जीव्यत्वानें ॥४॥ षड्यागांपरि फलैक्यानें ॥ कर्मैक्यादि दूषण ॥ तयांसि अवकाशरहित ह्मणोन ॥ निर्धार करावा ॥५॥ वेदाहमेतं ह्मणोन ॥ विद्वानमृतः ह्मणोन ॥ ज्ञात्वा मुनिर्गच्छति भूतयोनिं ह्मणोन ॥ ज्ञात्वा शिवं मुच्यते पाशबंधैः ॥६॥ इत्यादि श्रुतींनीं ॥ महादेवज्ञान ॥ तयासि मुक्तिसाधन ॥ मुख्यत्व सांगितलें ॥७॥

## ब्रह्मशब्दार्थ.

ब्रह्मशब्द जाण ॥ योगरूढि लक्षणांनीं ॥ कार्यब्रह्मपर ह्मणोन ॥ कारण रुद्रपर ॥१॥ चतुर्मुखपर ॥ मुख्य जीव नारायणपर ॥ अंतःकरण-पर ॥ बिंदूपाधिपर ॥२॥ सदाशिवपर ॥ गणपतिपर ॥ सुब्रह्मण्यपर ॥ सूर्यपर ॥३॥ चिन्मात्रपर ॥ आत्मपर्याय शिवपर ॥ मंगलपर ऐसें ब्रह्मार्थक जाणोन ॥ ४ ॥ तरी नारायणपरंब्रह्म ह्मणोन ॥ या श्रुतिसी पंचमीतत्पुरुषसमास करोन ॥ आणिक तोचि समास मुख्य असोन ॥ ब्रह्मणस्पति ह्मणोन ॥ ५ ॥ गणपतिमंत्रांत जाण ॥ प्रमथाराध्यत्व असोन ॥ अंभस्यपारे ह्मणोन ॥ इत्यादि मंत्रानुवाक्यांत ॥६॥ असलेल्या

---

नाला साधक होतो. (४–५) गोदोहनादिअधिकारान्तप्रयुक्तोपजीवत्व असल्यामुळें किंवा सहा यागांचें फल एकच असल्यामुळें जसें त्यांत कर्मैक्यदूषणास जागा नाहीं त्याप्रमाणें त्या ज्ञानांत समुचित कर्मच निर्धारित आहे. असा निर्धार करून ( ६ ) "वेदाहमेतम्" "विद्वानमृतः" "ज्ञात्वा मुनिर्गच्छति भूतयोनिम्" "ज्ञात्वा शिवं मुच्यते पाशबंधैः" (७) इत्यादि श्रुतींनीं महादेवज्ञान हेंच मुख्य मुक्तिसाधन आहे असें सांगितलें आहे.

## ब्रह्मशब्दार्थ.

(१) "ब्रह्म" हा शब्द योग, रूढि व लक्षण ह्या त्रिविधबलानें कार्यब्रह्म, कारणरुद्र, (२) चतुर्मुख, मुख्य जीव, नारायण, अंतःकरण, बिंदूपाधि, (३–४) सदाशिव, गणपति, सुब्रह्मण्य, सूर्य, चिन्मात्र, आत्मा, शिव, मंगल, ह्या शब्दांत ब्रह्मबोधक असा समजला गेला (५–६) तरी "नारायणपरं ब्रह्म" ह्या श्रुतींत पंचमीतत्पुरुष समासच मुख्यत्वें केला पाहिजे. ( नारायण परब्रह्म नाहीं असें तात्पर्य समजावें ) गणपति मंत्रांत "ब्रह्मणस्पतिः" ह्या पदाचा अर्थ प्रमथाराध्य असा आहे. "अंभस्यपारे" इत्यादि मंत्रानुवाक्यांत; (७) तसेंच पुरुषसूक्तादि-

पुरुषसूक्तादिकांचे ठायीं ॥ पुरुषो वै रुद्र यांहीं ॥ श्रुतींनीं निर्धारित कांहीं ॥ पुरुषपद महत्पद ॥ ७ ॥ देवपदादिकांनीं ॥ उपक्रमाभ्यासोपसंहारबलानें ॥ परशिवचि प्रतिपाद्य असोन ॥ प्रकरणानुरोधानें ॥८॥ आणिक तो ब्रह्म शब्द जाण ॥ ईशान मंत्राचे ठायीं ईशान ॥ विद्यानामधिपति ह्मणोन ॥ भूताधिपति ॥९॥ ब्रह्माधिपति ह्मणोन ॥ शिवसदाशिव ह्मणोन ॥ शब्दसहोच्चरित होऊन ॥ पर्याय झाल्यानें ॥१०॥ ब्रह्म ह्मणजे जाण ॥ परशिव असोन ॥ पृथक् नाहीं ह्मणोन ॥ निर्धारित झालें ॥११॥ ब्रह्मजिज्ञासा यासि ॥ शिवजिज्ञासा ऐसा ॥ अर्थसिध्द झाला ह्मणोन ॥ सिध्दांत झाला ॥१२॥

## कारणवाक्यें.

कारण वाक्यांतील आकाशवाच्य ॥ चिदंबराकाश शिवलिंग होय ॥ प्राण ह्मटलिया ॥ मुख्यप्राणात्मक शिववायुलिंग ॥१॥ ज्योतिशब्दवाच्य ॥ प्रणवज्योतिरात्मक शिवमंत्र नादेश्वरलिंग होय ॥ महच्छब्दमहादेव महालिंग सच्छब्दवाच्य ॥ स्वरूपसत्यलिंग होय ॥ २ ॥ असत् ह्मटलिया ॥ अघोरमूर्तीचें प्रकृतिलिंग होय ॥ जल ह्मटलिया ॥ महाजलमूर्तीचें अब्लिंग ॥३॥ सूर्य ह्मटलिया ॥ अष्टमूर्त्यंतर्गत दृग्लिंग होय ॥

---

कांत "पुरुषो वै रुद्रः" ह्या श्रुतिवाक्यांनीं निश्चित झालेल्या पुरुषपद, महत्पद,(८) देवपद इत्यादि पदांनीं व उपक्रम, अभ्यास, उपसंहार, यांच्या बलानें परशिवच प्रतिपाद्य आहे. आणि प्रकरणानुरोधानें (९) तो ब्रह्मशब्द "ईशानः सर्वविद्यानामीश्वरः सर्वभूतानां ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोऽधिपतिर्ब्रह्मा शिवो मे अस्तु सदाशिवोम्" ह्या ईशान मंत्रांतील "सर्व विद्याधिपतिः" "भूताधिपतिः" (१०) "ब्रह्माधिपतिः" "शिवः" "सदाशिवः" ह्या शब्दांसह उच्चारिलेला असून, पर्यायवाचक असल्यामुळें (११) ब्रह्म ह्मणजे परशिवच असून अन्य दुसरा नाहीं असा निर्धार आहे. (१२)करितां ब्रह्मजिज्ञासा ह्मणजे शिवजिज्ञासा असाच अर्थ समजावा.

## कारणवाक्यें.

(१) नंतर कारण वाक्यांत आकाश ह्मणजे चिदंबराकाश शिवलिंग, प्राण ह्मणजे मुख्य प्राणात्मक शिववायुलिंग, (२) ज्योति ह्मणजे प्रणव ज्योतिरात्मक असें शिवमंत्रनादेश्वरलिंग; महच्छब्दमहादेव ह्मणजे महालिंग; सत् ह्मणजे स्वरूपसत्यलिंग (३) असत् ह्मणजे अघोरमूर्तीचें प्रकृतिलिंग. जल ह्मणजे महाजलमूर्तीचें अब्लिंग; (४) सूर्य ह्मणजे अष्टमूर्त्यंतर्गत दृग्लिंग; वैश्वानर ह्मणजे आग्नेय लिंग;

वैश्वानर ह्मटलिया ॥ आग्नेयलिंग ॥४॥ याप्रमाणें सिध्द व्हावयासि ॥ पंचब्रह्म पंचरुद्र ऐसी ॥ सूतसंहिता महाभारत तैसी ॥ शिवधर्मागमांनीं ॥५॥ ब्रह्मनारायण ॥ शिवरुद्र हिरण्यगर्भ ह्मणोन ॥ पति पुरुष देव ह्मणोन ॥ महत् सत् ॥६॥ चैतन्यशब्दवाच्य ॥ परशिवचि होय ॥ जगज्जन्मादिकारण होय ॥ शास्त्रसिद्धांत ॥७॥

## शिवच शास्त्रयोनि.

याप्रमाणें प्रतिपादित ह्मणून ॥ शास्त्र शिवानें सांगितलें असोन ॥ तें शास्त्र करितें शिवाचें प्रतिपादन ॥ "वेदः शिवः शिवो वेदः" ॥१॥ या अनुशासनें करून ॥ हरिवंशांतील कैलासयात्राप्रकरण ॥ त्याचे ठायीं "तान्येव मम नामानि" अशी ईश्वराज्ञा जाण ॥ असल्यामुळें ॥२॥ नारायणमुनि ॥ पावावया चक्र सुदर्शन ॥ परमेश्वर पूजा करोन ॥ सहस्रनामादिकांचे ठायीं ॥३॥ मांडूक्याद्युपनिषत्प्रकरण ॥ तयाचे ठायीं प्रणव मुख्यार्थ ह्मणोन ॥ परशिवचि जाण ॥ तो असे सर्वव्यापक ॥ ४ ॥ तोचि विष्णुशब्दवाच्य असोन ॥ पृथक् नाहीं जाण ॥ वैकुंठादि प्रकरण ॥ तयाचे ठायीं ॥५॥ नारायणशब्दवाच्य होवोन ॥ विष्णुशब्दवाच्य होवोन ॥ परमेश्वरचि जाण ॥ अंतर्यामी झाला ॥६॥ वैकुंठशब्दासि जरी ॥ विष्ण्वादि शब्दांमध्यें रूढि असली तरी ॥ केव-

---

(५) ह्याप्रमाणें सिद्ध झालें असतां पंचब्रह्म, पंचरुद्र, सूतसंहिता, महाभारत, शिवधर्म; आगम, ह्या ग्रंथांनीं (६) ब्रह्म, नारायण, शिव, रुद्र, हिरण्यगर्भ, पति, पुरुष, देव, महत्, सत्, (७) चैतन्य ह्या शब्दांनीं वाच्य असलेला परशिवच जगज्जन्मादिकांस कारण आहे असा शास्त्रसिद्धांत ठरविला आहे.

## शिवच शास्त्रयोनि.

(१) ह्याप्रमाणें पूर्वीं प्रतिपादित केलेलें शास्त्र शिवानेंच सांगितलेलें आहे व तें शास्त्र शिवाचें प्रतिपादन करितें. "वेदः शिवः शिवो वेदः" (२) ह्या अनुशासनानें सांगितलेला व हरिवंशांतील कैलासयात्राप्रकरणांत सांगितलेल्या "तान्येव मम नामानि" ह्या ईश्वर वचनानें सांगितलेला (३) नारायण ऋषीनें सुदर्शनप्राप्त्यर्थ केलेल्या शिवपूजनांतील सहस्रनामावळींत (४) व मांडूक्यादि उपनिषदांतहि ॐकारास मुख्यार्थ असलेला परशिवच सर्वव्यापक असून (५) विष्णुशब्दवाच्य आहे अन्य नाहीं. वैकुंठादिकांत (६) नारायण, विष्णु ह्या शब्दांनीं वाच्य असलेला परमेश्वरच अंतर्यामी आहे(७) करितां वैकुंठाला विष्ण्वादि

ल रूढशक्तिपरी ॥ योगरूढ प्रबल असे ॥७॥ तथाकारणें ॥ परशिवचि सर्वशब्दार्थ जाण ॥ ह्मणोनि शास्त्रयोनि ॥ ऐसें निर्धारावें ॥८॥

## पतित्वोपपत्ति.

आणिक तो परशिवचि जाण ॥ पति पदार्थ कैसा ह्मणोन ॥ शंकेसि उत्तर प्रतिपादन ॥ करिती शास्त्राधारें ॥१॥ दिशां च पतये ॥ पत्तीनां पतये॥ अन्नानां पतये॥ वृक्षाणां पतये ॥२॥ सत्वानां पतये ॥ हिरण्यपतये ॥ अंबिकापतये ॥ उमापतये ॥३॥ पशुपतये इत्यादिक ह्मणोन ॥ परसहस्त्र श्रुति जाण ॥ करीत असतां नमस्कार जाण ॥ परशिवव्यतिरिक्त ॥४॥ निराळा पतिपदार्थ नसोन ॥ एकोरुद्रः ह्मणोन ॥ एको देवः ह्मणोन ॥ एकमेवाद्वितीयं ॥५॥ इत्यादि श्रुतिवाक्यांसि ॥ ऐकरूप्य असलियासि ॥ परशिवचि समुपास्य ॥ पति ऐसें जाणा ॥६॥

## शिवजीवैक्य.

अयमात्मा ह्मणोन ॥ एष आत्मा सदाशिवः ह्मणोन ॥ शिव एष निरंजनः ॥ शिव एवाहमव्ययः ॥१॥ ब्रह्माहमस्मि ह्मणोन ॥ मदात्मा परमेश्वरः ह्मणोन ॥ ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ह्मणोन ॥ तत्त्व-

---

प्रतिशब्द रूढींत असले तरी केवल रूढीपेक्षां योगरूढीचें प्राबल्य जास्त असल्यामुळें (८) त्या विष्ण्वादि शब्दांचा परशिव असाच अर्थ आहे. ह्मणून शिवच शास्त्रयोनि आहे असें सिद्ध झालें.

## पतित्वोपपत्ति.

(१) आणि तो परशिवच पतिपदार्थ कसा? असा प्रश्न झाल्यास शास्त्राधारानें प्रतिपादन करितात. कीं–(२) 'दिशां च पतये;' 'पत्तीनां पतये;' 'अन्नानां पतये;' 'वृक्षाणां पतये,'(३)'सत्वानां पतये;' हिरण्य पतये;'अंबिका पतये;' 'उमापतये'(४) "पशुपतये नमो नमः" इत्यादि हजारो श्रुति त्या महादेवाला नमन करीत असून परशिवावांचून (५) दुसरा पतिपदार्थ नाहीं. त्यामुळें "एको रुद्रः" "एको देवः" एकमेवाद्वितीयम् (६) इत्यादि श्रुतिवाक्यांना ऐक्यरूप असल्यामुळें परशिवच समुपास्य पति आहे.

## शिवजीवैक्य.

(१) नंतर "अयमात्मा" "एष आत्मा सदाशिवः"; 'शिवएष निरंजन': "शिव एवाहमव्ययः" (२) "ब्रह्माहमस्मि" "मदात्मा परमेश्वरः" "ईश्वरः

मसि ॥ २ ॥ शिवमद्वैतं चतुर्थमेतदेव ह्मणोन ॥ मदात्मा शंभुरीशानो भूते भूते व्यवस्थितः ह्मणोन ॥ कैवल्य लक्ष्मीपतिरीश्वरोस्मि ह्मणोन॥ ऱ्हीश्च ते लक्ष्मीश्च पत्न्यौ ॥३॥ वेदाहमेतं पुरुषं महांतं ह्मणोन ॥ आदित्यवर्णं तमसस्तु पारे ह्मणोन ॥ ध्यात्वा मुनिर्गच्छति भूतयोनिं ह्मणोन ॥ समस्तसाक्षिं तमसः परस्तात् ॥४॥ स ब्रह्म स शिवः ह्मणोन॥ ब्रह्मविद्ब्रह्म भवति ह्मणोन ॥ निरंजन परमं साम्यमुपैति ह्मणोन ॥ नित्योसौ निर्गुणः शिवः ॥५॥ इत्यादि श्रुतिवाक्यांनां ॥ जीवनिर्देशपूर्वक होवोन ॥ सांगत असतां शिवैक्य जाण ॥ शिवसमानतारूप ॥ ६ ॥ मुक्तींत जाण ॥ चिन्मात्रास भेद नसोन ॥ स्वरूपैक्य आहे ह्मणोन ॥ निर्धारावें ॥ ७ ॥

## सगुणत्वसमर्थन.

आणिक ते शिव मंगळगुण ॥ शुभकर असोन ॥ शिवस्वरूपानतिरिक्त असोन ॥ निराळे गुण जरी न भासले ॥१॥ निर्गुण ईश्वराकडून ॥ पंचकृत्य व्हावयास जाण ॥ नित्यज्ञान ॥ क्रियादिक आहेत ह्मणावयास ॥२॥ "परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च" इत्यादि सत्यकामादि श्रुतिवाक्यें जाण ॥ परम सगुण ॥ त-

---

सर्व भूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति" "तत्त्वमसि" (३) "शिवमद्वैतं चतुर्थमेतदेव" "मदात्मा शंभुरीशानो भूते भूते व्यवस्थितः" "कैवल्यलक्ष्मीपतिरीश्वरोस्मि" "ऱ्हीश्चते लक्ष्मीश्च पत्न्यौ" (४) "वेदाहमेतं पुरुषं महान्तं आदित्यवर्णं तमसस्तुपारे। ध्यात्वा मुनिर्गच्छति भूतयोनिम् समस्तसाक्षिं तमसः परस्तात्"(५)"सब्रह्म सशिवः" "ब्रह्मविद्ब्रह्म भवति निरंजनः परमसाम्यमुपैति" नित्योऽसौ निर्गुणःशिवः" (६) इत्यादि श्रुतिवाक्यें जीवाचा निर्देश करून शिवैक्य सांगत असतां शिवसमानतारूप (७) मुक्तींतहि चिन्मात्रास भेद नसून स्वरूपैक्यच आहे असें निश्चित जाणावें.

## सगुणत्वसमर्थन.

(१) आणिक शिवाचे ते मंगलगुण शिवच आहेत. शिवस्वरूपानतिरिक्त होऊन निराळे भासत नसले तरी (२) निर्गुण अशा ईश्वराकडून पंचकृत्यें घडण्यास नित्य ज्ञानक्रियादि गुण आहेत यास पुढील श्रुति आधार आहे (३) "परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च" इत्यादि सत्यकामादि श्रुतिवाक्यें

यासि उपदेश करून ॥ अष्टाभिधानाधिकरणत्वादिकांनीं ॥ ३ ॥ पति ऐसा परशिव जाण ॥ आहे तो परम सगुण ॥ सिद्ध आहे तें वर्णन ॥ निर्धारावें ॥ ४ ॥

## अष्टाभिधानें.

सत्तार्थक भूधातूपासोन ॥ सर्वत्र सदा भवति ह्मणोन ॥ भवशब्द सिद्ध झाला असोन ॥ भवशब्दवाच्यत्वानें ॥१॥ हिंसार्थक शॄ धात्वर्थानें ॥ सकलसंहर्तृत्वयुक्त ह्मणोन ॥ सर्वशब्दवाच्यत्वानें ॥ निरुपाधिक ॥२॥ परमैश्वर्यविशिष्ट ईशान ॥ शब्दवाच्यत्वानें ॥ "एषामीशः पशुपतिः पशूनां च चतुष्पदाम् ॥ शिवस्वरूपाज्ञानेन विष्णवाद्याः पशवः स्मृताः" इत्यादिश्रुत्यागम पुराण ॥ प्रमाणांनीं ॥ ३ ॥ पशुपाशात्मक ॥ चिदचिन्नियामक-॥ त्व विशिष्टक ॥ पशुपतिशब्दवाच्यत्वानें ॥४॥ "रुदं द्रावयते यस्माद्रुद्र इत्युच्यते प्रभुः" या प्रमाणानें ॥ संसारदुःखनिवारकत्वविशिष्ट ह्मणोन ॥ सर्वभूतदयालु ह्मणोन ॥ रुद्रशब्दवाच्यत्वानें ॥५॥ "तरति शोकमात्मवित्" ह्मणोन ॥ श्रवणानें ॥ परतेजांनीं ॥ अनभिभवनीयत्वादिरूप ॥ ६ ॥ उग्रशब्दवाच्यत्वानें ॥ "न तत्र सूर्यो भाति" ह्मणोन ॥ नियामकत्वानें ॥ "भीषास्माद्वातः

---

सगुणत्वाचें प्रतिपादन करितात. ह्मणून अष्टाभिधानाधिकरणत्वादिकांनीं (४) पति सगुण आहे असें सिद्ध होतें.

## अष्टाभिधानें.

(१) सत्तार्थक भू धातूनें सदा सर्वत्र असणारा या अर्थी भव शब्द झाला आहे. (२) हिंसार्थक शॄ धातूपासून सकलसंहारकर्तृ ह्याअर्थी शर्व शब्द सिद्ध झाला आहे. (३) ऐश्वर्यार्थक ईश् धातूपासून निरुपाधिक परमैश्वर्यविशिष्ट ह्या अर्थी ईशान शब्दाची व्युत्पत्ति आहे. "एषामीशः पशुपतिः पशूनां च चतुष्पदाम् । शिवस्वरूपाज्ञानेन विष्णवाद्याः पशवः स्मृताः" ॥ इत्यादि श्रुत्यागम पुराणप्रमाणांनीं (४) पशुपाशात्मक चिदचिन्नियामकत्वयुक्त असा पशुपतिशब्द व्युत्पन्न झाला आहे. (५) "रुदं द्रावयते यस्माद्रुद्र इत्युच्यते प्रभुः" ह्याप्रमाणें संसारदुःखनिवारक व सर्वभूतदयालु ह्या उभयअर्थी रुद्र शब्द सिद्ध झाला आहे. (६) "तरति शोकमात्मवित्" ह्या श्रुतिप्रमाणानें परतेजानें पराभूत न होणारा (७) ह्या अर्थी उग्र शब्द निष्पन्न झाला आहे. "न तत्र सूर्योभाति" ह्या श्रुति नियामकत्वानें व "भीषा-

पवते" ॥७॥ ह्मणोन ॥ भयहर्तृ भीमशब्दवाच्यत्वानें॥"स महान् क्रीडते लोकसृष्टिस्थित्यंतकृत्पतिः"याप्रमाणानें ॥ महात्म्या विष्णुब्रह्मादिकांस ॥८॥ नियामकांतर्यामी होऊन ॥ महादेवशब्दवाच्यत्वानें ॥ निरस्त समस्त संसारकलंकत्वानें ॥ निखिल मंगलाधार ॥९॥ सर्वमंगलांगत्वानें ॥ नामरूपानें ॥ शिव ह्मणवोन ॥ घेत असे ॥ १० ॥ सकृत्प्रसंगमात्रानें ॥ निजनाम जप्त्यांस जाण॥ मंगलप्रद झाल्यानें॥ शिवत्व॥११॥ अनन्य साधारण ॥ असोन शिवशब्दवाच्यत्वानें ॥ निखिल हेयप्रत्यनिक कल्याण ॥ गुणैकतान नित्य मंगलरूप ॥१२॥ सच्चिदानंदैकरसपरब्रह्मत्वानें ॥ सर्वशक्त परशिव जाण ॥ सूक्ष्मचिदचिद्विशिष्ट होऊन ॥ जगत्कारण झाला ॥१३॥ स्थूलचिदचिद्विशिष्टत्वानें ॥ कार्य ऐसें जाण॥ ऐसें शास्त्रवचन ॥ निर्धारी तें ॥१४॥

## शिवसर्वोत्तमत्व.

पति परशिव जाण ॥ तयाचें दिव्य महालिंगपाददर्शन ॥ घ्यावया वराहरूप घेवोन ॥ तेथें शोध केला ॥१॥ नंतर शिवानुग्रहपात्र होऊन ॥ शिवांगानें जन्म घेवोन ॥ शिवपूजा करोन ॥ चक्र मिळविलें॥२॥

---

साक्षातः पवते" (८) ह्या श्रुतिप्रमाणावरून भयहर्तृ ह्या अर्थी भीम शब्द व्युत्पन्न झाला आहे. "स महान् क्रीडते लोकसृष्टिस्थित्यंतकृत्पतिः" ह्या प्रमाणानें महात्म्या विष्णुब्रह्मादिकांस (९) नियामक व अंतर्यामी असणारा ह्या अर्थी महादेव शब्द उत्पन्न झाला आहे. ज्यानें सर्व संसारदोष घालविला आहे व सर्व मंगलांस आधारभूत (१०) अशा पार्वतीचा जो अंगधारी आहे अशा नामरूपानें शिव ( मंगलकारक ) ह्मणवून घेणारा (११) व आपलें सकृन्नामस्मरण करणाऱ्या भक्तांस मंगलप्रद असणारा असा शिवशब्द (१२) अनन्य साधारण होऊन सिद्ध झाला आहे. पूर्वोक्त भवादि अष्ट शब्दांना शिव शब्दवाच्य झाल्यामुळें निखिल हेयप्रत्यनीककल्याणगुणैकतान नित्य मंगलरूप (१३) सच्चिदानंदैकरसपरब्रह्मत्वानें सर्वशक्त असा परशिव सूक्ष्म चिदचिद्विशिष्ट होऊन जगत्कारण (१४) व स्थूल चिदचिद्विशिष्टत्वानें कार्य झाला आहे असा शास्त्रनिर्धार आहे.

## शिवसर्वोत्तमत्व.

(१) नंतर पति अशा परशिवाच्या दिव्य महालिंग पाददर्शनाकरितां प्रयत्न करून महाविष्णु हा वराहरूपानें त्याचा शोध करून (२) शिवानुग्रहाला पात्र झाला. नंतर त्यानें शिवांगापासून जन्म घेऊन शिवाची पूजा करून चक्र मिळविलें

विषपान ॥ केलिया शिवाकडोन ॥ रक्षित होऊन ॥ शिवास पादाभरण ॥ ३ ॥ आणिक बाण ॥ कलत्र योनि अर्धांग ह्मणोन ॥ मित्रशिष्यादिभावानें ॥ पोष्यपोषकरूप ॥४॥ तयें प्रियतम होऊन ॥ शिवाभिन्न ह्मणवोन ॥ विष्णु तो जाण ॥ शिवपूजाप्रभावानें ॥५॥ सर्वोत्तम ह्मणवोन ॥ शिवसमानत्वानें ॥ शिवाला विसर पाडोन ॥ राहतो पैसें ॥ ६ ॥ श्रुतिस्मृत्यादिक ॥ सांगत असतां सकळक ॥ वर्णोत्तमक ॥ ब्राह्मण कुलदैवत ह्मणोन ॥७॥ "ब्राह्मणानां शिवो देवः" ह्मणोन ॥ स्मृतिसिद्ध होऊन ॥ शिवसर्वोत्तम ह्मणावया जाण ॥ संदेह नाहीं ॥८॥

## शिवज्ञानसार.

आणिक तो परशिव जाण ॥ सहस्रशीर्षा ह्मणोन ॥ सहस्राणि सहस्रशः ह्मणोन ॥ ऋतꣳ सत्यं परं ब्रह्म ॥१॥ "दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम्" ॥ ह्मणोन॥ "अष्टमूर्तिरजः शिवः" ह्मणोन ॥ "रुद्रो नर उमा नारी तस्मै तस्यै नमो नमः" ह्मणोन ॥ "विष्णुर्योनिं कल्पयतु" ॥२॥ "यो रुद्रो अग्नौ" ह्मणोन ॥ शिवः सर्वं ह्मणोन ॥ इत्यादि प्रमाणांनीं ॥ सर्वात्मक होवोन ॥ ३ ॥ आणिक तो शिवचि मी ह्मणोन ॥ शिवचि तूं ह्मणोन॥ शिवचि हा ह्मणोन ॥ शिवचि हें ॥४॥ शि

---

(३) विषपान करून शिवानें ज्याचें रक्षण केलें तों विष्णु श्रीशिवास पादाभरण, (४) बाण, कलत्र, योनि, अर्धांग, मित्र, शिष्य, इत्यादि भावांनीं पोष्यपोषकरूपानें (५) अत्यंत प्रिय झाला. शिवाचे ठिकाणीं व माझे ठिकाणीं किंचित भेद नाहीं असा भाव धरून श्रीविष्णु हा शिवपूजाप्रभावानें (६) सर्वोत्तम झाला. विष्णु हा शिवासमान होऊन शिवाचें विस्मरण पाडतो असें (७) श्रुति स्मृति सांगतात. अशा समयीं वर्णांमध्यें श्रेष्ठवर्ण अशा ब्राह्मणाचें कुलदैवत (८) साक्षात् श्रीशिवच आहे असें "ब्राह्मणानां शिवो देवो" ही स्मृति सांगत आहे. यावरून साक्षात् श्रीशिवच सर्वोत्तम आहे असें ह्मणण्यास कोणताही संशय नाहीं.

## शिवज्ञानसार.

(१–२) आणि तो शिव "सहस्रशीर्षा" "सहस्राणि सहस्रशः" "ऋतꣳ सत्यं परं ब्रह्म" "दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम्" "अष्टमूर्तिरजः शिवः" "रुद्रो नर उमा नारी तस्मै तस्यै नमो नमः" "विष्णुर्योनिं कल्पयतु" (३) "यो रुद्रो अग्नौ" "शिवः सर्वं" वगैरे प्रमाणांनीं सर्वात्मक होऊन (४) आणि शिवच मी आहें, शिवच तूं आहेस, शिवच हा आहे, शिवच हें आहे, (५) शिवच

वचि तें ह्मणोन ॥ शिवचि कर्ता ह्मणोन ॥ शिवचि करविणारा ह्मणोन ॥ शिवचि सत्य ॥५॥ शिवचि धर्म ह्मणोन ॥ शिवचि ज्ञान ह्मणोन ॥ शिवमय होवोन ॥ शिवेतर नाहीं ॥६॥ शांतिसमृद्धामृत होवोन ॥ राहे शिवज्ञानसार ह्मणोन ॥ शास्त्रनिर्धारें जाणावें ॥७॥

## पशुभेद.

तो पशु मल माया ॥ कर्म ह्मणिजे पाशत्रया ॥ संबंध करूनिया ॥ सकळ ह्मणवी ॥१॥ मलकर्म ईया ॥ पाश द्वितीया ॥ संबंधानें प्रलया-॥ कल ह्मणवी ॥ २ ॥ तयामलैकपाशसंबंधें करूनि ॥ विज्ञान केवल ह्मणोनि ॥ त्रिवर्ग होऊनी ॥ असे त्याचे ठायीं ॥ ३ ॥ प्रथम सकळ वर्गे ते आपण ॥ पक्वत्रिपाश ह्मणोन ॥ अपक्वत्रिपाश ह्मणोन ॥ द्विविध असती ॥ ४ ॥

## पक्वत्रिपाशपशु.

तया पक्वत्रिपाशांत कलामस्तक ॥ स्थानीं होते मंडलेश्वर अष्टक ॥ गणमस्तकीं होते क्रोधेशादिक ॥ अष्टवर्ग ॥ १ ॥ सूक्ष्मतन्मात्रवर्गात ॥ असोनिया शत ॥ रुद्रांसि झाला कर्तृ ॥ वीरभद्रएक ॥२॥ गुणतत्वांत

---

तें आहे, शिवच करणारा असून शिवच करविणारा आहे. शिवच सत्य असून (६) शिवच धर्म आहे. शिवच ज्ञान असून सर्व शिवमय आहे. शिवाशिवाय दुसरें कोणतेंही नाहीं. (७) अशा रीतीनें शांतिसमृद्धामृत होऊन राहणें याला शिवज्ञानसार ह्मणतात.

## पशुभेद.

(१) त्या पशूंमध्यें तीन प्रकार आहेत, ते असे कीं, मल, माया, कर्म या तीन पाशांचा संबंध होऊन सकल पशु ह्मणवितो. (२) दुसरा प्रकार असा कीं—मलकर्मरूप पाशद्वयाचा संबंध होऊन प्रलयाकल पशु असा ह्मणवून घेतो. (३) तिसरा प्रकार असा कीं,—मलैकपाशबंधानें विज्ञानकेवल पशु असा ह्मणवितो. या त्रिवर्गामध्यें (४) पहिल्या सकल वर्गात पक्वत्रिपाश आणि अपक्वत्रिपाश असे दोन भेद आहेत. त्यामध्यें—

## पक्वत्रिपाशपशु.

(१) पक्वत्रिपाशामध्यें कलामस्तकांत मंडलेश्वर आठ आहेत. गणमस्तकांत क्रोधेशादि आठ आहेत. (२) सूक्ष्मतन्मात्रवर्गात शतरुद्रांचा कर्ता वीरभद्र एक आहे. (३) गुणतत्वामध्यें ब्रह्मादिकांचा कर्ता श्रीकंठेश्वर एक आहे. (४)

असोन ॥ ब्रह्मविष्णवादिकांलागून ॥ कर्ता झाला आपण ॥ एक श्रीकंठेश्वर ॥३॥ ब्रह्मांडरक्षक ॥ झाले शतरुद्रादिक ॥ ह्मणिजे मुख्य ॥ शत अष्टादश ॥४॥ समस्तांकारण ॥ परशिव आपण ॥ निरधिकरण दीक्षेनें ॥ मंत्रेश्वर करूनि ॥ ५ ॥ तयातया कृत्याधिकारी ॥ करूनि ठेविलियावरी ॥ ते सकळ युक्त देहधारी ॥ झाले वरी ॥ ६ ॥ ते त्या देहवशंगत ॥ न होतां सदोदित ॥ सर्वज्ञत्वें पतिपदार्थ ॥ ह्मणवीत असे ॥७॥

## अपक्वत्रिपाशपशु.

आणिक ते अपक्वादिक ॥ त्रिपाशांत कोणीएक ॥ विषयमूर्छित ॥ तयां ऐसें ॥ १ ॥ मल निरोधूनि समस्त ॥ केवल अवस्थायुक्त ॥ असती वरि यथार्थ ॥ शिवापासूनि ॥२॥ कळा योग्य भोगादिक ॥ कर्मक्षय मळपरिपाक ॥ आदिपरिक्रमयोग ॥ पावोनिया ॥ ३ ॥ मग मोक्षावरि आशा ॥ संसाराचे ठायीं जुगुप्सा ॥ शिवभक्तांचे ठायीं सर्वशः ॥ भक्तिभाव ॥४॥ श्रीगुरूपास्ति ॥ शिवागमीं विश्वास प्रीति ॥ इत्यादि चिन्हयुक्त ते शक्ति--॥ पाताच्या योग्य ॥५॥ मंद मंदतर ॥ तीव्र तीव्रतर ॥ ह्मणिजे भेदविचार ॥ परीक्षूनि ॥६॥ परशिव तो आपण ॥ गुरुमूर्त्यधिष्ठान करून ॥ साधिकरण ॥ दीक्षाक्रमें ॥७॥ करूनिया सर्वथा ॥ शिवसमानरूपता ॥ मोक्ष होय देता ॥ तया सकळांसि ॥८॥

---

ब्रह्मांडरक्षक शतरुद्र एकशेआठ आहेत. (५) परशिव हा जेव्हां आपणच निरधिकरणदीक्षेनें मंत्रेश्वर करून (६) त्या त्या कृत्यावर अधिकारी करून ठेवतो तेव्हां ते सर्व देहयुक्त झाल्यानंतर (७) त्या त्या देहाचें स्वाधीन न होतां सर्वज्ञ होऊन पति असें ह्मणवून घेतात. असें समजावें.

## अपक्वत्रिपाशपशु.

(१) अपक्वत्रिपाशामध्यें कांहीं लोक विषयमूर्छित झालेल्या लोकांप्रमाणें (२) मलनिरोध करून केवलावस्थायुक्त होऊन नंतर श्रीशिवापासून (३) कलायोग्य भोगकर्मक्षय पावतात. तसेंच मलपरिपाकादिक्रमयोग पावतात. (४) नंतर मोक्षाचे ठिकाणीं उत्कंठा दाखविवात. संसाराचे ठिकाणीं जुगुप्सा दाखवितात. शिवभक्तांचे ठिकाणीं भक्ति करतात. (५) श्रीगुरूची उपासना करतात. शिवागमाचे ठिकाणीं विश्वास ठेवतात. इत्यादि चिन्हांनीं युक्त शक्तिपाताच्या (६) मंद, मंदतर, तीव्र, तीव्रतर अशा भेदपरीक्षेनें (७--८) परशिवगुरुमूर्तीचें अधिष्ठान करून करण्यांत येणाऱ्या साधिकरण दीक्षाक्रमानें शिवसमानरूप मोक्ष पावतात.

## अपक्वत्रिपाशांमधील प्रलयाकल.

आणिक ते अपक्व ॥ त्रिपाशांत उरले सर्व ॥ ते कर्मफलोद्भव ॥ भोगादिक ॥१॥ तयें व्हावया मुक्त ॥ शिव पाठवितो नाना योनींत ॥ किंचिज्ज्ञत्व किंचित्कर्तृत्व ॥ वशें करूनि ॥ २॥ सुखदुःखहेतु मोहवेष्टित ॥ होऊनि त्या त्या देहें प्रसिद्ध ॥ फिरत नाना योनींत ॥ तों समयादीक्षाविशेषें ॥ शिव नाना योगिया ॥३॥ पशुत्व एकदेशित्व ॥ निरखुनी शिवत्व ॥ एकदेशित्व ॥ अभिव्यक्ति घडूनि ॥४॥ मायापाश विमोचन करूनि ॥ मलकर्म ह्मणिजे पाश दोन्हीं ॥ संयुक्त प्रलयाकलसंज्ञा घेऊनि ॥ राहती जगांत ॥५॥

## प्रलयाकलांमध्यें भेद.

आणिक प्रलयाकल आपण ॥ ते पक्वपाशद्वय ह्मणून ॥ अपक्वपाशद्वय ह्मणून ॥ द्विभाग असती ॥ १ ॥ त्याचे ठायीं ॥ पक्वपाशद्वय ते अशेखा ॥ परशिवाचे निरधिकरणदीक्षा ॥ सामर्थ्यानें निजमोक्षा ॥ पावत असती ॥२॥ अपक्वपाशद्वय ते सूर्याष्टक ॥ देहयुक्त होऊनि कर्माधीन ते पृथक ॥ तें तें भुवनज देहादिक ॥ संबंधें असती ॥ ३ ॥ तयांत लोकपालाष्टक ॥ गुह्याष्टक अतिगुह्याष्टक ॥ गुह्याद्गुह्याष्टक पवि-

---

### अपक्वत्रिपाशांमधील प्रलयाकल.

(१) अपक्वत्रिपाशांमध्यें राहिलेल्या लोकांत कर्मफलभोगादिकांनीं (२) मुक्त होण्याकरितां कोण प्रयत्न करतात. त्यांना साक्षात् शिव हा पशुसंज्ञा देऊन अनेक योनींत फिरावयास लावतो. ते लोक किंचिज्ज्ञत्व किंचित्कर्तृत्वानें (३) सुख, दुःख, मोहयुक्त होऊन त्या त्या देहाच्या नांवानें प्रसिद्ध होऊन नाना योनींत फिरत असतां समयांतरदीक्षाविशेषानें (४) पशुत्वाच्या एका भागांत राहून शिवत्वाच्या एका भागांत प्रकट होतात. (५) नंतर मायापाश सोडून मलकर्मरूपपाशद्वयानें मात्र युक्त होऊन " प्रलयाकल " अशी संज्ञा घेऊन जगांत राहतात.

### प्रलयाकलामध्यें भेद.

(१) त्या प्रलयाकलामध्यें पक्वपाशद्वय आणि अपक्वपाशद्वय असे दोन भेद आहेत. ( २ ) त्यामध्यें पक्वपाशद्वयच परशिवाच्या निरधिकरणदीक्षासामर्थ्यानें निजमोक्ष पावतात. ( ३ ) आणि अपक्वपाशद्वयच सूर्याष्टकदेहयुक्त होऊन कर्माधीनतेमुळें भुवनजदेहसंबंधी झालेले असतात. (४) आणि त्यांमध्यें लोकपालाष्टक, गुह्याष्टक, अतिगुह्याष्टक, गुह्याद्गुह्याष्टक, पवित्राष्टक, असें पंचाष्टक मिळून

त्राष्टक ॥ ह्मणिजे पंचाष्टक ॥४॥ ते चाळीस परि सकळिक ॥ मंत्र महेश्वरापासून कोणी एक ॥ अनंतेश्वरापासून मुख्य ॥ कोणी एक ॥ ५ ॥ अनुगृह्णीत होऊनिया ॥ सर्वज्ञत्व पावोनिया ॥ भुवनपति होऊनिया ॥ असती जाणावें ॥६॥

## पक्वपाशद्वयपशु.

आणिक पक्वपाशद्वय ॥ ते विज्ञान योगमय ॥ सन्यासादिकानें कर्मक्षय ॥ होऊनिया ॥ १ ॥ मलैकपाश ॥ संबंधानें दर्श- ॥ नांत विशेष ॥ मुक्तिसाधन ह्मणवी ॥ २ ॥ मायातत्व शुद्ध विद्यातत्व ॥ द्वयांतराळलक्षण कैवल्यपदांत युक्त ॥ होऊनि विज्ञानकेवल संज्ञित ॥ होऊनि असती ॥ ३ ॥

## विज्ञानकेवल.

आणिक विज्ञानकेवल तें मल- ॥ विशिष्टपरिपाक तारतम्यानें सकळ ॥ शिवापासूनि परिप्राप्तिनिष्कळ ॥ निरधिकरणदीक्षातिशयानें ॥१॥ विद्याविद्येश्वर ॥ सदाशिवादिभेद उत्तरोत्तर ॥ अधिकारी अवस्थास्वीकार ॥ शिवस्वीकारावस्था स्वीकारूनिया॥२॥ परमुक्ता ऐसें दुःखलेशरहित ॥ निरातिशय समस्त ॥ भोग अत्यंत ॥ वासनास्वाद भोगूनि ॥३॥ मग तया भोगांत अतिशया ॥ विरक्ति उपजोनिया ॥ प्र-

---

(५)चाळीस लोक मंत्रमहेश्वर अशा अनंतेश्वराच्या(६)अनुग्रहानें सर्वज्ञ होऊन भुवनपति झालेले आहेत.

## पक्वपाशद्वयपशु.

(१) आणि ते पक्वपाशद्वयच विज्ञान, योग संन्यास इत्यादिकांनीं कर्मक्षय करून घेऊन (२) मलैकपाशसंबंधानें दर्शनांत मुक्तिसाधन अशा (३) मायातत्व शुद्धविद्यातत्व यांच्या अंतराललक्षणानें युक्त कैवल्यपदांत राहून " विज्ञानकेवल " या संज्ञेनें राहतात.

## विज्ञानकेवल.

(१) ते विज्ञानकेवलच विशिष्ट मलाचा परिपाक होऊन त्या तारतम्यानें शिवाकडून निरधिकरणदीक्षा पावून त्या दीक्षातिशयानें (२) विद्येश्वरसदाशिवादि भेद पावून ( त्या पदवींत जाऊन ) उत्तरोत्तर मिळालेल्या अधिकारावस्थेनें शिवस्वीकारावस्था पावून (३) परमुक्ताप्रमाणें दुःखाचा लेश देखील न भोगतां सर्वोत्कृष्ट सर्व भोगांचा उपभोग घेऊन (४) नंतर वैराग्य पावून प्रयोज्यकर्तृत्वाचा आयास

योज्य कर्तृत्वायास ॥ संबंध सोडूनि ॥४॥ सकळ वैंदव ॥ उत्तीर्ण हो- ऊनि सर्वथैव ॥ तत्वातीत होऊनि सर्व ॥ अभिव्यक्तनिर्विकल्प ॥ ५ ॥ समान लक्षण यथार्थ ॥ ज्ञानक्रिया शक्तियुक्त ॥ ह्मणविती परम युक्त ॥ इति द्वितीयपदार्थ ह्मणवी ॥६॥

## पशुसंज्ञा.

द्वितीय पदार्थ पशुचि जाण ॥ सर्वशास्त्राचे ठायीं ॥ विश्व तैजस प्राज्ञ ह्मणोन ॥ वैकारिक तामस ॥१॥ विराट्‌ हिरण्यगर्भ ह्मणोन ॥ अ- विद्यक चेतन ॥ शरीरी अभिमानी ॥ सोपाधिकचेतन ॥२॥ बद्ध मुक्त ह्मणोन मुमुक्षु पतित ह्मणोन ॥ अतीत आरूढ ह्मणोन ॥ प्राणी जीवन ॥३॥ इत्यादि नामयुक्त होऊन ॥ व्यवहर तो जाण ॥ हा पशुचि शि- वांश असोन ॥ शिवपुच्छ ॥४॥ शिवशेष ह्मणोन ॥ शिवग्रास ह्मणोन॥ शिवप्रतिनिधि ह्मणोन ॥ शिवकिंकर शिवाभास ऐसे जाणा ॥५॥

## पाशभेद.

आणिक तो पाशपदार्थ जाण ॥ पशुबंधलक्षणयुक्त होऊन ॥ पशु- कोटीस न सोडतां व्यापून ॥ असे शिवाधीन ॥१॥ मलपाश ॥ माया- पाश ॥ कर्मपाश ॥ बिंदुपाश ॥ २॥ तिरोधानपाश ह्मणोन ॥ असे पं- चप्रकार होऊन ॥ त्याचे ठायीं जाण ॥ सांगे पुढती ॥३॥

---

सोडून(५) सकलबैंदवोत्तीर्ण होऊन तत्वातीत सर्वाभिव्यक्ति पावून निर्विकल्पकाच्या (६) समान लक्षणांनीं युक्त अशा ज्ञानक्रियाशक्तियुक्त अशा संज्ञेनें जगांत राहतात.

## पशुसंज्ञा.

(१) असा तो याप्रमाणें असलेला दुसरा पदार्थ असा पशूच सर्व शास्त्रांमध्यें विश्व, तैजस, प्राज्ञ, वैकारिक, तामस, (२) विराट्, हिरण्यगर्भ, अविद्यकचेतन, शरीरी, अभिमानी, सौपाधिकचेतन, (३) बद्ध, मुक्त, मुमुक्षु, पतित, अतीत, आ- रूढ, प्राणी, जीवन (४) वगैरे नांवें पावून व्यवहारांत फिरतात, असें सांगितलें आहे. हा पशूच शिवांश, शिवपुच्छ, (५--६) शिवशेष, शिवग्रास, शिवप्रतिनिधि, शिवकिंकर, शिवाभास या संज्ञांनीं युक्त आहे असें समजावें.

## पाशभेद.

(१) आणि तो पाशपदार्थ पशुबंधलक्षणानें युक्त आहे. तो पाशपशुकोटीला न सोडतां व्याप्त होऊन राहिला आहे. तो पाश शिवाधीन राहून(२) मलपाश,मायापाश, कर्मपाश, बिंदुपाश,(३) तिरोधानपाश, असा पांच प्रकारचा होऊन राहिला आहे.

## मलपाशविवेक.

पशुत्वें चैतन्य ॥ प्रथम प्रकटित आच्छादून ॥ मायाबीजांकुरासि साधन ॥ व्हावें ह्मणूनि ॥१॥ आत्मवर्गालागूनि भोक्तृत्व देऊनि ॥ आपण एक निर्वाणी ॥ झाला तरी ॥ २ ॥ प्रत्येक आत्मयातें ॥ आवरूनि वर्त्तें ॥ अनेक शक्ति समस्तें ॥ युक्त होऊनि ॥३॥ आपुलिया परिपाकवशें ॥ संप्राप्त दीक्षाविशेषें ॥ इच्छागमनी अपैलें ॥ त्या शक्तिसहित ॥४॥ ह्मणवी अज्ञान ॥ अविद्या आवृत्ति अंजन ॥ अशुद्धि आपण विच्छिन्न ॥ आणव आणि अनिर्मल ॥५॥ मृत्युमूर्च्छातिरस्कार ॥ रुक् पशुत्वादिपृथक ॥ पर्यायनामादिक ॥ पावोनिया ॥ ६ ॥ मोह महामोहमिश्र ॥ तामिस्र अंधतामिस्र ॥ कुटिला कुटिल स्थानांतर ॥ ह्मणिजे इति ॥ ७ ॥ सप्त अवस्था परिकुळ ॥ पावोनि समेळ ॥ कूटस्थानादि पाशविशेषमळ ॥ ह्मणवीत असे ॥८॥

## मायापाशविवेक.

आणि किंचिज्ञत्व ॥ किंचित्कर्तृत्व ॥ भोगलोलुपत्व ॥ आद्यनेक वैषयिक धर्मानुगुण ॥१॥ परिणामयुक्त होऊन ॥ कार्य व्हावया जनन ॥

---

## मलपाशविवेक.

(१) त्यांमध्यें पहिला मलपाश हा पशूंचें चैतन्य आच्छादन करून मायेच्या बीजांकुराला साधन होऊन राहतो. (२) त्यामुळें आत्म्यांस भोक्तृत्व संपादन करून देत आहे. आणि आपण एकच (३) प्रत्येक आत्म्याचे ठिकाणीं व्याप्त होऊन राहिलेल्या अनेक शक्तींनीं युक्त (४) व आपल्या परिपाकामुळें प्राप्त झालेल्या दीक्षाविशेषानें युक्त (५) स्वैरगमन शक्तिसहित राहून अज्ञान, अविद्या, आवृत्ति, अंजन, अशुद्धि, आणव, अनिर्मल, (६) मृत्यु, मूर्च्छा, तिरस्कार, रुक्, पशुत्व इत्यादि पर्यायनामें असलेला (७) मोह, महामोहमिश्र, तामिस्र, अंधतामिस्र, कुटिल व अकुटिल, (८) अशा सप्तावस्थांनीं युक्त कूटस्थ अनादि अशा पाशविशेषाला मल असें ह्मणतात.

## मायापाशविवेक.

(१) आणि किंचिज्ञत्व, किंचित्कर्तृत्व, भोगलोलुपत्व वगैरे वैषयिक धर्माला अनुगुण (२) असलेला परिणामयुक्त कार्यवर्ग हा जन्माला उपादान कारण होऊन

उपादानकारण ॥ ह्मणवितसे ॥ २ ॥ कर्मपाशसंगराहाणि ॥ एकीकडे निरसूनि ॥ आगंतुक पाश ह्मणोनि ॥ घेत असे ॥३॥ ग्रंथि मूळप्रकृति मोहिनी ॥ मूलोपादान ॥ मलात्मिका पाशप्रकृति ॥४॥ कर्तृत्वोपाधि-प्रधान ॥ कारणावस्था गुणसाम्य ह्मणोन ॥ आनुमानिक सूक्ष्मशक्ति ह्मणोन ॥ आभासिकी आध्यासिकी ॥५॥ श्यामा अशिवा ह्मणोन ॥ अव्यक्त अजा ह्मणोन ॥ जननीसरूपा ह्मणोन ॥ आधारभूमिका ॥६॥ बंधिका व्यावर्तकी ह्मणोन ॥ द्वितीया अश्वत्थ ह्मणोन ॥ संशायिका अपरविद्या ह्मणोन ॥ ज्ञानवंचिका ॥ ७ ॥ इति पर्यायनामयुक्त असे एकत्वजडत्वपरिणामित्व ॥ मोहकत्व कालादिकारणत्व ॥ वस्तुरूपत्व सूक्ष्मकत्व ॥ कर्मातिशयत्व ॥८॥ विकल्पज्ञान युत ॥ ईश्वरत्व तत्वाश्रय ॥ देहवदनंतेश्वरत्व ॥ इत्यादि करूनि ॥९॥ प्रेर्यत्वादि धर्मविशिष्ट युक्त ह्मणोन ॥ नित्य व्यापक होऊन ॥ असे पाशविशेष तें कारण ॥ माया ह्मणवी ॥१०॥

## कर्मपाशविवेक.

मायामूलक कर्मपाश ह्मणोन ॥ चैतन्य क्रियाशक्त्याभासरूप होऊन ॥ प्रवृत्तिनिवृत्त्यात्मकत्वानें ॥ शुद्धाशुद्ध ह्मणवोन ॥ १॥ उत्तम म-

---

(३) कर्मपाशासह गुंतलेला आगंतुक पाश असा ह्मणवून घेऊन (४) ग्रंथि, मूलप्रकृति, मोहिनी, मूलोपादान, मलात्मिका, पाशप्रकृति, (५) कर्तृत्वोपाधि, प्रधान, कारणावस्था, गुणसाम्य, अनुमानिक, सूक्ष्मशक्ति, आभासकी, अध्यासिकी, (६) श्यामा, अशिवा, अव्यक्त, अजा, जननी, सरूपा, आधारभूमिका, (७) बन्धिका, व्यावर्तकी, द्वितीया, अश्वत्थ, संशायिका, अपरविद्या, ज्ञानपंचिका, (८) इत्यादि पर्याय नामयुक्त होऊन एकत्व, जडत्व, परिणामित्व, मोहकत्व, कालादि कारणत्व, वस्तुरूपत्व, सूक्ष्मकत्व, कर्मातिशयत्व, (९) विकल्पज्ञानयुतेश्वरत्व, तत्त्वाश्रय-देहवदनंतेश्वरत्व, (१०) प्रेर्यत्वादिधर्मविशिष्ट असें ह्मणवून घेऊन नित्य व्यापक असलेला पाशविशेषच माया होय.

## कर्मपाशविवेक.

(१) आणि मायामूलक कर्मपाश हा चैतन्य क्रियाशक्तीच्या आभासरूपानें राहिलेला असतो. प्रवृत्ति आणि निवृत्ति व शुद्धाशुद्ध (२) अशा दोन भेदांनी युक्त होऊन राहिलेला असतो. उत्तम, मध्यम, अधम या तीन भेदांनीं

ध्यमाधम भेदानें ॥ त्रैगुण्य ह्मणवोन ॥ आभ्यंतर बाह्य रूपानें ॥ द्वि-विध होऊन ॥२॥ सकलकार्योत्पादक ॥ कृतिरूप असल्यानें ॥ सकल-पशुकर्तृक होऊन ।। उत्तरोत्तर ॥३॥ कर्मजनक होऊन ॥ क्वचित पूर्व-नाशक होऊन ॥ राहिलेल्या संस्कारादिकासि युक्त होऊन ॥ माया-श्रयी झाला असे मायेसि ॥४॥ आणिक येथ ॥ मायेसि कर्माश्रयत्व ॥ कैसें घटत ॥ ह्मणतिलें तरी ॥५॥

## गुणकर्मविवेक.

मायात्रिगुणात्मक असोन ॥ तयाकारण ॥ तत्कार्य कर्मपाश जाण ॥ त्याचे ठायीं ॥१॥ सकलात्मक ॥ सुकृतदुष्कृतादिक ॥ कर्म करिती य-थापूर्वक ॥ तया अनुक्रमें ॥२॥ धर्मज्ञान ऐश्वर्य वैराग्य ॥ अधर्म अज्ञा-न अनैश्वर्य अवैराग्य ॥ ह्मणिजे अष्टभावात्मक योग ॥ बुद्धि गुण ह्म-णवी ॥३॥ अपूर्व नामें सत्कृत होऊन पूर्वभावचतुष्टयात्मकत्वानें ॥ प-शूस संसारप्रवृत्ति ह्मणवोन ॥ बंधमार्गसाधक होऊन ॥ राहत असे ॥४॥ उत्तरभावचतुष्टयानें ॥ पशूस संसारनिवृत्ति ह्मणवोन ॥ मुक्ति-मार्गसाधक होऊन ॥ राहत असे ॥५॥ तया गुणांत विशेख ॥ प्रथम धर्मादि चतुष्क ॥ तया सात्विक ॥ वर्ग ह्मणविती ॥६॥ उरले अधर्मा

---

त्रैगुण्य असें ह्मणवून घेत आहे. आणि आभ्यंतर बाह्यरूपानें दोन प्रकारचा हो-ऊन (३) सकलकार्योत्पादक कृतिरूप होऊन राहिल्यामुळें सकल पशुकर्तृक हो-ऊन राहिलेला असतो; आणि उत्तरोतर (४--५) कर्मजनक होऊन राहिलेला अ-सतो. क्वचित ठिकाणीं पूर्वनाशक होऊन राहिलेल्या संसारादिकांसह मायाश्रय होऊन राहते त्या मायेला कर्माश्रयत्व सांगतात कीं,

## गुणकर्मविवेक.

(१) माया त्रिगुणात्मक असल्यामुळें तत्तत्कार्यरूप कर्मपाशामध्यें (२) सर्व आत्म्यांनीं केलेलीं सुकृत दुष्कृतरूप कर्मै क्रमानें (३) धर्म, ज्ञान, ऐश्वर्य, वैराग्य, अधर्म, अज्ञान, अनैश्वर्य, अवैराग्यरूप अष्टभावात्मकानें बुद्धिगुण ह्मणवून घेते. (४) आणि "अपूर्व" अशा नांवानें प्रख्यात होते. पूर्वभाव चतुष्टयात्मकत्वानें प-शूंला संसारप्रवृत्ति नांवाच्या बंध मार्गाला साधक होऊन (५) उत्तरभावचतुष्ट-यानें पशूंला संसारनिवृत्ति नांवाच्या मुक्ति मार्गाला साधक होऊन राहतें. (६) त्यांत धर्मादि चार विषय सात्विक असून (७) अधर्मादि तीन विषय तामस आ-

दित्रय मुख्य ॥ ते तामस वर्गादिक ॥ वरि अवैराग्यें एक ॥ तें राजस ह्मणवी ॥ तत्तद्गुणानुरूपें जाण ॥ कर्मे जाणावें ॥७॥

## गुणसंस्कारभेद.

ते गुण ह्मणतिले तरी ॥ सांसिद्धिक ह्मणोनि ॥ आणि नैमित्तिक ह्मणोनि ॥ प्राकृत ह्मणोनि त्रिविध असती ॥१॥ त्याचे ठायीं ॥ इष्टापूर्तादि धर्मसंस्कार ॥ तया देहपतनांतरीं जन्मांतरीं ॥ प्रथम संस्कार स्वयें उद्बोध करी ॥ तो सांसिद्धिक ह्मणवी ॥ २ ॥ देहत्यागावरि पुनर्जन्मीं लोक ॥ बुद्धिगुरुशास्त्रादि पूर्वक ॥ संस्कारानुसारगुणे शोभे तो नैमित्तिक ॥ ह्मणवी निरुता ॥३॥ स्वप्नमूर्च्छादि व्यापार ॥ स्मरोनि चेतला तयासि साचार ॥ यथा यथोचित संसार-॥ प्राप्ति होय॥४॥ तैसें वर्तमान ॥ शरीरें ते ते गुण ॥ असती अभिव्यक्त होऊन ॥ तो प्राकृत ह्मणवी ॥ ५ ॥

## बुद्धिगुणकर्मफल.

आणिक त्याचे ठायीं ॥ सांसिद्धिक धर्मानें वश्यकरण ॥ ज्ञानसंबंधें धर्मपरिज्ञान ॥ ऐश्वर्यानें सकळविघ्न ॥ समूह निवृत्यादिक ॥१॥ वैरा-

---

हेत. आणि अवैराग्य एक राजस आहे. त्या त्या गुणाला अनुसरून कर्मे समजून घ्यावींत.

## गुणसंस्कारभेद.

(१) आणि त्या गुणांमध्यें सांसिद्धिक, नैमित्तिक, प्राकृत असे तीन प्रकार आहेत. (२) त्यांमध्यें इष्टापूर्तादि धर्मसंस्कारच देह लयाला पोंचल्यानंतर जन्मांतरामध्यें पहिला संस्कार आपोआप उद्बुद्ध झाला असतां त्याला सांसिद्धिक असें ह्मणतात. (२) देहत्यागानंतर आलेल्या पुनर्जन्मांत लोकांच्या उपदेशानें व गुरूनें केलेल्या शास्त्रादिकांच्या उपदेशानें संस्कारानुसार जे गुण दिसतात त्यांलाच नैमित्तिक ह्मणतात. (४) स्वप्नमूर्छादिकांतून जागा झाल्यानंतर यथोचित संसारांत जास्त जसा प्रवेश होईल (५) त्याप्रमाणें वर्तमानदेहांतच त्या त्या गुणांची जी अभिव्यक्ति होते, तिला प्राकृत असें ह्मणतात.

## बुद्धिगुणकर्मफल.

(१) त्यांमध्यें सांसिद्धिक धर्मानें वश्यादिक होऊन ( सांसिद्धिक धर्मानें जग वश्य होतें. ) ज्ञानानें धर्मपरिज्ञानसंबंध वगैरे संपादन करतात. ऐश्वर्यानें विघ्नें दूर होतात. (२) वैराग्यानें भोग परित्याग होतो. अधर्मानें भोगाचे ठिकाणीं आसक्ति

ग्यानें भोग ॥ संगति परित्याग ॥ अधर्मानें भोगा ॥ सक्त्यादिक ॥२॥ अज्ञानें तिरस्कारादिक ॥ अनैश्वर्यानें विघ्नादिक ॥ अवैराग्यानें अनेक ॥ जन्मांतरप्राप्ति होय ॥३॥ आणिक नैमित्तिक प्राकृत ॥ धर्मानें स्वर्गादि होय प्राप्त ॥ ज्ञानें लाभे सत्य ॥ मुक्त्यादिक ॥४॥ ऐश्वर्यानें इष्टार्थ ॥ सिध्यादिक प्राप्त ॥ वैराग्यानें अत्यंत ॥ प्रवृत्ति लयादिक ॥५॥ अधर्मानें पशुपक्षिमृगादिक ॥ सर्व स्थावर ह्मणिजे पंचक ॥ परि तिर्यग्योनि मुख्य ॥ प्राप्त होय ॥६॥ अज्ञानें नरकादिक भय ॥ अनैश्वर्यें विघ्नें अतिशय ॥ अवैराग्यें प्राप्त होय ॥ बंधनादिक ॥७॥ ऐसें सकळ धर्म ॥ संस्कारस्तोम ॥ बुद्धींत सधर्म ॥ होऊनि असे ॥८॥

## बुद्धिलयोत्पत्ति.

ती बुद्धि जरि झाली ॥ नित्यादि प्रलयकालीं ॥ अंतःकरणचि मूल ॥ पाशरूपानें झालें ॥ १ ॥ ज्ञानमय ॥ जरि ती प्रळयकालीं ॥ मायागर्भस्थळीं ॥ लीन होय ॥२॥ तो संस्कार असोनि आंत ॥ कालांतरें असे अंकुरोनि फळत ॥ तयाकारणें अर्थ ॥ माया कर्माश्रय ह्मणवी ॥३॥

## करणत्रय.

आणिक मनोवाक्काय शरीरें जाण ॥ त्रिविध करण ॥ सुखदुःखानु-

---

वगैरे होतात. (३) अज्ञानानें तिरस्कार वगैरे, अनैश्वर्यानें (दारिद्र्यानें) विघ्नें वगैरे, अवैराग्यानें जन्मांतरें यांची प्राप्ति होते. (४) नैमित्तिक प्राकृतधर्मांनीं स्वर्गादिक प्राप्त होतात. ज्ञानानें मुक्ति वगैरे मिळतात. (५) ऐश्वर्यानें इष्टसिद्धि वगैरे प्राप्त होतात. वैराग्यानें प्रवृत्तिलयादिक होतात. (६) अधर्मानें पशु, पक्षि, मृग, सर्प, स्थावर अशा पंचविध तिर्यग्योनी प्राप्त होतात. (७) अज्ञानानें नरकभयादिक प्राप्त होतात. अनैश्वर्यानें विघ्नादिक प्राप्त होतात. अवैराग्यानें बन्धादिक प्राप्त होतात. (८) एकूण सकलधर्मसंस्कार सर्व बुद्धीच्या ठिकाणीं असतो असें समजावें.

## बुद्धिलयोत्पत्ति.

(१) नंतर ती बुद्धि नित्यादि प्रलयकाळीं अंतःकरण ह्मणून मूलपाशरूपानें ज्ञानमय होऊन (२) प्रलयकाळीं मायेंत अंतर्लीन होते. (३) संस्कार तेथेंच लीन होऊन कालांतरानें पुनः अंकुरित होऊन फलद्रूप होतो ह्मणून मायाच कर्माश्रय आहे असा निर्धार जाणावा.

## करणत्रय.

(१-२) आणि मन, वाचा, व शरीर हें त्रिविधकरण सुखदुःखाचा अनुभव

भवसाधन ॥ जाणावें ॥१॥ तत्साधनकल्पनादिकांस ॥ साधक होवोन राहे कैसें ॥ हिया प्रश्नास ॥ सांगे उत्तर॥२॥ आणिक हें मन ॥ सूक्ष्मावरण वेगज्ञान॥क्रिया प्रतिफलन योग्य होऊन॥ संकल्पविकल्पादिकांस ॥३॥ मूल ह्मणवोन ॥ घेत असलेल्या मायापाशासि जाण ॥ प्रथमविकार ह्मणोन ॥ पशुत्वासि वरांग झालें ॥४॥ तैसें वाक् जाण ॥ दहरादिकांचे ठायीं यत्किंचिदवछेदकाभिव्यक्त होऊन ॥ शिवादि संकेतानें ॥ अर्थप्रकाशक शब्द होवोन राहे ॥५॥ आणिक तें काय जाण ॥ दशेंद्रिय प्राण ॥ धात्वादिनिबद्धपशुभोगनियंत्रण ॥ रूपमल कर्मजालविस्तृत ॥६॥ प्रकृतिविकृत्यात्मक ॥ पंजर होवोनि राहे ॥ पुढें धर्माधर्मादि कार्य ॥ विवेक प्रतिपादन ॥७॥

## धर्माधर्मादिकार्यें.

आणि मनो वाचा काया ॥ ह्मणिजे तीन जया ॥ कारणापासूनिया ॥ जनित होऊनि ॥१॥ सुखदुःखाद्यनेक गुण॥ तयासि झाले कारण॥ धर्माधर्मरूपें विभिन्न ॥ विचित्र होऊनि ॥२॥ उत्क्षेपण अपक्षेपण ॥ आकुंचन प्रसारण ॥ गति ह्मणिजे पंच भिन्न ॥ व्यापार संभवेसि ॥ ३ ॥

---

व तत्साधनकल्पना यांस साधक आहे तें कसें ह्मणाल तर सांगतों. (३) आणि हें मन सूक्ष्मावरण, वेग, ज्ञान, क्रिया, व प्रतिफलन (प्रतिबिंब) यांस योग्य असून, संकल्पविकल्पांस (४) मूल असलेला जो मायापाश त्याचा प्रथम विकार ह्मणून पशुत्वास वरांग झालें आहे. (५) व वाचा दहराकाशादिकांत यत्किंचिदवच्छेदकाभिव्यक्त होऊन शिवादि संकेतानें अर्थप्रकाशक शब्द होऊन राहते. (६--७) आणि तें शरीर, दश इंद्रियें, प्राण, धातु वगैरेंनीं निबद्ध असलेल्या, पशूंच्या (जीवाच्या) भोगाला नियंत्रण झालें आहे. तसेंच तें मल व कर्म यांच्या जाळ्यानें विस्तृत असून प्रकृतिविकृत्यात्मक पंजर होऊन राहिलें आहे. पुढें धर्माधर्मादिकार्यविवेक प्रतिपादिला आहे.

## धर्माधर्मादिकार्यें.

(१--२) मन, वाणी, शरीर, ह्या तीन कारणांनीं उत्पन्न झालेलें कर्म सुखदुःखादि अनेक गुणांला कारण होऊन धर्माधर्मरूपानें विभिन्न व विचित्र झालें आहे. (३) तसेंच तें कर्म उत्क्षेपण (वर फेकणें), अपक्षेपण ( खालीं टाकणें ), आकुंचन (संकोचित होणें ), प्रसारण व गति (गमन), ह्या पांच व्यापारांनीं उत्पन्न होतें व

उत्पाद्य प्राप्त्य ॥ विकार्य संस्कार्य ॥ ह्मणिजे चतुष्टय ॥ फळयुक्त ह्मणोनि ॥४॥ जातिप्रद आयुःप्रद ॥ होऊनिया भोगप्रद ॥ आध्यात्मिक-त्रिविध ॥ साधन ह्मणोनि ॥ ५ ॥ सुरनरतिर्यगादि योनि· ॥ प्राप्तीनें अनुगुण होऊनि ॥ कलादि मायाकार्योंभारणि ॥ जनित व्हावया ॥६॥ सहकारी होऊनि बीजवृक्षन्यायें ॥ प्रवाहनादि होय ॥ पाशविशेषमय ॥ तें कर्म ह्मणवी ॥ ७ ॥

## कर्मानें भोगप्राप्ति.

आणिक या कर्मालागून ॥ भोगप्रदत्व असे ह्मणोन ॥ तें भोगलक्षण ॥ कैसें ह्मणतिलें तरी॥१॥ चक्षुरादि इंद्रियस्तोम बाह्य--॥ प्रकाश वनितादि विषय ॥ तयांत असोन गुणदोषकार्य ॥ विचारी तें मन ॥२॥ आणिक बुद्धि झाली ॥ तरी ती विषय संमूहमेळीं ॥ निश्चय करीत असे सकळीं ॥ तिये ठायीं ॥३॥ शुभाशुभ करणें ॥ सुखदुःख रूपानें ॥ परिणामुनी आपणें ॥ साक्षाद्भोग्य ह्मणवी ॥४॥ कलोद्धरित चैतन्य ॥ आत्मा तो आपण ॥ विद्या ह्मणजे अंतःकरण ॥ तयानें देखोनि ॥ ५ ॥ वरि अहंकार ह्मणिजे करणानें ॥ अहं सुखी अहं दुःखी ह्मणोनि येणें॥

---

(४) उत्पाद्यप्राप्य, विकार्य, संस्कार्य ह्या चार प्रकारच्या फलांनीं युक्त आहे. (५) आणखी तें कर्म जातिप्रद ( जातिदर्शक ), आयुःप्रद, भोगप्रद असें असून आध्यात्मिकादि ( आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक ) तीन व्याधींस कारण आहे. (६) व तेंच कर्म सुर ( देव ), नर, तिर्यक् ( पश्वादिप्राणी ) वगैरे प्राण्यांच्या योनिप्राप्तींत अनुगुण असलेल्या कलादि सकल मायाकार्यांस (७) सहकारिकारण झालें आहे. व तें कर्म बीजवृक्षन्यायानें अनादि पाशविशेष आहे.

## कर्मानें भोगप्राप्ति.

(१) आतां कर्माला भोगप्रदत्व आहे ह्मणून सांगितलें आहे तरी भोग ह्मणजे काय असा प्रश्न करून सांगतात कीं, (२) चक्षुरादि इंद्रियांकडून बाह्य वनितादि विषयांस प्रकाशित करवून त्यांत असलेल्या गुणदोषांचें विवेचन करणारें मन (३) बुद्धिस्वरूप झालें असतां त्या वनितादि विषयांना निश्चित करून त्यांतील (४) बऱ्या वाइटानें आपणच सुखदुःखस्वरूप होऊन साक्षात भोग्य वस्तु होतें (५) तेंच कलोद्धरित ( कलाविशिष्ट ) चैतन्यरूप आत्म्याकडून विद्यारूपी अंतःकरणानें पाहिलें जाऊन (६) नंतर तो अहंकारविशिष्ट झाला असतां त्यानें मी

अध्यासें भोग्यरूप जाणणें ॥ बुद्धीचा भोग होय ॥६॥ व्यावहारिक प्रत्यक्षादि प्रमाण ॥ प्रमेय विषय सर्व ॥ वेदांतासी ॥ शिवसिद्धांतासी ॥ विशेष विरोध नाहीं ॥७॥

## बिंदुपाशस्वरूप.

थानंतर अत्यंत ॥ विशिष्ट अधिकारयुक्त ॥ तया मायाकर्म स्पर्शन किंचित॥ नाहीं त्या कारणें॥१॥ निरंतर निरतिशय अति॥ सुखसंधान अनुभूति ॥ भोगसाधन कार्यजाति ॥ जनित व्हावया ॥ २ ॥ उपादान कारण होऊनि ॥ मलक्षय तयासंगें करूनि ॥ निवृत्ति नाश होय ह्मणूनि ॥ तया लागीं ॥३॥ आगंतुक पाश ह्मणोनि ॥ महामाया ह्मणोनि ॥ कुटिल कुंडलिनी ॥ क्रियाशक्ति ॥४॥ परनाद परबिंदु ॥ परिग्रहशक्ति परविद्याशब्द ॥ तत्त्वशब्द ब्रह्मशुद्ध ॥ मायातत्त्व ॥५॥ शिवतत्त्व षडध्वबीजकूट ॥ शिवलिंगपीठ ॥ योगपीठ मंत्रपीठ ॥ व्योमविद्याविद्याशक्ति ॥६॥ वागीश्वरी अनाहत अघोर वाक् ॥ ब्रह्म ह्मणिजे इत्यादि पृथक ॥ पर्याय नामादिक ॥ युक्त होऊनि ॥७॥

## षडध्वविवेक.

क्षकारादि करून ॥ पर्यंत एकावन्न ॥ वर्णाध्वांलागून ॥ आश्रूनिया

---

सुखी, मी दुःखी अशा अध्यासवशानें भोग्यवस्तु जाणणें हा बुद्धीचा भोग होय (७) ह्मणून सर्व व्यावहारिक, प्रत्यक्षादि प्रमाण, प्रमेय विषय, वेदांताला व शिवसिद्धांताला विशेष विरुद्ध नाहींत.

## बिंदुपाशस्वरूप.

(१) यानंतर अत्यंत विशिष्ट अधिकारी जनांना मायाकर्मांचा स्पर्श होत नसल्यामुळें (२) त्यांना नित्य, निरतिशय अशा सुखाचा अनुभवस्वरूप भोगसाधनकार्यांचा समूह प्राप्त होतो. (३) त्या कार्यसमूहास उपादानकारण असलेला बिंदुपाश मलक्षयाबरोबर नाश पावणारा (४) आगंतुकपाशस्वरूप होतो. त्या बिंदुपाशाला महामाया, कुटिला, कुंडली, क्रियाशक्ति, (५) परनाद, परबिंदु, परिग्रहशक्ति, परविद्या, शब्दतत्त्व, शब्दब्रह्म, शुद्धमाया, (६) शिवतत्त्व, षडध्वबीज, शिवलिंगपीठ, योगपीठ, मंत्रपीठ, व्योम, विद्या, विद्याशक्ति, (७) वागीश्वरी, अनाहता, अघोरवाक्, ब्रह्म हीं पर्यायनामें आहेत.

## षडध्वविवेक.

(१–२) नंतर क्षकारादि एकावन्न वर्णाध्वांला व ॐ शिवाय नमो नमः वगैरे

॥१॥ ॐ शिवाय ॥ नमो नमः ह्मणोनिया ॥ इत्यादि करूनिया ॥ एक्याऐंशी पदाध्वांसि ॥२॥ हृदयाय नमः ह्मणोनि ॥ इत्यादि करूनि ॥ एकादश आश्रूनि ॥ मंत्राध्वासि ॥३॥ पृथिव्यादि अशेख ॥ शुद्धाशुद्धरूपषट्रक ॥ त्रिंशति मुख्य ॥ तत्वाध्वासीं॥४॥ कालाग्निभुवन ॥ आदिकरून ॥ अनेक आश्रून ॥ भुवनाध्वासीं ॥५॥ निवृत्यादिवर ॥ पंचप्रकार ॥ कलाध्वांसि आधार ॥ होऊनि असे ॥६॥ आणिक वैखर्यादिकरूनि ॥ चतुर्विंध वाचा लागूनि ॥ आधार होऊनि ॥ परिणामरूपें ॥७॥ होऊनि कारणभूत ॥ निर्विकल्पज्ञानोपेत ॥ परशिव ह्मणिजे अशरीरवंत ॥ तयाचेनि ॥८॥ कर्तृपणें परिपूर्ण ॥ परंज्योतिस्वरूप होऊन ॥ पाशविशेष गुण ॥ असे तो बिंदु ह्मणवी ॥९॥

## चतुर्विंधवाक्.

आणिक त्या बिंदुपाशासि जाण ॥ मूलवाङ्मातृका ह्मणोन ॥ शिवा उमा घोरा सरस्वती ह्मणोन ॥ वाणीस कारण होऊनि असे ॥१॥ "चत्वारि वाक्परिमिता" ह्मणोन ॥ श्रुतिसम्मत होवोन ॥ शिवानंदविद्यावल्ली ह्मणवोन ॥ परा वाक् ॥ २ ॥ पश्यंती वाक् ॥ मध्यमा वाक् ॥ वैखरी वाक् ॥ ऐसे चतुर्विंध ॥३॥ तें वाक्चातुर्य जाण ॥ चिदचिदात्मक प्रपंच सर्व व्यापोन ॥ ज्ञानजनक असल्यानें ॥ अभिधानात्मक अ-

---

एक्याऐंशी पदाध्वांला बिंदूच कारण आहे. (३) तसेंच तो बिंदु हृदयाय नमः इत्यादि अकरा मंत्राध्वांला, (४) पृथिव्यादि शिवांत छत्तीस तत्त्वाध्वांला, (५) कालाग्नि वगैरे अनेक भुवनाध्वांला, (६) निवृत्यादि पंचकलाध्वांला, (७) व वैखर्यादि चतुर्विंध वाणीला आधार परिणामरूपानें (८) कारण होऊन निर्विकल्पकज्ञानयुक्त पराशिव ह्मणून अशरीर (९) कर्तृ व परिपूर्ण परंज्योतिस्वरूप असा पाशविशेषच आहे.

## चतुर्विंधवाक्.

(१) आणि त्या बिंदुपाशाला मूलवाङ्मातृकारूप शिवा, उमा, घोरा, सरस्वती ह्या नांवांची वाणीच कारण होऊन राहते. (२) "चत्वारि वाक्परिमिता" या श्रुतीला संमत होऊन शिवानंदविद्यावल्ली असें ह्मणवून घेऊन परावाक्, (३) पश्यंतीवाक्, मध्यमावाक्, वैखरीवाक् याप्रमाणें चार प्रकारचें असलेलें (४) वाक्चातुर्यच चिदचिदात्मक प्रपंच सर्व व्यापून राहिलें आहे. ज्ञानजनक असल्यामुळें,

सल्यामुळें ॥४॥ तदुभय संस्कारशक्तीनें॥ ज्ञानज्ञेय तादात्म्यासि जाण॥ वाहिलेली शिववविद्या जाण ॥ वाक् ह्मणवीत असे ॥५॥ ती वागुपासना ॥ सकल प्राण्यांस असोन ॥ पुरुषार्थ साधन ॥ तयाठायीं मुख्य असे ॥ ६ ॥

## परावाग्विद्यास्वरूप.

आणिक चतुर्विध वाणीमध्यें जाण ॥ कोणी एक तत्त्ववर्ती असोन॥ शुद्धात्मक पशु ह्मणोन ॥ कर्त्याच्या ॥१॥ मूलाधारस्थानीं ॥ सूक्ष्मनादस्वरूपानें ॥ आत्म्याशीं अनन्यैकरस होऊन ॥ समस्त कार्यांसी॥२॥ कारण होवोन ॥ श्रेष्ठ वाणी असे जाण ॥ परा वाग्विद्यास्वरूप ह्मणोन जाणावें ॥ ३ ॥

## पश्यंतीवाक्स्वरूप.

परा संज्ञित वाणीच नाभिस्थित॥मयूरांडरससंगत॥मैत्र्यादिपक्षादिसमस्त ॥ अवयवचित्र तैसें ॥१॥ अर्थवाचक वर्णक्रमरहित ॥ निर्विकल्प होऊनि प्रज्वलित ॥ असे ते वाणीयुक्त ॥ पश्यन्ती ह्मणवी ॥२॥

## मध्यमावाक्स्वरूप.

तीच हृदयस्थानीं पदार्थ ॥ वाचक वर्णयुक्त ॥ अनुसंधान पूरित ॥

---

अभिधानात्मक असल्यामुळें, (५) त्याच्या उभय संस्कारशक्तीनें ज्ञानज्ञेयतादात्म्य वाहिलेली शिवविद्याच वाक् असें ह्मणवून घेते. (६) त्या वाणीची उपासनाच सकल प्राण्यांस पुरुषार्थसाधनामध्यें मुख्य आहे असें समजलें पाहिजे. तें असें कीं,—

## परावाग्विद्यास्वरूप.

(१) आणि त्या चतुर्विध वाणीमध्यें कोणत्याही एका तत्वामध्यें असलेल्या शुद्धात्मक पशूच्या (२) मूलाधारामध्यें सूक्ष्म ( नाद ) स्वरूपानें आत्म्याशीं अनन्यैक्यरस होऊन ( समरस होऊन ) सर्व कार्याला (३) कारण होऊन असलेली श्रेष्ठ वाणीच परावाग्विद्यास्वरूप होय.

## पश्यंतीवाक्स्वरूप.

(१) परासंज्ञक वाणीच नाभिस्थानामध्यें मोराच्या अंड्याच्या रसांत पक्षाद्यवयवाचीं चित्रें जशीं दिसतात (२) त्याप्रमाणें अर्थवाचकवर्णक्रमाशिवाय निर्विकल्प होऊन प्रकाशते तिलाच पश्यंती असें ह्मणतात.

## मध्यमावाक्स्वरूप.

(१) पश्यंतीसंज्ञिक वाणीच हृदयस्थानामध्यें पदार्थवाचकवर्णानुसंधानाला अ-

सामग्रीनें ॥१॥ प्राणवृत्ति असोनि ॥ तया न मिळतां सविकल्प होऊनि ॥ असे ते वाणी ॥ मध्यमा ह्मणवी ॥२॥

## वैखरीवाक्स्वरूप.

तीच ऊर कंठ ॥ जिव्हामूल तालु ओष्ठ॥ दंत नासिक शिर ह्मणिजे अष्ट ॥ स्थानांमध्यें ॥१॥ प्राणवायुसंबंध उपजे॥ आणि आर्ण वर्णबीज॥ लिंगमातृका शुद्धगा ह्मणिंजे ॥ परि पर्यायसंज्ञा धरूनि ॥२॥ प्रत्येक वर्णाधिदैवत ॥ फलसंयोगें युक्त ॥ स्वरव्यंजनसहित ॥ द्विप्रकाश ॥३॥ एकावन्न अक्षर कूट ॥ अभिव्यक्तीनें तत्तदानुपूर्वीनें निष्कृष्ट ॥ शब्दांनीं हा घट हा पट ॥ इति सांगे श्रवणपुटगोचर करूनि ॥ ४ ॥ खंड शब्दबोध करवून ॥ नंतर वाक्ययोजनेनें ॥ अखंड शाब्दबोधहेतु होऊन ॥ सकळ संसार व्यवहार वर्तनीं ॥५॥ कारण होय ह्मणोनि ॥ मुख्य बंधरूपं झाली वाणी ॥ जी सकळ गोचर असे होऊनि ॥ ती वैखरी ह्मणवी ॥ ६ ॥

## वागधिकारी.

तया वाक्चतुष्टय ॥ बाहेर वैखरी अभ्यंतरीं शिष्टत्रय ॥ वर्ते-

---

नुसरून (२) प्राणवृत्तींत न शिरतां सविकल्प होऊन राहणारी वाणीच मध्यमा होय.

### वैखरीवाक्स्वरूप.

(१) नंतर ती मध्यमासंज्ञक वाणीच ऊर, कंठ, जिव्हा, मूल, तालु, ओष्ठ, दंत, नासिका, शिर या आठ स्थानांमध्यें (२) प्राणवायूचा संबंध झाला असतां उत्पन्न होणारे आर्ण, वर्ण, बीज, लिंग, मातृका, शुद्धगा हे पदार्थ या पर्यायनांवांनीं युक्त असून (३) प्रत्येक वर्णाधिदेवता फलांनीं युक्त असलेल्या स्वर व्यंजन या दोन भेदांनीयुक्त असतात. आणि या दोन भेदांतच (४) एकावन्न अक्षरें स्पष्टपणें प्रकट होतात. त्या त्या आनुपूर्वीनें निष्कृष्ट झालेल्या शब्दांनीं हा घट आहे हा पट आहे असें श्रवणेंद्रियाला गोचर होतें. (५) याप्रमाणें खंडशब्दाचा बोध होऊन नंतर वाक्ययोजना होते. त्या योजनेनें अखंडशाब्दबोधाला कारण होऊन सर्व संसारव्यवहाराला (६) कारण होत असल्यामुळें मुख्य बंधरूप ती वाणीच वैखरी असें ह्मणवून घेऊन सकलगोचर होऊन राहते.

### वागधिकारी.

(१) नंतर त्यामध्यें बाह्यप्रदेशांत एका प्रकारानें असलेली वैखरीच आभ्यंतरा-

त असती निश्चयें ॥ तयामध्यें ॥१॥ पुढें सांगे शुद्धाध्ववर्ति समस्त ॥ तयासि परा ह्मणिजे नाद संज्ञायुक्त ॥ कारण वाक्यासि संतत ॥ मुख्य होऊनि असे ॥२॥ मिश्राध्ववासीय ॥ तयासि पश्यन्ती मध्यमा उभय ॥ बिंदु संज्ञायुक्तमय ॥ सूक्ष्म वाक्य वर्ततसे ॥ ३ ॥ अशुद्धाध्वरूपतत्त्वाभासस्थित जन ॥ तयासि वैखरी ह्मणिजे वर्ण ॥ संज्ञायुक्त स्थूळवाक्यें करून ॥ व्यवहारत असे ॥४॥

## वाग्मिविभाग.

नंतर प्रपंचांत शरीरधारी प्राणी अखिल ॥ वागीश्वरी विलासरूप शिवप्रसादानें सकल ॥ आहार निद्रा भयमैथुन विचार व्यवहारादि सकल ॥ कार्य करून ॥१॥ पिपीलिकादि तिर्यग्जंत्वादि करून ॥ मनुष्यादि देवांतज्ञान ॥ जंतुरूप पशु सर्व जाण ॥ वाक्प्रसाद कैसा ह्मणतिला तरी ॥ २ ॥ आणिक येथें वृक्षजाति ॥ लागून देहयोग्यतानुगुण परा वाचा एकचि वर्तती ॥ सर्पादि अंडजादिकांसि पश्यन्तिसह ॥ तच्छरीर योग्यतेनुसार दोन वाणीवर्तें ॥ ३ ॥ पश्वादिपिंडजवर्गालि साचार ॥ तदवयवसौष्ठवानुरूप ॥ मध्यमासहित तीन ॥ वाणी नि-

---

मध्यें बाकींच्या तीन प्रकारांनीं युक्त होऊन राहते. त्या तीन प्रकारांमध्यें (२) पुढें सांगण्यांत येणाऱ्या शुद्धाध्ववर्तीयांस परा ह्मणजे नाद या संज्ञेनें युक्त कारण वाणीच मुख्य होऊन राहिली आहे. (३) मिश्राध्ववासीमध्यें पश्यंती मध्यमा या संज्ञेनें आणि बिंदुसंज्ञेनें युक्त सूक्ष्म वाणीच व्यवहरतात. (४) अशुद्धाध्वरूपतत्वभासामध्यें राहणारे सर्व, वैखरी संज्ञेनें युक्त स्थूलवाणीनेंच व्यवहार करतात असें समजावें.

## वाग्मिविभाग.

(१) नंतर या प्रपंचांत शरीरधारी प्राणी सर्व वागीश्वरीविलासरूप शिवप्रसादानेंच आहार, निद्रा, भय, मैथुनविचार वगैरे सर्व व्यवहार करतात. (२) मुंगी वगैरे सर्व तिर्यक् प्राणी व मनुष्यादि देवतान्त सर्व ज्ञानी, पशुसंज्ञक प्राणी या सर्वांस वाक्प्रसाद कसा होतो तें सांगतात कीं, (३) वृक्षादि प्राण्यांस देहयोग्यतेला अनुसरून परावाक्प्रसाद एकच आहे. सर्पादिअंडजप्राण्यांस त्यांच्या शरीराच्या योग्यतेला अनुसरून पश्यंतीवाक्प्रसादासह परावाक् राहते. (४) पश्वादिपिंडजप्राण्यांस त्यांच्या अवयवांच्या सौष्ठवाला अनुसरून मध्यमासह पूर्वोक्त दोन वाणी

रंतरी ॥४॥ मनुष्याद्युत्तम प्राणिवर्गास ॥ वैखरीसह चार असती प॰ रिस ॥ तयांचे ठायीं पराचि वाग्बीज सरस ॥ वैखरीच ॥५॥ सबीज- गर्भ फल असल्यानें ॥ वैखरीनें सर्व प्रयोजन-॥ सिद्धि झाली तरी जाण ॥ फलापरि तत्काल भोग ॥६॥ नश्वर असल्यानें ॥ तयाचें मूल जाण ॥ पराचि स्थिर प्रयोजक होवोन ॥ राहत असे॥७॥ परा वाणी वृक्षादिकांस असली तरी ॥ फलरहित निष्प्रयोजक परी ॥ वैखरी वि- चारसंपन्न होईल तरी ॥ प्राणी शिवाराधनेनें ॥ ८॥ परावाणींत ॥ राह॰ त असतां ॥ तीच कृतार्थता ॥ निश्चयें जाणा ॥९॥

## वैखरीविशेषविवेक.

आणिक परिभेद ॥ ते वैखरी विशेध ॥ रूपशब्द ॥ समूहच ॥ १ ॥ वाचक ह्मणून ॥ लाक्षणिक ह्मणून ॥ व्यंजक ह्मणून ॥ त्रिविध होऊन असे ॥२॥ त्याचे ठायीं वृद्धसंकेत हा घट हे पटादिक ॥ ह्मणोनि मु- ख्यार्थ गोचरपूर्वक ॥ करी शब्दादिक ते वाचक ॥ शब्द ह्मणवी ॥३॥ मंचाः क्रोशंति ह्मणतिलें॥ तरी अचेतन मंचक बोले॥ तत्सन्निधानें वे॰ गळें ॥ मनुष्य शब्द करी ॥४॥ ह्मणिजे अन्यार्थलक्ष्यक॥ शब्दादिक॥

---

राहतात. (५) मनुष्यादि उत्तम प्राण्यांस वैखरीसह पूर्वोक्त तीनही वाणी राहतात. यामध्यें परा ही वाग्बीज असून वैखरीच (६) सबीजगर्भफल होऊन राहिली आहे त्यामुळें वैखरीनें सर्व प्रयोजनें सिद्धीस जात असलीं तरी फलाप्रमाणें तत्काल भोग (७) नश्वर होऊन राहत असल्यामुळें त्या वाणीचें मूलभूत परावाणीच स्थिरप्रयो- जक होऊन राहते. (८) एकूण परावाणी ही वृक्षादि प्राण्यांस असली तरी फल नसून निष्प्रयोजकपणें राहते. वैखरीविचारसंपन्न प्राण्यानें शिवाराधनेच्या योगानें (९) परावाणींत राहणें हीच कृतार्थता होय असें समजावें.

## वैखरीविशेषविवेक.

(१–२) आणि वैखरीरूप शब्दसमूहच वाचक, लाक्षणिक, व्यंजक असा तीन प्रकारचा झाला आहे. (३) त्यांमध्यें वृद्धसंकेताला अनुसरून “हा घट आहे, हा पट आहे” अशा रीतीनें मुख्यार्थाला गोचर करणारी वाणीच वाचक या नांवानें प्रसिद्ध झाली आहे. (४) नंतर “मंचक ओरडतो” या वाक्यांत अचेतन मंचक ओरडतो असें ह्मटलें आहे तर तें संभवत नाहीं. त्याकरितां मंचकावरील पोर ओ- रडतें. (५) असा अन्यार्थ, लक्षणेनें घ्यावा लागतो. ह्मणून अशा वाक्याला लाक्ष-

ते लाक्षणिक ॥ शब्द ह्मणवी ॥५॥ सूर्य झालिया अस्तमान ॥ तेथें सुकृताद्यपेक्षा देवतापूजन ॥ संध्यादि वंदन ॥ करावया ॥६॥ योग्य ह्मणोन ॥ अर्थसूचक शब्दवचन तो व्यंजक॥ शब्द ह्मणवी ॥७॥ त्रिविध वाग्वैखरीच जाण ॥ रसालंकारादियुक्त होऊन ॥ तात्पर्य बोधादि वैचित्र्य जाण ॥ कल्पित असें विवेकावें ॥८॥

## सविककल्पज्ञानगुरुपरंपरा.

आणिक येथें घटादिक ॥ विषयसमूह अशेख ॥ वाच्यवाचक ॥ संबंधादिक ॥१॥ संकेतलक्षण ॥ सविकल्पक ज्ञान ॥ कैसें कोठून ॥ ह्मणतिलें तरी ॥२॥ प्रथम निर्विकल्पकत्वें अशेख ॥ वस्तूंचे ठायीं यथार्थ ग्राहक ॥ पण झालें स्वस्वरूपादिक ॥ सर्वज्ञ परमेश्वरप्रसादें ॥३॥ अनंतेश्वरादिक ॥ जाणोनि पावले अशेख ॥ वरितयापासून रुद्रादिक ॥ प्राप्ति पावले ॥४॥ तयापासाव ब्रह्मादिक ॥ जाणतिलें अशेख ॥ तयापासूनि देवता लोक ॥ जाणतिलें ॥५॥ वरि विशेषतया ॥ त्यापासूनिया ॥ ऋषिजनां अवघिया ॥ हातवसलें ॥६॥ तयापासून अस्मादि ॥ पितृपितामहादि ॥ सकळांसि साधि ॥ झालें प्रसिद्ध ॥७॥ तयापासून सद्भावें ॥ अस्मादिकांसि साधलें अनुभवें ॥ ह्मणोनि जाणावें ॥ प्रसिद्ध क्रमें ॥ ८ ॥

---

णिक असें ह्मणतात. (६) नंतर " सूर्य अस्तंगत झाला " या वाक्यांत सुकृतादिकांच्या अपेक्षेनें देवपूजासंध्यावंदनादि क्रिया केल्या पाहिजेत. (७) असा निराळा अर्थ एक आपोआप निघतो. या वाक्याला व्यंजकवाक्य असें ह्मणतात. (८) अशा रीतीनें त्रिविध होऊन राहिलेली वाग्वैखरी रसालंकारादिकांनीं युक्त होऊन तात्पर्य बोधादि वैचित्र्य कल्पिते असें समजावें.

## सविकल्पकज्ञानगुरुपरंपरा.

(१) आणि येथें घटादिविषय सर्व, व वाच्यवाचक, संबंधादिक (२) संकेतलक्षण, सविकल्पकज्ञान हे सर्व विषय कोठून आले असें ह्मणाल तर सांगतात कीं, (३) प्रथम निर्विकल्पकत्वानें सर्व वस्तूंचे ठिकाणीं यथार्थ रीतीनें ग्राहक होऊनें सर्वज्ञ असा परमेश्वर राहिला. त्या परमेश्वराच्या प्रसादानें (४) अनंतेश्वरादिकांस ज्ञान मिळालें. त्यांच्यापासून रुद्रादिकांना मिळालें (५) नंतर त्यांच्या योगानें ब्रह्मादिकांस मिळालें, त्यांच्या योगानें इतर देवांना मिळालें. (६) त्या देवादिकांकडून ऋषींना प्राप्त झालें. (७) त्यांच्याकडून आमच्या वंशांतील पूर्वज प्रपितामहादि पितरांना मिळालें. (८) त्यांच्याकडून आह्मांला मिळालें असें समजावें.

## तिरोधानपाशस्वरूप.

आणिक सांगितलें विशद ॥ मलादिपाश चतुर्विध ॥ अचेतन संबंध ॥ असलिया कारणें ॥ १ ॥ आपापल्या व्यापारांत ॥ आपणचि नेणती प्रवर्त ॥ ह्मणोनि तया पाशनिमित्त ॥ अनुग्रहलक्षण झालें ॥ २ ॥ त्या पाशव्यापारानुसार सूत्रधारी ॥ व्यापारापरि स्वाधीन शिवशक्ति विशेषाकारी ॥ तो तिरोधानपाश साचारी ॥ ह्मणवी जाणावें ॥३ ॥ ह्मणिजे येथ ॥ त्रितीयपाश पदार्थ ॥ विवेक समाप्त ॥ ह्मणोनि ओळखावें ॥ ४ ॥

## शिवसारूप्यसिद्धांत.

या पंचपाशांनीं ॥ पशुबद्ध असोन ॥ " पाशबद्धो भवेज्जीवः " ह्मणोन ॥ पाशमुक्तः सदाशिवः ॥१॥ या प्रमाणांनीं ॥ पशुपतिभजन करोन ॥ तत्प्रसादलब्ध त्यानें ॥ शिवात्मज्ञानानें ॥२॥ " मया क्रीडंति ते मुक्ता मद्भावा मामुपाश्रिताः ॥ मत्साम्येन चिदानंदपूर्णा मन्मूर्तिमूर्तयः " या प्रमाणानें ॥ शिवसारूप्य ह्मणोन ॥ उपचरण असोन ॥ शिवत्व पावती निर्धारा ॥३॥

---

## तिरोधानपाशस्वरूप.

(१) याप्रमाणें सांगितलेले मलादि चतुर्विध पाश अचेतन असल्यामुळें (२) आपापल्या व्यापारांत आपणच प्रवृत्त होत नाहींत ह्मणूनच त्या पाशाकरितां अनुग्रहरूप लक्षण झालें. (३) त्या त्या व्यापाराला अनुसरून असलेल्या सूत्रधाराच्या व्यापाराप्रमाणें शिवशक्ति ही स्वाधीन होऊन राहिलेली आहे. त्या शिवशक्तीलाच तिरोधानपाश असें ह्मणतात. (४) याप्रमाणें तृतीय पाशपदाचा अर्थ संक्षेपानें जाणावा.

## शिवसारूप्यसिद्धांत.

(१) याप्रमाणें पांच पाशांनीं बद्ध झालेले पशु " पाशबद्धो भवेज्जीवः पाशमुक्तः सदाशिवः " (२) या प्रमाणानें पशुपतीचें भजन करून त्याच्या प्रसादानें मिळालेल्या शिवात्मज्ञानानें (३) " मया क्रीडंति ते मुक्ता मद्भावा मामुपाश्रिताः । मत्साम्येन चिदानंदपूर्णा मन्मूर्तिमूर्तयः ॥ " प्रमाणाला अनुसरून शिवसारूप्यानें उपचरित झालेल्या शिवत्वाला पावतात असें निश्चयानें समजावें.

## सिद्धांतोपसंहार.

आणिक या प्रकारें ॥ सांगितल्या अनुसारें ॥ प्रथमादि विचारें ॥ असंख्यातरूप ॥१॥ अवांतर भेदयुक्त ॥ पत्यादि पदार्थ ॥ प्रतिपादक यथार्थ ॥ तें ज्ञानपाद ह्मणवी ॥२॥

## प्रकरणपरिसमाप्ति.

इति क्रियापादादि मुख्य ॥ चतुष्पादादिक ॥ झालें प्रवर्तक ॥ शिवागम सिद्धांतशास्त्र ॥१॥ तें श्रवण पठन ॥ ग्रहण मनन ॥ निदिध्यासन ॥ संयोगानें ॥२॥ उत्पन्न होऊन ॥ आत्मया लागून ॥ यथार्थज्ञान ॥ दृढत्व घटे ॥३॥ समस्त प्राकृतमायेच्छा भोग ॥ तयाचे ठायीं निस्पृह लक्षण संयोग ॥ परम वैराग्य ॥ बळें करूनि ॥ ४ ॥ षडध्वातीत निरंजन होऊन ॥ परशिवसमान ॥ स्वयें झालों ह्मणोन ॥ निश्चय जया ॥५॥ तो चरम शरीरी कृतार्थ ॥ ह्मणोनि सांगणें परिख्यात ॥ ते शिवसिद्धांतार्थ ॥ विस्तार ह्मणवी ॥६॥

इति शिवसिद्धान्ततत्वकथननाम द्वितीयपरिच्छेदः॥ २ ॥

---

## सिद्धांतोपसंहार.

(१--२) नंतर या प्रकारानें सांगितलेले विषय असंख्यात भेदांनीं युक्त होऊन राहतात. तर पत्यादिपदार्थत्रयप्रतिपादक विषयाला ज्ञानपाद असें ह्मणतात.

येथें ज्ञानपाद संपला.

## प्रकरणपरिसमाप्ति.

(१) एकूण क्रियापाद वगैरे पादचतुष्टयपूर्वक शिवागम सिद्धांताचें ( २ ) श्रवण, पठन, ग्रहण, मनन, निदिध्यासन केल्यानें (३) आत्म्याचें यथार्थ ज्ञान निश्चयाचें उत्पन्न होतें. त्या दृढ ज्ञानानें (४) समस्त प्राकृतमायेच्या इच्छेनें उत्पन्न झालेल्या भोगांविषयीं निस्पृह लक्षणानें युक्त श्रेष्ठवैराग्य उत्पन्न होतें. त्या वैराग्यबलानें (५) षडध्वातीत निरंजन व परशिवासमान झालों आहें, असा निश्चय ज्याचा झाला असेल (६) तोच चरमशरीरी कृतार्थ ह्मणून जें सांगितलें आहे तो शिवसिद्धातार्थविस्तार असें जाणावें.

ह्याप्रमाणें शिवसिद्धांततत्वकथन नांवाचें द्वितीय प्रकरण संपलें.

# विक्रीस तयार.

## श्रीमंत रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांच्या वीरशैवलिंगिब्राह्मण-धर्मग्रंथमालेंतील मराठी भाषांतरासह असलेल्या संस्कृतग्रंथांची यादी

| | रु.आ.पै. |
|---|---|
| वीरशैवसदाचारसंग्रह | ०-१२-० |
| सिद्धांतशिखामणि | ३- ०-० |
| व्यासोक्त बसवेश्वरपुराण | ३- ०-० |
| वीरशैवाचारप्रदीपिका | २- ०-० |
| हरिहरतारतम्य | ०- ४-० |
| विशेषार्थप्रकाशिका | ०- ७-० |
| रामायणसारसंग्रह | ०- ६-० |
| उपयुक्त वेंचे | ०- ७-० |
| विरक्तोत्पत्तिक्रिया (कानडी) | ०- ४-० |
| पारमेश्वरागम | २- ०-० |
| कैवल्यसार | ०-१०-० |
| प्रभुलिंगलीला | ३-१२-० |
| पंचाचार्यपंचमोत्पत्तिप्रकरण | ० ६-० |
| वीरमाहेश्वरप्रकरण | ०- ८-० |
| दीक्षादिकथन | ०- २-० |
| सूक्ष्मागम | ०-१०-० |
| वीरशैवलिंगिब्राह्मण वंशावलि पट | ०-१-० |
| व्यापारसाम्राज्य पूर्वार्ध | १- ०-० |
| शिवपरअभंग | ०- ७-० |
| शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी | ०-१४-० |
| वीरमाहेश्वराचारसंग्रह | ५- ४-० |
| मराठी सिद्धरामेश्वर चरित्र | ०- ७-० |
| वीरशैवदीक्षाविधि वीरमाहेश्वरदीक्षाविधि | ०- १-० |
| शिष्यवर्गसंप्रदायनिरूपण | ०- १-० |
| शिवपुराणवायवीयसंहिता | ४- ०-० |
| भारतसारसंग्रह | ०- ६-० |
| वीरशैवखानेसुमारी | ०- १-० |
| अनादिवीरशैवसारसंग्रह | ३- ०-० |
| वीरशैवमतसंवर्धिनी | ०- २-० |
| विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण | ०-११-० |
| संक्षिप्तविवाहविधि | ०- ३-० |
| दशकर्मपद्धति | १- ४-० |
| तात्पर्यसंग्रह | ०- २-६ |
| गुरुशिष्यलक्षण | ०- ०-६ |
| ब्राह्मणवर्णन | ०- ०-३ |
| वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मपरअभंग | ०- ०-६ |
| शैववीरशैवभेदाचार निरूपण (सूक्ष्मागमपटल७) | ०- ०-९ |
| सूक्ष्मतंत्र पांचव्या पटलांतील गुरुशिष्यलक्षण | ०- १-० |
| सूक्ष्मतंत्र ६ व्या पटलांतील लिंगस्वरूपपूजाफलकथन | ० १-० |
| शिवचरित्र | ०- ७-० |
| वीरशैवांच्या धर्मसमंजुतीस सरकारांतून मान | ०- २-० |
| उपन्यासविद्या (कानडी) | ०- ६-० |
| अमरकोश प्रथमकांड | ०- १-६ |
| स्तोत्रसंग्रह | ०-१०-० |
| रुद्रादिपंचक | ०- २-० |
| बिल्वोपनिषत् | ०- १-० |
| शिवाद्वैतमंजरी (कानडी) | ०- ६-० |

**ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें:—** वरील ग्रंथ रा० रा० चनबसप्पा वारद यांचे मुंबई, विजापूर, सोलापूर, कलबुर्गा, पुर्णा येथील दुकानीं व बार्सी येथें नरसिंगगिरजी मिलचे दुकानीं विकत मिळतील.

**प्रसिद्धिकर्ता.**

